


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)






महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका







दीपावली शुभचिंतन
धारगळकर प्रोसेस प्रा. लिमिटेड
कार्यालय : व्हिक्टोरिया मिल्स कंपाउंड, गांवदेवी, मुंबई-७ • फोन : ३५६१८०
कारखाना : एलार बिल्डिंग, ५२४ सेनापती बापट मार्ग, दादर, मुंबई-२८ • फोन : ४५१६२७
सर्व तऱ्हेच्या लाईन, हाफटोन व रंगीत ब्लॉक्ससाठीं

अनुक्रमणिका




नोव्हेंबर – दिवाळी १९७० * मूल्य ४ रुपये

## श्रे य ना मा व ली

☆ बहुरंगी चित्रकलाकृती : वेणीसंहार, मालविकाग्नीमित्र, मालतीमाधव, स्वप्नवासवदत्ता या संस्कृत नाटकांमधील नाट्यनायिका : चित्रकार दीनानाथ दलाल.

☆ दुरंगी विंगचित्रमाला : 'भक्ष'लवादी विद्यापीठ, एक्स्पो(ज्ड) ७०, उद्याच्या औद्योगिक प्रगतीची (चा)हूल, बड्या धेंडांचे 'लघु' उद्योग : अशोक डोंगरे, दलाल आर्ट स्टुडिओ.

☆ प्रक्षोभक कादंबरी : चिरंजीव अश्वत्थामा––श्रीराम कामत.

☆ नवलपूर्ण एकांकिका : वि. वा. शिरवाडकर.

☆ जीवनस्पर्शी कथा : अरविंद गोखले ◆ मधु मंगेश कर्णिक ◆ सदानंद रेगे ◆ रणजित देसाई ◆ ह. मो. मराठे ◆ सुरेश वेंगुर्लेकर ◆ अरविंद ताटके.

☆ इरसाल विनोदी कथा : मो. ग. रांगणेकर ◆ जयवंत दळवी ◆ राजाराम हुमणे ◆ सुभाष भेंडे.

☆ ललित व वैचारिक लेख : चित्रकार द. ग. गोडसे ◆ आनंद साधले ◆ प्रभाकर अत्रे.

☆ परिसंवाद : 'बस्स झाला हा लोकशाहीचा फार्स'––दि. के. बेडेकर ◆ प्रभाकर पाध्ये ◆ डॉ. गोवर्धन पारीख ◆ डॉ. अनिल अवचट.

☆ नव–कवितेचे नवे उन्मेष : दिलीप चित्रे ◆ रमेश तेंडुलकर ◆ श्रीकांत सिनकर ◆ ह. शि. खरात ◆ शरद साटम ◆ अनील वांदेकर ◆ गुरुनाथ सामंत ◆ विलास कणेकर ◆ गुरुनाथ धुरी ◆ यशवंत कुलकर्णी ◆ कवि भोला.

☆ व्यंगचित्रे : दलाल आर्ट स्टुडिओ, अशोक डोंगरे, ज्ञानेश सोनार.

☆ खास दिवाळीसाठी खुसखुशीत पदार्थ : श्या. गो. ताम्हनकर.

टे. नं. ३५७७६५
Gram : DALALART

**दलाल आर्ट स्टूडिओ. ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४**

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. दीनानाथ दलाल यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रोड, मुंबई नं. ४ येथे छापून दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.
Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57



# स्व ग त आ णि स्वा ग त

'दीपावली'चा हा सव्विसावा दिवाळी अंक! सव्विस वर्षे रसिकांचे रंजन सतत करीत राहणे ही सोपी गोष्ट नाही; म्हणूनच साहित्य–कला–संस्कृतीच्या क्षेत्रात 'दीपावली'ने नेत्रदीपक यश प्राप्त केले याबद्दल सानंद अभिमान वाटतो. सव्विस वर्षांचा काल मानवी जीवनात फारसा मोठा नसला तरी नियतकालिकाच्या जीवनात मात्र तो एक मोठाच टप्पा मानला पाहिजे. या काळात मानवी जीवनाप्रमाणेच 'दीपावली'ला उन्हाळे–पावसाळे सोसावे लागले आहेत, उपेक्षेचे विष पचवावे लागले आहे. साहित्यक्षेत्रात स्वतःच्याच कोंडाळ्यात मश्गुल होऊन राहणाऱ्या काही मान्यवरांनी आणि साहित्य-संस्थांनीही 'दीपावली'च्या सव्वीस वर्षाच्या दीर्घकालीन धडपडीकडे जाणूनबुजून दुर्लक्ष केले तरीही रसिक वाचकांनी मात्र योग्य ती दाद दिली. त्यांच्या प्रेमाची शिदोरी घेऊनच 'दीपावली'ने ही सव्विस वर्षांची वाटचाल केली. त्यात अनेक सुहृदांचे साहाय्य लाभले आणि त्यांच्या सहकार्यामुळेच 'दीपावली'ला विशिष्ट दर्जा आणि यश मिळाले आहे हे नमूद करण्यास आनंदच वाटतो.

यंदाच्या अंकातील 'श्रेयनामावली'कडे नजर टाकली तर जुन्या ऋणानुबंधी स्नेह्यांबरोबरच काही नवीन चेहेरेही दिसतील. त्यांचे स्नेहसंबंधही यापुढे अखंड राहतीलच. यावेळी एकच गोष्ट खटकते तिचा मुद्दाम निर्देश केला पाहिजे. आमचे मान्यवर स्नेही व सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. पु. भा. भावे यांचा आणि 'दीपावली'चा संबंध अगदी पहिल्या अंकापासून आहे. दिवाळी अंकातील त्यांची हजेरी कधीच चुकली नाही, पण यंदा मात्र तसा प्रसंग ओढवला आहे. श्री. भावे यांच्यावर अलिकडेच कौटुंबिक आघात झाल्यामुळे साहित्य पाठविण्याची त्यांची इच्छा असूनही त्यांना तसे करता आले नाही. अर्थातच यात त्यांचा काहीच दोष नाही. 'दीपावली'वरील त्यांचे प्रेम अकृत्रिम आहे याची आम्हाला पूर्ण जाणीव आहे.

यंदाच्या दिवाळी अंकातील 'काव्याचे दालन'ही वेगळ्याच प्रकारे सजविलेले आढळून येईल. मराठीतील नामांकित कविवर्यांच्या उत्तमोत्तम निवडक कविता दिवाळी अंकातून देण्याची प्रथा यंदा बाजूला ठेवून 'प्रस्थापितांच्या हक्कांमुळे आमच्यावर अन्याय होतो' अशी उगीचच ओरड करणाऱ्या नवकवींच्या कवितांनीच 'दीपावली'चा कविता–विभाग नटला आहे. संतप्त कवींच्या अनेक कवितांमधून या कवितांची निवड केली आहे. याबाबतीत श्री. श्रीकांत सिनकर यांनी खूपच परिश्रम घेतले.

दिवाळी अंकातून संपूर्ण कादंबरी देण्याची प्रथा प्रथम सुरू करण्याचा मान 'दीपावली'चाच आहे. अनुकरण हे लोकप्रियतेचे गमक असते आणि म्हणूनच इतर नियतकालिकांच्या दिवाळी अंकांमधूनही आता संपूर्ण कादंबरी आढळते. यंदा श्री. श्रीराम कामत यांची एका वेगळ्याच विषयावरील कादंबरी या अंकात दिली आहे.

प्रचलित समस्येवर परिसंवाद हेही 'दीपावली'चेच वैशिष्ट्य! सध्या देशातील विचित्र परिस्थितीमुळे 'लोकशाही'वरील विश्वासच डळमळीत होतो की काय अशी शंका येण्यासारखे उद्गार ऐकू येतात. त्यातच अनेक सेवानिवृत्त सेनानीही 'बस्स झाला हा लोकशाहीचा फार्स' असे उद्वेगाने म्हणताना आढळतात. म्हणून त्याच विषयावर महाराष्ट्रातील विद्वानांचे विचार या अंकातील परिसंवादात समाविष्ट केले आहेत.

'दीपावली'च्या यशात आमच्या अनेक स्नेह्यांचा मोठा वाटा आहे, हे आम्ही कृतज्ञतापूर्वक नमूद करतो. 'दीपावली'चे लेखक-मित्र आणि रसिक वाचक–मित्र यांच्या अकृत्रिम प्रेमाच्या आणि सक्रीय सहकार्याच्या साहाय्यानेच 'दीपावली'ने साहित्य–शारदेच्या दरबारातील आपले मानाचे स्थान कायम टिकविले आहे.

'दीपावली'चा हा दिवाळी अंक सुयशस्वी करण्यासाठी अनेकांचे साहाय्य लाभले आहे. मेसर्स टॉम अॅण्ड बे (प्रा.) लि.चे व्यवस्थापकीय संचालक श्री. गणेशराव तांबे यांची मदत नेहेमीच असते. यावेळी ते परदेशच्या दौऱ्यावर होते तरी त्यांचे आशीर्वाद 'दीपावली'च्या पाठीशी आहेतच. मित्रवर्य अच्युतराव बर्वे यांनी नेहेमीप्रमाणे सक्रीय सहकार्य दिले आहे. संपादनकार्यात श्री. प्रभाकर अत्रे आणि श्री. कृ. वि. पेठे यांनी व मुद्रणकार्यात श्री. चंद्रकांत दळी यांनी खूपच परिश्रम केले. दिवाळी अंकाची छपाई योग्य मुदतीत आणि त्याबरोबरच सुबकपणे करून देणारे 'अशोक प्रिंटिंग प्रेस'चे मालक पिता–पुत्र श्री. अण्णासाहेब सावंत आणि श्री. रवि सावंत, तसेच प्रेसचा कामगार वर्ग, विविधरंगी चित्राकृतींची तितक्याच कलात्मकतेने उत्कृष्ट छपाई करणारे 'आशा प्रिंटरी'चे श्री. भाई व श्री. सुरेश मालपेकर, मुद्रण-ठसे वेळेवर तयार करून देणारे धारगळकर प्रोसेस (प्रा.) लि. चे श्री. हरिश्चंद्रराव धारगळकर, प्रभात प्रोसेस स्टुडिओचे श्री. विष्णुपंत कडव, एव्हरेस्ट ब्लॉक्सचे श्री. एस. एस. सावंत, ऑफसेट छपाईचे काम उत्कृष्टपणे पार पाडणारे जगदीश्वर प्रिंटिंग प्रेसचे श्री. भालचंद्र पाठक आणि त्यांचे सहकारी, हा अंक वाचकांपर्यंत तत्परतेने पोहोचविणारे श्री. बाबूराव बागवे आणि सर्वदूर विखुरलेले आमचे ठिकठिकाणचे वितरक या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद!

स्टुडिओतील सर्वच सहकाऱ्यांनी नेहेमीप्रमाणे या अंकाच्या कामात मनापासून सहकार्य केलेले आहे. ते घरचेच असल्याने त्यांचे आभार मानणे औपचारिक ठरेल आणि ते त्यांना आवडणारही नाही.

ही दिवाळी आमचे सर्व लेखकमित्र, जाहिरातदार, एजंट, वाचक, असंख्य हितचिंतक या सर्वांना सुख-समृद्धीची जावो हीच शारदाचरणी प्रार्थना!

—दीनानाथ दलाल
संपादक








अनुक्रमणिका




अरविंद गोखले

संगमरवरासारखं शुभ्र शरीर आरशात न्याहाळीत असताना घंटा वाजली. 'पोस्टमन'–ती स्वतःशी पुटपुटली व आवेगाने अंगावर पाणी ओतू लागली. पोस्टमनची पहाटेपासून ती वाट पहात होती. कॉफी पिताना, टाईपरायटरवर बसल्यावर, सिगरेट ओढताना. सतरा वेळा खिडकीतून समोरच्या अरुंद रस्त्याकडे ती नजर टाकीत होती. शहरातून कॉलनीकडे जाणाऱ्या त्या रस्त्याने कितीतरी माणसं सकाळची येत–जात. विद्यार्थी, फेरीवाले, बेकार. त्यात खाकी कपडयातला गबाळ टपालवाला टिपण्यासाठी ती अधीरी होत होती. एकदा तर ती व्हरांडयात उगाचच अर्धाएक तास उभी राहिली. पोस्टमन दहा वाजून गेल्याशिवाय उगवत नाही हे ठाऊक होतं तरी. तरी आता नऊ वाजताच पोस्टमन नक्की आला असं तिने घंटेच्या घट्ट दाब देऊन काढलेल्या आवाजावरून ओळखलं. अन् अबोध हुरहुरीन ती न्हाऊन निघाली.

"कोण ?" न्हाणीचं दार किलकिलं करून तिने ओल्या आवाजात विचारलं.

"डाक" नोकराणीने स्टोव्हच्या आवाजात ओरडून सांगितलं.

डाक म्हणजे पत्र. न्हाना म्हणजे बाथ, छोटी हजेरी म्हणजे ब्रेक फास्ट, झोपणं म्हणजे स्लीप किंवा सीएस्टा, उकडणं म्हणजे . .हजार हिंदी शब्दांचा पाठ केलेला कोश ती हसत पुटपुटू लागली आणि तिच्या डोक्यापुढे अमेरिकेहून आलेला लांबट लिफाफा फडफडू लागला. नक्कीच





अनुक्रमणिका

**....प्रारंभापासून कथालेखनानेच साहित्यक्षेत्रात आपले आघाडीवरील स्थान कायम राखणारे श्री. अरविंद गोखले यांनी 'दीपावली'च्या दिवाळी अंकांसाठी 'उभा जन्म उन्हात', 'मुसळधार', 'विग्रहवर्ती,' 'सूर्यमुखी' अशा एकापेक्षा एक सरस कथा लिहील्या. त्या कथा त्या त्या वर्षीच्या श्रेष्ठ कथा ठरल्या...एवढ्या की त्या कथांच्या नावानेच कथासंग्रहही निघाले...त्याच श्रेष्ठ कथांच्या रांगेत स्थान पटकावणारी त्यांची ही कथा .....**

न्यूयॉर्कहून फाऊंडेशनचं पत्र आलेलं असणार. ज्याची ती जीव एकवटून वाट पहात होती. ज्या पत्राने तिच्या आयुष्याचा आलेख बदलून जाणार होता. तिचं वास्तव्य, अस्तित्व... ती एकाएकी वावरली. समोरचा आरसा पाण्याच्या वाफांनी बिंब-हीन झाला होता. एकदम सारं अंधारल्यासारखं, अधांतरी असल्यासारखं झालं.

कसातरी टॉवेल लपेटून व न्हाणीघर उघडून ती बाहेरच्या खोलीत धावली. केसांच्या सोनेरी बटा मान हालवून मागे फेकीत टेबलावर टाकलेलं पाकीट पाहू लागली. फाऊंडेशनकडचाच खलिता होता. एअरमेलने आलेला, तिचं नाव असलेला !

मिस् उर्सुला लारसन.

१७३, बाबू गेनू रोड.

उर्सुला अधीरी झाली. एक हात छातीशी व दुसरा कमरेशी टॉवेल सावरीत होता त्यामुळे पाकीट उघडणं अवघड झालं. ती तशीच वळली व आरशापुढे उभी राहिली. अंग पुसून, कपडे करून, केस विंचरून मगच पत्र पहावं. उगाच घाई कशाला ! एक तास आधीच पत्र आलं आहे. अजून एक महिना आहे. अन् असून असून असणार काय पत्रात ?– 'आपल्या पत्रानुसार पुढील प्रोजेक्टसाठी दोन वर्षे फेलोशिप्ची मुदत वाढवीत आहोत'.. किंवा 'आपल्या विनंतीचा विचार करता येत नाही, पुढील महिन्यात परत यावे'..

खरंच, काय असेल पत्रात – ? सोनेरी केसांतून हस्तीदंती फणी फिरवीत उर्सुला एकदम गंभीर झाली. सहा महिन्यांसाठी म्हणून ती भारतात यायला निघाली ती एकदम शिक्षण आटोपलं की परत यायच्या अटीवरच. सहा महिन्यात सतरा वेळा होमसिक् झाली. तिचा बॉय फ्रेंड व्हीएतनामहून परतला होता. वडिलांना स्ट्रोक् झाला होता. इंडियाना पोलीसजवळचं आपलं गाव वारंवार स्वप्नात येत होतं. पण ह्या सहा महिन्यात सारंच बदललं. ढवळून निघालं. पुण्या–पंढरपूरच्या सफरीत तिला श्री विठ्ठलाची मूर्ती मिळाली. विठ्ठलाची देवळं दिसली. विठोबाबद्दलचा प्रोजेक्ट तयार करून तिने त्यासाठी दोन वर्षांची शिष्यवृत्ती मागितली. प्रोजेक्ट नवलाईचा होता, निर्दोष होता. फाउंडेशनला पटण्यासारखा होता. जर दोन वर्षं भारतात राहायला मिळालं; इथल्या माणसात, मातीत, मंतरलेल्या वातावरणात... पण–पण परवा बार्बरा कोहलर्चा प्रोजेक्ट नापसंत केला गेला. डॉक्टर कार्ल स्ट्रासबर्गरला तर तीन महिन्याचीही मुदतवाढ दिली नाही..इथे राहायला मिळालं तर वडिलांचं कदाचित् दर्शनही व्हायचं नाही. व्हिएतनामहून दुखापत होऊन आलेला डेव्ह मनाने आधीच दुरावला आहे, तो पुरता.... छे. काय करायचं ? काय पत्रात आहे ? भवितव्यात आहे?––

उर्सुलाला टेबलावरचं पाकीट आरशात दिसत होतं, अन् तिचा चेहेरा काकुळतीला येत होता. पत्र उघडायची तर फारच भीती वाटत होती. एकदम वाटलं, की वाचाव्यात त्या चार ओळी नि संपवावा सारा संभ्रम ! पण कसलीशी आठवण येऊन तिने हातातली फणी खाली टाकली, लिंगरीची झीप वर ओढली व लगबगीने मागील बाजूच्या खिडकीचा पडदा बाजूला करून ती दूरवरच्या बिऱ्हाडांकडे पाहू लागली.

रोजच्याप्रमाणे आजही ती स्त्री घरासमोर खाटेवर बसली होती व चोळीची गाठ सोडून मुलाला पाजीत होती. दूर नजर लागलेला तिचा फिक्कट चेहेरा भावशून्य, पण अती शांत होता. तिचं काळं उघडं मूल मस्तीत पीत होतं. सरसर वर जाणाऱ्या सूर्याच्या तापत्या प्रकाशात तिची सोशिक वक्षःस्थळं शिसवी भासत होती.

उर्सुलाचे डोळे खिळून गेले. खुरटी छाती भरून आली. हे दृश्य असंच पहात रहावं; यासाठी तरी भारतात राहावं ! अमेरिकेत असं पाहायला मिळत नाही. असं पाजणंच अयोग्य मानतात. उघड्यावर उन्हात स्तनं उघडी टाकून पोटच्या गोळ्याच्या तोंडात दुधाची धार वरणं याप्रेक्षा जास्त भारतीय, जास्त स्वर्गीय काय असेल ?–

त्या स्त्रीचा नवरा खाकरत, विडी ओढत कुठूनसा आला आणि उर्सुला हालली. पाच पोरं, एक गर्भपात. नवरा दारुड्या व बेकार. उर्सुलाला अपरात्रीपर्यंत त्या बिऱ्हाडात अन् त्या मागच्या सगळ्या चाळीत चालणारी भांडणं–हाणामारी आठवली. दारिद्र्य, अवहेलना, उपासमार. सगळ्या स्त्री जातीची सतत चालणारी विटंबना. कुठल्यातरी अनामिक भारतीय स्त्रीची मुर्दाड मुद्रा मोठी होत तिच्याजवळ येऊ लागली. अन् वाटलं, आपण गिळले जाणार. इथून, या देशातून आता पळून गेलं पाहिजे.

ती खिडकीपासून दूर झाली; पत्र पडलेल्या टेबलाला वळसा घालून बाहेरच्या व्हरांड्यात उभी राहिली.

उन्हाळा नव्हता तरी उन्ह आत्ताच रणरणू लागलं होतं. झुडपांवरची धूळ तशीच पसरलेली होती. वाहनं उगाचच कर्कश स्वर काढीत होती. वातावरणाला कसं मरगळलेलं स्वरूप येत होतं. असं रखरखीत, विटकं, वैर करणारं वातावरण सगळीकडेच दिसतं. पुण्याला, दिल्लीला, पाटण्याला, बंगलोरला...कुठल्या तरी म्हाताऱ्या झाडावर कावळा बसतो नि कोरडं आकाश ओरबाडू लागतो. उष्टया अन्नासाठी पुकारा करत महारोग्यांची माळ कुठून कुठे जात



अनुक्रमणिका

असते. न नांगरलेली उदास जमीन नुसती उसासत असते. कुणीतरी एकदम अंगावर येणार असं वाटतं.

आत्ताही उर्सुलाला तसे भास होऊ लागले व तिचं काळीज कोंदून गेलं. आपल्या गावातले स्वच्छ रस्ते नि हिरवळ आठवायचा ती यत्न करू लागली. डेली-कॅश्शेनमध्ये खुंटावर वसून खाणारे कामगार, ग्रेहाऊंडमधून गमतीने चाललेले उतारू, बार व वोलींग अॅली, चर्च नि... कसं सारं स्वच्छ, सुबक, संतुष्ट. वडील आता टेली-व्हीजनपुढे वसले असतील. आई ए. अॅड् पी.त गेली असेल. डेव्ह एक मोडका हात स्लींगमध्ये टाकून व दुसऱ्याने स्टिअरींग धरून कोरी कॅडीलॅक हिंडवीत असेल. उर्सुला एकदम वेडीपिशी झाली. वाटलं, आलेलं पत्र फाडून टाकावं व सरळ घरी परतावं. ती वळली सुद्धा; पण समोरून सायकलवरून जाणाऱ्या कुणा इसमाच्या उभ्या गळयातल्या ट्रॅन्झिस्टरमधून सतारीचे बोल आले व ती थबकली. तिने डोळे मिटले. अन् तिला दिसली ठेंगणी ठुसकी, काळीकभिन्न, विठोबाची मूर्ती !

मारल्यासारखी ती जरा वेळ ती आकृती आळवीत राहिली व मग निमूटपणे आत परतली. नोकराणीने खोली झाडून पुसून ठेवली होती. मघा आलेलं पत्र आता पेपर-वेटखाली गेलं होतं. पेपरवेटच नटराजाच्या मूर्तीचा होता. आणिक एक मोठा नटराज भितीवर लटकत होता. संगमरवरी ताज-महाल, हस्तीदंताच्या हस्तींची रांग, चंद-नाच्या, पश्मीन्याच्या, मिन्याच्या नाना वस्तू. फोटो, साड्या, चपला, वाद्यं-- भारतीय वस्तूंचं आकर्षक प्रदर्शन! विठोबा-सारखे कमरेवर हात ठेवून उर्सुला एकेक वस्तू डोळ्यांनी कुरवाळू लागली. खोली-तल्या मंद उजेडाने मृदु झालेलं तिचं मन भारतभर भटकून जमवलेल्या त्या वस्तूं-भोवती रुंजी घालू लागलं. हळूच तिला वेरूळच्या लेण्यात गेल्याचा भास झाला. अंधारून आलेली युगं व पुढ्यातली प्रचंड निश्चल जडशिला. गंगेकाठचा वेदघोष हलकेच कानाशी घुमू लागला. हिमालयाची शिखरं आठवली व काळ्या केरळीय तरुणींचा तांडा नृत्य करताना दिसला. कोळ्याच्या जाळ्यात गुरफटावं तशी उर्सुला उभ्या उभ्या उघड्या डोळ्यांनी कुठल्या तरी मंतरलेल्या विश्वात गेली. ही भावना, ही विलक्षण अवस्था अशीच राहावी म्हणून झुरू लागली.

दाराची घंटा कर्कश्यपणे वाजली व उर्सुला लारसनची समाधी भंगली. सतार ऐकताना, कथ्थकली नृत्य पहाताना, लेण्यात गेल्यावर अगर बैलगाडीत बसल्यावर मन ज्या विलक्षण भावनेने भरून जायचं ते आता नुसत्या त्या त्या गोष्टींच्या आठव-णीनेच उमलून येऊ लागलं होतं. नुसता भास--पण तेही एकदम हिरावले गेले. उर्सुलाला वाटलं, तारवाला आला 'तावड-तोब परत ये'– म्हणून फौंडेशनचा निरोप घेऊन !

नोकराणीने दार उघडलं व पाचसहा स्त्री पुरुष एकदम आत घुसले. 'हाय्– 'हौ ऽ डी–, 'हॅलो उर्सु–' म्हणत कोचावर, खुर्च्यावर, मुंढ्यावर वसले. रंगाचारीने पंखा सुरू केला. मधु मेहेराने सिगरेटचा टीन खोलला व सर्वांना ऑफर केला. लीलू मोतीचंदानीने मधली खुर्ची गाठून ठरा-विक पोझ घेतली सुनंदा शेल्फवरची पुस्तकं पाहू लागली. कर्तारसिंग...

हे सारे उर्सुलाचे हिंदी दोस्त. सहा महिन्यांची कमाई. त्यांना बघून प्रथम बरं वाटलं, मग तिटकारा दाटला. अन् अखेर त्यांची कीव करीत ती कोपऱ्यात खोटं हास्य करीत उभी राहिली. हे तरुण किती आदबीने, आकर्षकपणे वागतात. कुठल्याही विषयावर ऐसपैस वोलतात. रीडर्स डाय-जेस्ट वाचून. अमेरिकेबद्दल तर अधिक आत्मीयतेने. ह्यांचे कपडे, ह्यांचं शिक्षण, ह्यांची पुस्तकं, ह्यांचे उच्चार अमेरिकन. उर्सुलापेक्षा अमेरिकन. उर्सुलाला प्रथम विस्मय वाटायचा, अभिमान आनंद वाटा-यचा; पण मग हळूहळू तिला साऱ्याची घृणा येऊ लागली. ह्यांचं धड अमेरिकन नाही नि भारतीयही नाही. सर्वार्थाने उपाशी असलेले आगंतुक जीव हे ! न्यूक्लीअर फिजिक्सची डॉक्टरेट मिळविणारा पण गळ्यात गंडा घालणारा व सत्यनारायण पूजणारा हा रंगाचारी, स्त्रीदाक्षिण्य दाख-वणारा पण विलक्षण लंपट मधु मेहेरा; अन् कसलंच व्यक्तिमत्व नसलेली, नव-ऱ्याच्या उत्कर्षावर उंडारणारी सुनंदा सुद्धा!

"मला अखेर मिळाली व्हीसा... न्यूयॉर्कला जाणार मी आता"–लीलू मोती-चंदानी एकदम भारावून म्हणाली.

"ओ, हाऊ नाईस्–" उर्सुला लारसन प्रथम मनापासून म्हणाली व मग कृत्रिम

**संस्थानिक आता सामान्यजन झाले** – इति यशवंतराव



**...आणि 'सामान्यजन' शुगरकिंग झाले !**

हसली. अमेरिकेला जाण्यासाठी लीलूने काय काय लटपटी केल्या ते तिला स्मरलं. युसीसमध्ये खेटचा घालणं, अमेरिकन अधिकाऱ्यांशी स्नेह करणं, अमेरिकन नवरा मिळतो का बघणं, व्हीसा मिळण्यासाठी लाच देणं ! न्यूयॉर्कला जाणं म्हणजे जणू मोक्ष मिळणं... कशाला जात आहे ती जीव टाकीत तिकडे ?--- आपण कशाला आलो इकडे ?

"तुझं काय झालं इथे राहाण्याचं- ?"

"अजून कळलं नाही--"

उर्सुला टेबलावरच्या लिफाफ्याकडे पहात कॉफी सांगायला आत गेली. लीलू चैन करायला चालली आहे. आपण .. सगळे चैन करायला थोडेच जातात ? हा रंगाचारी तिथे किती कष्ट करून शिकला; पण मग परत आल्यावर सारेच असे उथळ, उपरे, उद्धट का होतात ? सगळे परत का येत नाहीत ? काय गवसतं त्यांना ? केवळ द्रव्य ? . . . आपण इथे कायम राहिलो तर ? काय गवसेल आपल्याला ? . . . विठोबा ?

नोकराणीला कॉफी करायला सांगून ती वळली, तेव्हा बाजूच्या झोपडपट्टीत भांडणं सुरू झाली होती. पाण्यावरून, पैशावरून, पोरींवरून. उर्सुलाला एकदम विचित्र झालं. जनावरांसारखी जगणारी, अज्ञानात उपासमारीत नि रोगराईत रुतलेली ही झोपडपट्टीतल्ली माणसं आणि प्रशस्त बंगल्यातून राहणारी, पैशाचं अन्नाचं नि शिक्षणाचं अजीर्ण झालेली ती दिवाणखान्यातली माणसं -- दोन्ही एकाच भूमीवर जगतात. एकमेकांना सांभाळीत, टाळीत ! अन् याचं कुणाला काही वाटत नाही. सगळंच अर्थहीन, दिशाहीन... असल्या विचित्र वातावरणात आपण राहायचं ? वाटलं, आपणही अमेरिकेस परत जाणार असं जाहीर करून टाकावं ! ती दिवाणखान्यात त्याच निर्धाराने आली; पण आता आणिक एक पाहुणा उपटला होता. गोरा अमेरिकन ! बॉबला पाहून ती बोलायची विसरली व त्याचं बोलणं ऐकत बाजूला उभी राहिली.

चर्चा. . पार्ट्या. . . दारू. . योगी. किती विषयांवर सारे बॉबशी बोलत होते. अन् बॉबही त्यात समरस झाला होता. डॉक्युमेंटरी काढणारा बॉब खरंच खोलवर विचार करणारा होता की केवळ टूरीस्ट होता ? भीक मागणाऱ्या भारताची दृश्यं टिपणाऱ्या बॉबला या भूमीतली मंतरलेली भावना जाणवली आहे का -? मूक राहून उर्सुला नुसती बॉबकडे बघत होती. इथल्या अमेरिकनांचा ती नेहमीच तिटकारा करी. पण आता तिला बॉबबद्दल अकारण अनुकंपा वाटू लागली.

कॉफीपान झाल्यावर सावकाशीने सारे पांगले. दिवाणखान्यात नुसते प्रश्नांचे, मतांचे, चौकश्यांचे, वहाड्यांचे प्रतिध्वनि उरले. तेच ऐकत उर्सुला अंमळ बसून राहिली. प्रश्नं, प्रश्नं. माणसं, माणसं. तिला कोंडल्यासारखं झालं. अन् मग सगळ्याबद्दलचा कळवळा दाटला.

फाँडेशनकडून आलेला निर्णयाचा



अनुक्रमणिका




**'भूमिहीना'ना जमीन वाटप**




**पुढारी : चला आम्ही जमीनीचे वाटप करून टाकले!**

खलिता पायाखाली दाबून नटराजाची मूर्ती उभीच होती.

उर्सुला लारसनच्या छातीत एकदम घस्स झालं. कुठलं तरी फौंडेशन आपल्या आयुष्याचा मार्ग ठरवणार! आपल्या हाती काही नाही. असं कधी झालं नव्हतं. आजवर तिला कधी कुणी अडवलं नव्हतं. डेट् निवडताना, सिगरेट ओढायला लागण्याचे वेळी, डेव्हबरोबर स्टेडी जाताना, हिंदुस्थानात यायचं ठरवल्यावर...मनाला येईल ते मिळालं होतं, मिळवलं होतं. पण इथे आल्यावर सारंच बदलू लागलं. किळस येत राहूनही ती या भूमीत खिळून जाऊ लागली. डेव्हीडसाठी..

तिला डेव्हची उत्कटतेने आठवण झाली. आणि वाटलं, फौंडेशनचं पत्र उघडण्याऐवजी डेव्हची पत्रं, फोटो, भेटी कपाटातून काढाव्यात—अन् त्यात गुंगून जावं. डेव्ह दुरावला होता. व्हीएतनामला तो गेल्यापासून चार वर्षांत त्याची भेट नव्हती. पत्रव्यवहारही नियमित नव्हता. हात मोडलेला, ग्रीन ब्रॅरट डेव्हचा फोटो हाच अलीकडचा संपर्क. अन् नंतर बॉबने सांगितलेली त्याची माहिती. बॉबला तो वॉशिंग्टनहून इंडियाना पोलिसला जाताना एका ड्राइव्ह इन् जवळ भेटला होता. डेव्हच्या मिठीत तेव्हा एक पोरगी होती व त्याची भाषा वेगळी होती. व्हीएतनाम युद्धाने डेव्ह बदलला होता. त्याचे विचार, वागणं वेगळं झालं होतं. कदाचित् त्याला उर्सुलाची फार जरुरी असेल. बहुधा त्याला तिचं प्रेम अडगळ वाटत असेल...काय वाटत असेल? तिला नेमकं काय वाटतं?

उर्सुला अस्वस्थ झाली व खाली पडलेली सिगरेटची एकदोन थोटकं उचलू लागली. अर्धवट ओढलेल्या सिगारेटसारखी तिच्या प्रीतीभावनेची अवस्था झाली होती. व्हिएतनामकडे नजर ठेवूनच बहुधा ती भारताकडे निघाली होती. अन्—अन् बॉबने सांगितलेली डेव्हची हकीगत ऐकून तिने भारतात दोन वर्षं आणिक राहाता यावं म्हणून खटपट सुरू केली—पण त्याही आधी डेव्ह जेव्हा सायगावहून परत निघाला होता तेव्हा ती पंढरपूरला पोचली होती!

तिच्या डोळ्यापुढे पंढरपूरला निघालेला वारकऱ्यांचा मेळावा दिसू लागला. त्या वारीत ती कुतुहलाने मिसळली होती व विठोबाच्या देवळात पोचेपर्यंत भारावून गेली होती.... आत्ता वारीत चालणाऱ्या स्वतःलाच ती बघू लागली. मग सायगांवहून शेकडो अमेरिकन सैनिकांच्या रांगातून डेव्हीड चालताना तिला दिसू लागला. वारकऱ्यांची गर्दी टाळमृदंगाच्या तालावर मोक्षाचा शोध घेत चालली होती... सैनिकांच्या पलटणी भयानक मानवी संहारातून भग्न देहामनांनी माघारी येत होत्या. वारकऱ्यांच्या रांगा देहमान विसरून कसल्याशा अनामिक ओढीने पुढे सरत होत्या... सैनिकांची पावलं... सैनिक व वारकरी आलटून पालटून उर्सुलाला दिसू लागले. बॉबच्या डॉक्युमेंटरी फिल्ममधली एखादी दृश्यमालिका असावी—तसे!

ती तशीच बाहेर जायला निघाली. नौकराणीला तिने सांगितलंही नाही. टेबलावरचं पत्र उघडलं नाही की कपाटातली पर्स उचलली नाही. व्हरांड्यातली सायकल खाली काढली व अर्धवट उघड्या फाटकातून वाट काढून ती रस्त्याला लागली.

बाहेर उसळतं उन्ह शरीराला लपेटत होतं. धुळीचे लोट ठिकठिकाणी उडत होते. रस्त्याच्या कडेनी लोक निःसंकोच शौचविधी करीत होते. कुठेही जा;

(पान २१८ वर पहा)


| प्रकाशन स्थळ | ऑफसेट छपाई | रंगीत चित्र छपाई | ब्लॉक्स | छपाई |
|---|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडियो, ४०/४२, केनेडी ब्रिज, मुंबई–४ | जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस गायवाडी, मुंबई–४ | आशा प्रिंटरी खेतवाडी मुंबई–४ | धारगळकर प्रोसेस (प्रा.) लि. मुंबई–२८<br>एव्हरेस्ट ब्लॉक्स, मुंबई २८<br>प्रभात प्रोसेस स्टुडियो, मुंबई | अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन-रोड, मुंबई–४ |


**पुढील अंक क्रिकेट पुरवणीसह १ डिसेंबरला नेहमीप्रमाणे प्रसिद्ध होईल!**



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






**ए**क लहानसे बेट. समुद्र किनाऱ्यालगतचे.
मागील बाजूला जंगलाचे दृश्य. पुढील भागात काही खडक पसरलेले आहेत.

उजव्या बाजूने आतून एक तरुण स्त्री ओरडते :

"सगळे मेले कुठे गेले आहेत कुणास ठाऊक ! बाबा–बाबा ! इकडे या–इथे–या बाजूला–बाबा––"

हाका मारणारी तरुणी प्रवेश करते. मळलेला, विस्कटलेला, परंतु त्यातूनही संपन्नता दर्शविणारा वेष तिने परिधान केला आहे. चेहरामोहरा तरतरीत. केसांच्या झिपऱ्या झालेल्या. तिच्या हातात झाडाची एक फांदी आहे. संताप अनावर झालेला आहे.

**तरुणी** : बाबा ! अहो शामपूर संस्थानचे माजी चीफसाहेब ! (कमरेवर हात ठेवून क्षणभर फणफणत स्तब्ध उभी राहते. नंतर खडकावर फांदी आपटीत–) काय माणसं असतात एकेक ! अर्ध्या तासापूर्वी आपण जिवंत राहू याची कोणालाही शाश्वती नव्हती. सारी जणं अर्धा प्राण गेल्यासारखी धास्तावून बसली होती तराफ्यावर. पण या बेटावरती पाय पडताच आपण पिकनिकला आलो आहोत असं वाटतंय् सर्वांना ! (पुन्हा प्रयत्न करीत–) बाबा ! महेश ! ए शंभू, ए तारे––

**महेश** : (एका झाडामागून पुढे येतो. उंची पोशाख केलेला तरुण. मोठ्याने हसतो.) किती ओरडते आहेस सुरेखा ? एखाद्या जंगल-सिनेमातल्या सुंदरीसारखी ?

**सुरेखा** : अस्सं ! म्हणजे शेवटी मीच–तुम्ही काय झाडामागे दडून लपंडाव खेळायच्या विचारात होता ?

**महेश** : मी झाडावर चढलो होतो. माकडाची तीन गोजीरवाणी पिल्लं बसली होती वर.

**सुरेखा** : छान ! मग आपले वडील सापडले असं वाटलं असेल त्यांना ! महेश, आपण इथे सहलीसाठी आलो आहोत असं वाटतंय् तुम्हाला ?

**महेश** : (झाडाझुडपांची पाहाणी करीत.) आपण इथे कसे

आणि कशासाठी आलो हा प्रश्न आता दुय्यम झाला आहे. आपण आलो आहोत हेच एक खरं आणि महत्वाचं. आता सुखासमाधानानं राहायला हवं इथे.

**सुरेखा :** आणि ते समाधान तुम्हाला मिळतंय् माकडाची पिल्लं पाहण्यामधे ! तुम्ही असे अन् बाबा तसे. किनाऱ्याला पाय लागल्या-पासून राजेसाहेब शंखशिंपा गोळा करण्याच्या उद्योगाला लागले आहेत. ती मेली तारामती कुठे बेपत्ता झाली आहे कोणास ठाऊक ! अन् तो शंम्या तर–(हताशपणाने खडकावर बसते) परमेश्वरा !

**महेश :** (झाडाझुडपातले लक्ष बाहेर काढीत) काय म्हणालीस ?

**सुरेखा :** तुम्हाला नाही, परमेश्वराला हाक मारली मी.

**महेश :** (मागे वळून) आपल्याला ओ देऊन वैतागला असेल तो आता. बोट बुडायला लागली तेव्हा आपण परमेश्वराला हाक मारली. त्याने ओ दिली आणि आपणा सर्वांना बसता येईल असा एक तराफाही दिला. तराफा समुद्रात बुडू नये म्हणून त्याला पुन्हा हाक मारली आणि त्यानं तराफा बुडू दिला नाही. तराफ्यावर बसणं अशक्य झालं तेव्हा पुन्हा एकदा आपण त्याची आळवणी केली, आणि त्यानं या बेटापर्यंत आपल्याला आणून पोचवलं. आता राजे-साहेबांनी शंख गोळा करू नयेत म्हणून पुन्हा त्याला हाक मारून त्रास देणं म्हणजे––

## वि. वा. शिरवाडकर

**सुरेखा :** हे पाहा, मी शांतपणानं ऐकते आहे म्हणून मी शांत आहे असं समजू नका. आपल्या सर्वांवर केवढा प्रसंग गुदरला आहे याचा तुम्हा मंडळींना विसर पडलेला दिसतो.

**महेश :** कसला प्रसंग ?

**सुरेखा :** अरे देवा ! आता मी पुन्हा सगळं सांगू का ? अहो, आपण प्लेझर बोटीनं प्रवास करीत होतो–पुढे––

**महेश :** ते माहीत आहे मला.

**सुरेखा :** पण तुम्हाला हे माहीत नाही की या निर्जन बेटावर कदाचित लांडगे असतील, वाघसिंह असतील, कदाचित नरमांस-भक्षक रानटी लोकही असतील ! आपण आपल्या संरक्षणाची आणि मुक्कामाची तावडतोब तरतूद केली पाहिजे. (उठते) त्या तिकडे चांगली मोकळी जागा आहे. तिथं एक खोपटं उभारायला हवं.

**महेश :** तुझ्यासारख्या राजकन्येला खोपटं ?

**सुरेखा :** (भडकून) मग ताकद असली तर राजवाडा उभारा ! पण काहीतरी करा ! कवी आहात मला ठाऊक आहे. पण म्हणून प्रत्येक झाडाचं अन् पानाचं इतकं कौतुक नको करायला. कसला विचार करता आहात ?

**महेश :** तू आता वाघसिंहाचं बोललीस ना, त्यावरून आठवलं. मघाशी तिकडे फिरत असताना काहीतरी पिवळ्या रंगाचं झाडी-मधून झटकन् सरकताना दिसलं खरं. तेव्हा लक्षात आलं नाही. प–पण आता वाटतं की व–व–वाघच असावा तो !

**....श्री. वि. वा. शिरवाडकर (कवि–कुसुमाग्रज) हे 'दीपावली'चे प्रथमपासूनचे लेखक ! प्रकृतीने कवि आणि कीर्तीवंत म्हणूनही 'कवि' असले तरी त्यांची लेखणी 'सर्व संचारी' अशी आहे....काव्य, नाटक, निबंध, ललितनिबंध, एकांकिकादि विविध व विपुल लेखन त्यांनी केले आहे.... त्यांची कविता 'विचार–भाव–श्रीमंत' असते आणि त्यांचे गद्य काव्यात्म असते.... काव्य–गद्याच्या सीमारेषा ओळखणेच कठीण जाते.... आजवर ते 'दीपावली'ला कवितेच्या 'खिडकीतून' भेटले. आता त्यांचा हा पहा नवा (नाट्या)वतार ! !....**

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

**सुरेखा :** (घाबरून) ख–ख–खबरदार ! मला घाबरवू नका. मी–भि–भिणार नाही.

**महेश :** त–त–तसं नाही. पण––

(डावीकडील जंगलातून एक कर्णभेदक गर्जना ऐकू येते. सुरेखा–महेश भीतीने किंचाळतात. सुरेखा उडी मारून महेशचा हात पकडते. महेश तिला ओढीत एका झाडाच्या आडोशाला जातो.

तेवढ्यात राजेसाहेब बाहेर येतात. खाली सुरवार, वर साधा रेशमी शर्ट आणि डोक्यावर भरजरी पगडी–असा विसंगत पोशाख त्यांच्या अंगावर आहे. चेहऱ्यावर भरघोस मिशा आणि हातात शंखशिंपांची एक लहानशी गाठोडी).

**राजेसाहेब :** अहाहा ! असे शंख मी कधीच पाहिले नव्हते.

**सुरेखा :** (पुढे येऊन) बाबा–तुम्ही ?

**राजेसाहेब :** मी काय ?

**सुरेखा :** तुम्ही ओरडलात ?

**राजेसाहेब :** केव्हा ?

**सुरेखा :** आता ?

**राजेसाहेब :** आत्ता काय ?

**सुरेखा :** (ओरडते) ओरडलं कोण ?

**राजेसाहेब :** तूच ओरडते आहेस आता.

**सुरेखा :** आता नाही, मघा.

**राजेसाहेब :** आत्ता का मघा ? मघाशी तर आत्ता म्हणालीस आणि आता मघा म्हणते आहेस.

**सुरेखा :** (डोकं दाबून धरीत) बाबा ! माझं डोकं फिरेल अशा बोलण्यानं. अहो, दोन मिनिटापूर्वी हो करून कोण ओरडलं मोठ्यानं ? नरमांसभक्षक रानटी माणसासारखं ?

**राजेसाहेब :** इथे नरमांसभक्षक आहेत ? माणसं गाजरा-सारखी कचाकचा चावून खातात ते ?

**सुरेखा :** ओरडलं को ऽ ण ?

**राजेसाहेब :** मघाशी ? हो. मीच ओरडलो.

**सुरेखा :** का ?

**राजेसाहेब :** का ? बापाच्या राज्यात आमची संस्थानं गेली,





अनुक्रमणिका

आता मुलीच्या राज्यात तनखेही चालले आहेत. पण म्हणून राजाचा ओरडण्याचा हक्क नाहीसा झाला आहे असं मी समजत नाही. लोकशाहीत ओरडण्याचा हक्क मूलभूत आहे. राजालाही. सुंदर शंख सापडल्यावर कोण ओरडणार नाही ?

**सुरेखा :** बाबा, व्याख्यान नकोय् मला. मला खुलासा हवा आहे. या बेटावर नरमांसभक्षक, वाघसिंह, भूतपिशाच्च कोणीही असायची शक्यता आहे. म्हणून खुलासा हवाय मला.

**राजेसाहेब :** आत्ता तू हे सांगितल्यावर मला आठवलं. शंख सापडला म्हणून मी ओरडलो नाही. ओरडलो पण ते तिकडे समुद्राच्या काठाशी. आत्ता ओरडलो तो मला एक नरमांसभक्षक दिसला म्हणून. नक्की तोच.

**सुरेखा :** न–न–नर–मांस–भ–भक्षक !

**महेश :** त–त–तुम्हाला द–दिसला ?

**राजेसाहेब :** शंकाच नाही. आपण मुंबईला मागे टार्झन सिनेमा पाहिला होता ना ? त्यात कसा तो एक नरमांसभक्षक होता, झाडावरून धप्पकन् खाली उडी मारणारा ? गळ्यात कवट्यांची माळ घालणारा, हातात लांबलचक भाला घेतलेला, कमरेला आतड्याचा पट्टा बांधलेला––

**सुरेखा :** बाबा !

**राजसाहेब :** त्या पलीकडच्या झाडावरून तशीच उडी मारली त्यानं–धप्पकन्! मला अगोदर वाटलं एखादं माकड असेल. पण जेव्हा तो जंगलातून धावायला लागला–धप्प–धप्प–धप्प–तेव्हा समजलं हा माकड नसून माणूस आहे. नरमांसभक्षकच तो. त–त–ते ध्यानात आल्यावरच म–म–मी–ओरडलो –म–मोठ्यानं–हो–हो–म्हणून.

(राजेसाहेब प्रात्यक्षिक म्हणून मोठ्याने ओरडतात. त्यांचे ओरडणे संपायच्या आतच आतील बाजूने आणखी एक कर्कश गर्जना होते. राजेसाहेब पगडी हातात घेऊन ओरडत पलीकडे धावतात. महेश व सुरेखाही चित्कार करीत पुन्हा झाडाच्या आडोशाला जातात.

शंभू प्रवेश करतो. जरा पहिलवानी धाटाचा. अंगावर हुजऱ्याचा पोशाख. त्याने एका खांद्यावर चारपाच अनगड बासे घेतले आहेत आणि दुसऱ्या हातात कसले तरी बोचके आहे.

**शंभू :** कुठं गेले सगळे साहेब लोक कुणास ठाऊक ! ती चेंगट मावशीही तिकडेच खुडबुड करीत बसली आहे. (पलिकडे जाऊन) ए तारेऽ ऽ–ए–ओ–

(त्याच्या गर्जना चालू असता मागील बाजूने तिघेजण पुढे सरकतात.)

**राजेसाहेब :** शंभू–

**शंभू :** (मागे येऊन) जी सरकार.

**राजेसाहेब :** आता तिकडे ओरडलं कोण ? ओ–करून !

सुरेखा : बाबा प्रात्यक्षिक करू नका. माझ्या कानठळ्या बसल्या







आहेत आता. शंभू.

**शंभू :** जी सरकार.

**सुरेखा :** तू ओरडलास मघाशी ?

**शंभू :** हो–सरकार.

**राजेसाहेब :** म्हणजे तो नरमांसभक्षक नव्हता ? खात्री आहे तुझी ?

**शंभू :** नरमांस–कोण ?

**राजेसाहेब :** भक्षक. नरमांसभक्षक. माणसं गाजरासारखी कचाकचा खाणारा. तो झाडावरून धप्पकन् खाली उडी मारतो, गळ्यात कवट्यांची माळ घालतो, कमरेला––

**सुरेखा :** बाबा ! कृपा करून वर्णनही करू नका ! शंभू, तू का ओरडलास ?

**शंभू :** तसं काही खास कारण नव्हतं सरकार. बऱ्याच दिवसात ओरडलो नव्हतो म्हणून ओरडलो.

**सुरेखा :** या बेटावरच्या हवेनं तुम्हा सर्वांची माथी भडकलेली दिसतात. ती तारा कुठ आहे ?

**शंभू :** पानांच्या झडपा तयार करते आहे ती, बाईसाहेब.

**सुरेखा :** ठीक आहे. आपण आपलं सामान ठेवलंय् ना, तिथेच छप्पर उभं करायला सुरुवात करा. तावडतोब. रात्र पडायच्या आत झोपडी उभी राहायला पाहिजे.

**शंभू :** जी. सरकार.

**सुरेखा :** तराफ्यावरचं सगळं सामान नीट तपासून ठेवलं ?

**शंभू :** जी, सरकार.

**सुरेखा :** धान्याचे अन् चहा–दुधाचे सगळे डबे आणले ?

**शंभू :** जी, सरकार.

**सुरेखा :** अंथरापांघरायचं ?

**शंभू :** आणलंय् सरकार.

**सुरेखा :** ठीक आहे. ताराला म्हणावं अर्ध्या तासात चहा अन् खायचं तयार करून ठेव. आम्ही येतो तिकडे. जा.

**शंभू :** जी, सरकार. (जातो.)

**महेश :** मला वाटतं, आपण मदत करायला जावं त्यांना.

**सुरेखा :** काही गरज नाही. नोकरांची कामं नोकरांनीच करावी. ––बाबा, शंखशिंपा मोजणं संपलं नाही अजून ?

**राजेसाहेब :** (निराशेने) कधीच संपायचं नाही ते. कारण प्रत्येक वेळेला बेरजेचा वेगळा आकडा येतो. ठीक आहे, माझ्या प्रजेचं काय म्हणणं आहे ?

**सुरेखा :** तुमची प्रजा म्हणून मीच फक्त शिल्लक उरले आहे. आणि या प्रजेचं म्हणणं एवढंच आहे की आपण कुठे आहोत, कसे आहोत याचा सर्वांनी विचार करायला पाहिजे आणि येथील व्यवस्था लावायला हवी.

**राजेसाहेब :** अच्छा. महेश, हे शंख तुम्ही जरा वेळ सांभाळा. आता एकदम शांत उभे राहा. मला विचार करणं आवडत नाही, पण करतो. (क्षणभर डोळे मिटून) आपण एका निर्जन बेटावर आलो आहोत. हे बेट जंबुद्वीपातच असावं अशी माझी कल्पना आहे. बरोबर ?

**महेश :** जंबुद्वीप भूगोलात नाही, राजेसाहेब.

**राजेसाहेब :** माझा घोटाळा झाला! मग हे बेट आशिया खंडात तरी असावं असं मला वाटतं. बरोबर ?

**सुरेखा :** बाबा, भारताचा किनारा सोडून आपल्याला फक्त चार तास झाले असतील––

**राजेसाहेब :** ठीक आहे. हे बेट भारताचं आहे. पण भारताला अद्याप सापडलेलं नाही. तेव्हा या बेटावर तूर्त माझं राज्य आहे. इंदिरा गांधी येथे येईपर्यंत. मान्य ?

**महेश :** एकदम मान्य.

**राजेसाहेब :** तर मी आता या राज्यासाठी एका दिवाणाची नेमणूक करतो. म्हणजे यापुढचा सर्व विचार तो करील.

**सुरेखा :** नुसता विचार नाही, सर्व कारभारही. तुमच्यासगट सर्वांनी दिवाणाचं ऐकलं पाहिजे. विनतक्रार.

**राजेसाहेब :** कबूल. मला वाटतं, आपण त्या शंभूला दिवाण करावं. त्यातल्या त्यात तो बरा आहे.

**सुरेखा :** नको. उद्या देशात परत गेलो म्हणजे ते आपल्या डोक्यावर बसायचे. आणि काही झालं तरी हुजऱ्यांना दिवाण करता कामा नये.

**राजेसाहेब :** हो. तेही खरंच. मग....

**सुरेखा :** मीच दिवाण व्हायचं ठरवलंय्.

**राजेसाहेब :** वा ! ते तर फारच उत्तम ! की या महेशला––

**सुरेखा :** तेही नको. लग्नाच्या पूर्वीच माझ्यावर सत्ता गाजवायला नको त्यांनी. शिवाय ते कवी आहेत. त्यांना अशा भानगडी जमायच्या नाहीत.

---

**जय समाजवाद !**




**सामान्य माणसाचे स्थान 'उंच' आहे !**

---

अनुक्रमणिका

**राजेसाहेब** : हे ठरलं ! तू दिवाण. साऱ्या कारभाराची जबाबदारी तुझ्यावर. आता मला याचा विचार करा अन् त्याचा विचार करा असं सांगायचं नाही. (महेशला) द्या ती गाठोडी इकडे.

(आतून तारामती किंचाळते, बाईसाहेब–बाईसाहेब––)

**सुरेखा** : आता या सटवीला कंठ फुटला ! तीच एक राहिली होती.

(तारामती धावतच येते. साधारण सुरेखाच्याच वयाची, सावळी पण आकर्षक, नोकराला साजेलसा पोशाख केलेली.)

**तारामती** : (धापा टाकीत) बाईसाहेब––

**सुरेखा** : अग काय झालं किंचाळायला तुला ? चहा केलास का ?

**तारामती** : चहा झाला–पण आपण सर्वांनी–म्हणजे तुम्ही तिघांनी त्या–त्या उंच झाडावर चढून बसायला पाहिजे.

**महेश** : झाडावर ?

**सुरेखा** : तुझं डोकं फिरलंय् का ?

**तारामती** : बाईसाहेब–या पलीकडच्या जंगलात आता एक वाघ शिरलेला पाहिला आम्ही !

**राजेसाहेब** : (ओरडतो) व–व–वाघ !

**सुरेखा** : व–व–व–वाघ ! ओरडू नका–घ–घ–घाबरू नका ! म–म–महेश––

**महेश** : (एका झाडाला विळखा मारून) हो, मी, या झ–झ–झाडावर चढतो––

**तारामती** : मालकमंडळींना माझी विनंती आहे की त्यांनी इतकं घाबरून जायचं कारण नाही. आपण सावध असावं म्हणून मी इशारा दिला. वाघ लहान आहे आणि दोन फर्लांग दूर आहे.

**राजेसाहेब** : तरी पण आपण झाडावर चढावंच.

**तारामती** : तुम्हाला तसं जमायचं नाही ते. मी मदत करायला शंभूला हाका मारते (ओरडते) शंभू–शंभू––

**राजेसाहेब** : कार्टे, मोठ्यानं ओरडू नकोस. वाघाला वाटेल आपल्यालाच कुणी बोलावतंय्.

**महेश** : मी घेऊन येतो त्याला.

**सुरेखा** : (त्याला अडवून) काही गरज नाही. बाबा, महेश, कुणीही आपलं डोकं स्वतंत्रपणानं चालवायचं नाही. निर्णय घेणारी मी आहे. हा शंभू आला ! (शंभू येतो) शंभू––

**शंभू** : आता फक्त छप्पर टाकायचं राहिलंय्, सरकार. या तारीनं हा हा म्हणता चारी बाजूला झडपा बांधल्या.

**राजेसाहेब** : शाबास ! मी स्वदेशी गेल्यावर––

**सुरेखा** : (फांदी आपटून) थांबा ! कुणीही बोलायचं नाही. शंभू, तारे––

**शंभू : तारामती** : जी, सरकार.

**सुरेखा** : पहिली गोष्ट म्हणजे वाघाचं पारिपत्य करायला हवं. आणि ते तुम्ही दोघांनी करायला हवं.

**तारामती** : होय, बाईसाहेब.

**राजेसाहेब** : मला वाटतं, झाडीतून आवाज येतोय्––गुर्रर्र–गुर्रर्र––

**सुरेखा** : आम्ही झोपडीत जातो. तुम्ही दोघं त्या जंगलात जा. वाघ आरडाओरडीला व जाळाला भितात. तुम्ही गवताच्या पेंड्या पेटवा आणि आरडाओरड करीत वाघाला पळवून लावा. या जंगलाच्या बाहेर घालवा त्याला.

**महेश** : सुरेखा, मला वाटतं, आम्ही दोघा पुरुषांनी जावं शंभूबरोबर. तारामतीला––

**सुरेखा** : तुम्ही दोघं पुरुष आहात हे वाघाला कळेलच असं नाही ! जायला हवं या दोघांनीच. शौर्य आणि स्वामीनिष्ठा दाखवायची ही संधी मिळते आहे त्यांना. तुमचं कविहृदय विरघळ-ण्याचं कारण नाही.

**महेश** : पण त्यांना ही संधी नको असेल तर ?

**सुरेखा** : तर ती आपण त्यांना सक्तीनं द्यायला पाहिजे. पण ही चर्चा करण्याची वेळ नाही. सारं बोलणं बंद ! तारामती––

**तारामती** : जी, बाईसाहेब.

**सुरेखा** : शंभू–

**शंभू** : जी, सरकार.

**सुरेखा** : माझा हुकूम मान्य आहे ?

**तारामती : शंभू** : होय, बाईसाहेब.

**राजेसाहेब** : (कान देऊन) आवाज ज–ज–जवळ यायला लागलाय्. गुर्रर्र–गुर्रर्र––

**सुरेखा** : काडयाची पेटी आहे, शंभू ?

**शंभू** : आहे, सरकार.

**सुरेखा** : मग शिरा या जंगलात तावडतोब. वाघ जंगलातून पिटाळल्याशिवाय परत यायचं नाही–(जवळपास वाघाची गर्जना होते).

**महेश : राजेसाहेब** : (धावपळ करीत) व–व–वाघ ! आ–आ–आला !

**सुरेखा** : ज–ज–जा ! आम्ही झ–झ–झोपडीत जातो–– वाघाला पिटाळल्याशिवाय आलात तर ख–ख–खबरदार !

(तिघेजण धावत पळत आत डावीकडे जातात.)

**तारामती** : चला शंभू महाराज. पेटवा हे गवत आन् ओरडा-यला सुरवात करा. (किंचाळते).

(रंगमंचावर अंधार होतो. दोनचार गवताच्या पेंढ्या पेट-लेल्या दिसतात. त्यानंतर आतील बाजूने शंभू–तारामतींची आरडा-ओरड कानावर येते.

क्षणभराने पूर्ववत् प्रकाश येतो. पूर्वीच्या दृश्यानंतर सुमारे अर्धा तास होऊन गेला आहे.

तारामती खडकावर एकटी बसली आहे. शिणल्यासारखी. हातालगट एक फांदीची काठी आणि समोर जळलेले गवत पडलेले दिसते.

डाव्या बाजूने महेश येतो. लांब उभा राहून क्षणभर तारामती-कडे पाहतो व नंतर लक्ष वेधून घेण्यासाठी खाकरतो.)

**तारामती** : (एकदम उठते व किंचाळते.)

**महेश** : तारामती. (पुढे येतो.)

**तारामती** : माफ करा साहेब. मला वाटलं, वाघच आला पुन्हा.

**महेश** : वाघ ? सुंदर बायकांना पाहून वाघ खाकरत नाहीत असे.

**तारामती** : कुणास ठाऊक ! माझ्यासारख्या मोलकरणींना या गोष्टी माहीत नसतात.

**महेश** : तू थकलेली दिसतेस, तारा.

**तारामती** : (हसून) छे. अजून दोन वाघांच्या अंगावर जाऊ शकेन मी !

**महेश** : तुला मघाशी वाघाची भीती वाटली नाही ?

**तारामती** : न वाटायला काय झालं ? तो वाघ डोळे रोखून पाहायला लागला तेव्हा प्राण थेट कंठापर्यंत आला होता.

**महेश** : मग काय केलंस तू ?

**तारामती** : आणखीन् जोरानं किंचाळले आणि पेटलेले गवत त्याच्यापुढे फेकीत राहिले. शंभूनंहि तसंच केलं. शेवटी नको हा त्रास म्हणून हलके हलके वाघ निघून गेला तो.

**महेश** : तारा, एक विचारू तुला ?

**तारामती** : विचारा की.

**महेश** : आमच्याबद्दल तुला खूप तिटकारा वाटत असेल, नाही ?

**तारामती** : का म्हणून ?

**महेश** : आम्ही तुला जंगलात पाठवलं आणि स्वतः झोपडीत

[ पान १८७ वर पहा ]








मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास



कालिदासकृत

## मालविकाग्निमित्र

मालविकेची लाथ लागता
वांझ वृक्षही फुलती
अग्निमित्र तर रसिकराज
तो कटाक्ष त्या पुरती

दीपावली
'७०










अनुक्रमणिका




मधु मंगेश कर्णिक

का तरवेळ झाली आहे. या हिलस्टेशनवरील हे हॉटेल मोठे सुरेख आहे. मघांपासून दारातल्या झाडावर एक रातकिडा अगदी वेगळाच आवाज करतो आहे. घुंगुरांचा तालबद्ध छुनछुनाट ऐकू यावा तसा हा रातकिडयाचा विलक्षण आवाज आहे. हॉटेलच्या व्हरांड्यात वेताच्या आरामखुर्चीवर आळसटल्यासारखा पडून मी रागिणीची वाट पहातोय्. मी दुपारी चारच्या गाडीने पुढं एकटाच आलो... रागिणी सायंकाळच्या गाडीनं येणार आहे. या हिलस्टेशनवर सायंकाळी मुंबईहून फक्त दोन गाड्या येतात. रागिणी आणि मी एकत्र येऊ शकलो नव्हतो. तसं आम्हाला कधीच शक्य झालं नव्हतं आजवर. मुंबईत जसे आम्ही ठरलेल्या संकेतस्थळी वेगवेगळ्या ठिकाणांहून स्वतंत्रपणे निघून ठरलेल्या वेळी पोचत असू, तसेच बाहेरगांवीही जेव्हा एकाददुसरा दिवस एकमेकांच्या सहवासात काढायचं ठरे, तेव्हाही दोघेही वेगवेगळ्या गाड्यांतून प्रवास करून ठरलेल्या हॉटेलात एकदमच भेटत असू...असं केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतं... रागिणी विवाहित होती. अर्थातच माझ्याशी नव्हे. ती आपल्या नवऱ्याची पत्नी होती आणि माझी प्रेयसी होती. माझ्यावर ती लुब्ध होती आणि वरचेवर अशी मला भेटतही होती...आजही शनिवारची सुट्टी साधून आम्ही या हिलस्टेशनवर यायचं ठरवलं होतं. शनिवार संध्याकाळ ते सोमवार पहाटेपर्यंतच्या घटका सुखात आकंठ डुंबत आम्ही घालवणार आहो. रागिणीसोबत वीकएंड साजरा करणं ही कोणाही पुरुषाच्या आयुष्यातली परमोच्च सुखाची गोष्ट होती...रागिणीची मी आतुरतेने वाट पहात होतो.

रातकिडा घुंगुर वाजवीतच होता. खाली दरीत धरणावर विजेच्या दिव्यांचा लखलखाट माजला होता नि समोर हॉटेलच्या दारातल्या मोकळ्या जागेत पावसाळ्याचापूर्वीचे काजवे थव्याथव्यांनी विहरत होते. खाली दरीत खोलवर विजेचे दिवे, समोर झळकणाऱ्या काजव्यांचे छत वाढता आणि अस्वस्थ करणारा काळोख. हा रातकिड्यांचा कधी न ऐकलेला पण पुन्हापुन्हा ऐकावासा वाटणारा घुंगुरवाळा नाद.... याक्षणी आता रागिणी जवळ हवी होती..मन पेटून उठलं...समोरच्या रस्त्यावर पांखरू होऊन भटकू लागलं...रागिणीसाठी व्याकुळ झालं.

आणि रागिणी आली--

**....गेली तीन वर्षे 'दीपावली'च्या दिवाळी अंकातून एकापेक्षा एक सरस अशा कथा लिहून सूर सतत वरचा कायम ठेवणारे श्री. मधु मंगेश कर्णिक हे आजच्या पिढीचे एक नामवंत लेखक ... त्यांच्या 'माहीमची खाडी' या कादंबरीने साहित्यक्षेत्रात खूपच खळबळ उडवून दिली होती ... प्रस्तुत कथाही तशीच प्रक्षोभक ठरावी ...**

हॉटेलच्या दारात कसल्या तरी सुवासिक वेलींचे कुंज बहरले होते आणि त्या कुंजातून दिवे पेटत होते. त्या दिव्यांच्या प्रकाशातून उंचीपुरी आणि तारुण्याने रसरसलेली रागिणी वेड लावणाऱ्या चालीने मदालस पावले टाकीत येताना मला दिसली आणि मला आरामखुर्चीत बसणे अशक्य झाले. मी तातडीने उठलो. वेअररसाठी वेल वाजवली.. . व्हिस्की, सोडा, बर्फ सारे तयार करायला हवे होते. रागिणीला यायला उशीर झाला होता नि आता अधिक वेळ दवडणे मला मानवणारे नव्हते.

रागिणी खोलीत शिरताक्षणी मी एखाद्या नवथर प्रेमिकाच्या अनावर ओढीने तिला मिठीत घेतले.. . .माझा अधीरपणा तिच्या गेल्या वर्षभरात चांगला परिचयाचा झाला होता.. .पण तरीही उघड्या दरवाज्याकडे पहात तिने स्वतःला सोडवून घेतले नि बेअरर ऑर्डर घेऊन जाताच तिनेच मला बाहुपाशात घेतले––

रागिणीवर मी मिळविलेले वर्चस्व हा मी माझ्या पौरुषाचा एक दैदिप्यमान विजय मानीत होतो. रागिणी होतीच तशी. जवढी सुस्वरुप तेवढीच बुद्धिवान. अत्यंतर सुंदर स्त्रीची बुद्धीशी फारकत असते, या सुप्रसिद्ध विधानाला रागिणी ही एक विस्मयकारक अपवाद होती. तिच्या सौंदर्याचे तेज अधिक धारदार होते की बुद्धीची कुशाग्रता अधिक टोकदार होती, याचा माझ्यासारख्याला संभ्रम पडे. . . मीही कुणी साधासुधा माणूस नाही आहे. एक नामवंत आणि अगदी तरुण वयात आपल्या कर्तबगारीची चमक दाखवलेला पत्रकार म्हणून जग मला ओळखतं. एका अग्रेसर वृत्तपत्राचा मी मुख्यसंपादक आहे. रागिणीच्या नवऱ्याचा अणि माझा या माझ्या व्यवसायामुळे नित्य संबंध येतो. रागिणीचा नवराही तिला तोडीस तोड असा बुद्धिवंत आहे. एक सखोल व्यासंगाचा विद्वान विचारवंत म्हणून जग त्याला ओळखतं. एका प्रमुख महाविद्यालयाचा तो प्राचार्य आहे. राजकारण, तत्त्वज्ञान, सौंदर्यशास्त्र आणि समाजकारण या 'साऱ्या'क्षेत्रात प्राचार्य सागर यांची कीर्ती दिगंत आहे. जपानला ते आणि मी एका परिसंवादाला एकदमच गेलो होतो, तेव्हा रागिणीशी माझी प्रथम ओळख झाली. . . .रागिणी मला पाहताक्षणी आवडली.

पहिल्याच भेटीत रागिणीचेही लक्ष मी वेधून घेतले असल्याचे माझ्या ध्यानात आले. माझ्या दृष्टीने ते ठीक होते. अपेक्षित होते. माझ्या मनासारखी स्त्री मला दिसली म्हणजेच केवळ मी संतुष्ट नसे. तिचं लक्षही माझ्याकडे लागून राहिलं पाहिजे, अशी माझी इच्छा असे. एकतर्फी वाहतूक मान्य करणारा माझा स्वभाव नव्हता. . .

हा माझा स्वभावच अनेकदा माझ्याबद्दल गैरसमज नि घोटाळे माजवतो. वृत्तपत्रसृष्टीत मी उच्चपदी असूनही मला टाळणारे अनेक लोक मला माहीत आहेत. माझी मुलुखावेगळी मतं आणि माझं त्यांना विचित्र वाटणारं वर्तन, हेच त्याला कारण असतं. या माझ्या वागण्यामुळे समाजात तसा मी बदनामच आहे. पण माझ्या स्वभावानुसार मला त्याची पर्वा वाटत नाही. माझ्यापाशी असलेल्या दुर्मिळ मानवी गुणांचा मला विलक्षण अभिमान आहे. माझं माझ्यावर अतिशय प्रेम आहे. माझ्यानंतर मी प्रेम करू लागलो तो फक्त माझ्या मनात भरलेल्या स्त्रीवरच––

रागिणीवर मी तसंच प्रेम करू लागलो. आणि रागिणीनेही त्याला तत्काळ प्रतिसाद दिला. इतरांना चमत्कारिक वाटणाऱ्या, पण मला मनापासून पटलेल्या माझ्या विवक्षित मतांचा तो विजय होता. एका परीने माझ्या पौरुषाचाच विजय होता. कारण माझं समग्र व्यक्तिमत्त्व हे मी एक संपूर्ण पौरुष मानत आलो आहे––

जपानला असताना प्राचार्य सागर परिसंवाद आटोपताच तेथील इतिहास तत्त्वज्ञान इत्यादी क्षेत्रातील त्यांच्या स्नेह्यांशी चर्चा करण्यासाठी निघून जात नि मी आणि रागिणी एकटे उरू–अशाच एका सायंकाळी तेथील हॉटेलच्या गच्चीवर आमच्या गप्पा चालल्या होत्या. समोर पावसाच्या लाटा वरसत होत्या. बुकेरी पावसातून समोरचा हिरवा डोंगर मोठा शोभिवंत दिसत होता. . .माझ्या नि रागिणीच्या समोरील ठेंगण्या टीपॉयवर जपानी मद्याचे छोटे चषक मांडलेले होते नि आम्ही बोलत होतो––

"पुरुषाजवळ देता येण्याजोगं असतं ते त्यानं स्त्रीला संपूर्ण देऊन टाकावं–" मी म्हणालो.

"पुरुषाजवळ स्त्रीला संतुष्ट करणारी एकच शक्ती असते. . . ती म्हणजे त्याचं पौरुष. . .ते योग्यस्थळी ग्रहण केलं जावं, असं त्याला वाटणं साहजिक आहे–पण पुष्कळदा तसं होत नाही. उत्तम स्त्री नि तिला अनुरुप असा उत्तम पुरुष यांची सांगड सहसा बसत नाही. समाजात शेकडा नव्वद टक्के जोड्या विजोड आणि बदसूर असतात–" रागिणी बोलत होती.

'खरं आहे . . . . . म्हणून मी माझी काही ठाम मतं बनवली आहेत––'

'त्याचाच परिणाम म्हणून तू अद्याप अविवाहित राहिलास का?' माझ्या एकटेपणाबद्दल अनेकांना कुतूहल वाटायचं. तेच कुतूहल रागिणीच्याही बोलण्यातून व्यक्त होत होतं. 'तुला अनुरुप जोडीदारीण कदाचित अद्याप लाभली नसेल.'

रागिणी मोकळेपणाने बोलत होती. त्या संध्याकाळच्या उत्तेजक वातावरणात रागिणी एखाद्या प्रफुल्ल उर्वशीसारखी












भासत होती. तिचा उंच बांधा आणि प्रमत्त उरोज यांनी मी क्षणोक्षणी डिवचला जात होतो. मनात येत होते की; या अष्टांग सुंदर स्त्रीसाठी खरोखरी आदर्श पुरुष सर्वस्वी मीच आहे. आणि त्याच क्षणी प्राचार्य सागर यांची मूर्ती तिथे प्रगट झाली. रागिणीच्या मानाने सागर खूप वयस्क होते. त्यांचे पोट सुटलेले होते. डोक्यावर प्रशस्त टक्कलाने मुक्काम केला होता आणि त्यांच्या बुद्धिजीवी डोळ्यात बायकोबद्दलची ओढ कणभरही वाटत नव्हती. एखाद्या परक्या कुटुंबाशी तटस्थतेने वागावे तसे सागर वागत होते. आताही ते अशा रीतीने आले नि आमच्यात मिसळले की मी नि रागिणी ही पतीपत्नी आहो नि आम्हा दोघात प्राचार्य सागर म्हणजे कुणी त्रयस्थ असामी घुसू पहात आहे !

'काय चालली आहेत बोलणी ?'

रागिणीने निर्विकारपणे त्यांच्यासमोर मद्याचा चषक सरकवला आणि माझे नि तिचे जे बोलणे चालले होते त्यापैकी एकही शब्द प्रोफेसर महाशयांना कळू दिला नाही....

मग तेच आपल्या विषयावर बोलत राहिले...

त्या संध्याकाळपासून रागिणी आणि मी एकात्म झालो. सागरांपासून जे रागिणीला मिळाले नव्हते ते सारे मी तिला यथेच्छ देत होतो आणि रागिणी तृप्त होत होती. मात्र अनेकदा ती माझ्याशी एकाच प्रश्नावर हुज्जत घालीत असे; व तो म्हणजे मी लग्न का करीत नाही ? आणि अनेक स्त्रियांशी संबंध ठेवण्यात मला गैर वाटत नाही कसे ?

याबाबतीत माझे जे विचार म्हणा किंवा तत्त्वज्ञान म्हणा होते, ते सर्वसामान्य जगाला मानवणारे नव्हते. वस्तुतः ते मला बदनामीकारकच होते. आणि तेच मी रागिणीला अनेकदा ऐकवले होते. माझे तत्त्वज्ञान हे एका पुरुषाचे होते - नराचे होते. पण त्याचा सवंग अर्थ मला अभिप्रेत नव्हता. रागिणीसारख्या बुद्धिमतीला माझ्या विचारांची बैठक कशी आकलन होत नाही, याचे मला कित्येकदा आश्चर्य वाटे. केवळ स्त्रीसुखासाठी मी हे करतो, हे सत्य नव्हते. जगात कोणत्याही सामान्य सुखाइतकेच स्त्रीसुख सहजसुलभ व माझ्यासारख्याला विनासायास उपलब्ध होऊ शकले असते... माझ्या संस्थेची जी तीन मासिके होती. त्यातील एक स्त्रियांचे मासिक अतिशय लोकप्रिय होते. त्या मासिकात आपल्या साहित्यकृतींना प्रसिद्धी मिळावी यासाठी समाजातील कित्येक उच्चभ्रू महिला माझ्याभोवती पिंगा घालीत... त्यांची प्रसिद्धीलोलुपता नि माझी त्यांच्याविषयीची आसक्ती यांचा मेळ मी घालतो. तर कित्येक प्रतिष्ठित प्रमदांशी मी सहज शय्यासोबत करू शकलो असतो. पण माझ्या लेखी या झाल्या प्रकाराला अर्थ नव्हता. मला सहज प्राप्त होऊ शकणारी प्रत्येक स्त्री मुळीच नको होती. आणि हेच मी रागिणीला परोपरीने सांगू पहात होतो

'जिला पुरुषाचीच भूक असते, तिच्यासाठी मी स्वतःला गहाण टाकतो'—मी एकदा रागिणीला म्हणालो होतो.

"माझ्यासारख्या अडलेल्या स्त्रियाच फक्त तुला दिसत असतील."

"होय; एका परीनं तुझं म्हणणं बरोबर आहे. सागरांशी तुझं लग्न म्हणजे एक अनैसर्गिक व्यवहार ठरला आहे."

"अशा अडचणीत सापडलेल्या बायकांवर हुकूम गाजविण्यात कोणता पुरुषार्थ आहे ?"—थोडे अडखळत रागिणी म्हणाली, "कदाचित तुझ्याऐवजी माझ्या संगतीत अन्य कुणी आला असता. माझी गरज प्रासंगिक होती. वेळेला गरज भागविणारे खूपजण असतात. जगभर हेच घडतं."

"तर मग तू तुझ्या घरच्या ड्रायव्हरशी रमणीय झाली असतीस काय ? तोही एकवेळ तुझ्या नवऱ्यापेक्षा श्रेष्ठ ठरला असता. तो तगडा आहे. रगदार आहे... कांकणभर माझ्याहीपेक्षा भयिकच—"

'तू एक शुद्ध अनाडी माणूस आहेस... तुझ्याशी वादविवाद करणं मला बिल्कुल अशक्य आहे—' रागिणी हंसत म्हणे नि आमचे बोलणे खुंटे. परंतु माझ्या वागण्याचा अर्थ मी तिला या घटकेपर्यंत कधीही नीट समजावून देऊ शकलो नव्हतो आणि तो तिला कळू शकला नव्हता. तिच्या दृष्टीने मी एक आदर्श पति ठरलो असतो. कुणाही अनुरूप स्त्रीशी कायमचा बद्ध होऊन मी माझे हे वावगे, अनीतीचे व विलक्षण जिणे संपवायला हवे होते.

संध्याकाळी या हॉटेलात आल्यापासून मी थोडासा अस्वस्थ होतो. दिवेलागण होत आली तशी ती अस्वस्थता वाढू लागली होती. समोरच्या दरीतले दिवे, काजव्यांचा अशब्द पाऊस नि रातकिड्याचा घुंगुरनाद या साऱ्यात मी स्वतःला हरवू पहात होतो, पण रागिणी आल्याबरोबर ती सारी अस्वस्थता लोपली होती. मी पूर्वीसारखाच उल्हसित होऊन स्नानगृहातून येणाऱ्या रागिणीची वाट पाहू लागलो. टेबलावर मद्य तयार होते.

मग रागिणी आतल्या खोलीतून बाहेर आली. स्वच्छ सायंस्नान करून आणि पाठीवर सावलीसारखा विलोल केशसंभार मोकळा सोडून ती माझ्यापाशी येऊन उभी राहिली. शरीराभोवती फक्त एक टॉवेल तिने गुंडाळला होता. मी एकटक लावून तिच्या सुस्नात रूपाकडे पहात होतो. माझ्या डोळ्यांत मस्ती चढली होती आणि गात्रात रग मावत नव्हती. एकाएकी मला कसली तरी शंका आली. रागिणीकडे मी जणु नव्यानेच पाहिले. कसली तरी खात्री पटून मी उद्गारलो—

'रागिणी, तू—तू..यू आर प्रेग्नंट ! तू आई होणार आहेस— ?'

'येस डियर, तुझ्या मुलाची मी लवकरच माता बनणार आहे... आय् ॲम सो व्हेरी हॅपीऽऽ सो व्हेरी कंटेंट—' एका आवेगाने रागिणी तशीच पुढे सरकली आणि पाठीमागून माझ्या गळ्याभोवती हात गुंफीत कुजबुजली—'तुझा मला अभिमान वाटतो.. तू मला मातृत्व दिलंस—मला पूर्णता दिलीस..आय् लव्ह यू सो इमेन्सली—'

अनुक्रमणिका

आणि खाली झुकून तिने माझे खोलवर चुंबन घेतले. तिच्या घनदाट सुगंधी केसात माझा चेहरा झाकला गेला–

त्या क्षणानंतर मला विलक्षण रितेपणा जाणवला––

होय, अशा प्रत्येक वेळी हाच रितेपणा, हीच कातरता आणि हीच संपलेपणाची आणि त्याचवेळी पूर्णतेची असह्य जाणीव मला पोखरीत असे. रागिणीबाबत मला आलेला अनुभव नवा नव्हता. तिला तो नवा आणि ताजा असला तरी माझ्या दृष्टीने तो शिळाच होता. पूर्वी घडले होते त्याचीच पुनरावृत्ति रागिणीच्याही बाबतीत घडली होती; आणि त्या पुनरावृत्तीने मला रिक्त आणि तुडुंब बनवले होते. रागिणी जशी आज माझ्यापासून गर्भवती झाली, तशा किमान पाचपन्नास स्त्रिया मी आजवर पूर्णतेला नेल्या होत्या. माझ्या पौरुषाची साभिमान जाणीव जेव्हापासून मला झाली, तेव्हापासून मी त्याचा असा सार्थ वापर केला होता. जिथे त्याची नितांत आवश्यकता होती, तिथं मी ते मुक्तपणे पेरले होते, आणि मग त्या त्या वेळी भेटलेली प्रत्येक स्त्री सफळ होऊन मला हेच म्हणाली होती–'आय् अॅम सो हॅपी ऽऽ सो कंटेंट! यू मेड मी मदर– तुझ्यामुळे मी माता बनले––मी तुझी ऋणाईत आहे....तुझी लाचार आहे–'

मातृत्वासाठी लाचार बनलेल्या मी मी म्हणणाऱ्या स्त्रिया एकीमागून एक ओळीने मला आठवल्या. एक गर्व वाटला. इतक्या-जणींच्या उदरात मी माझा वंश पेरला. त्यांच्या जीवनाला अर्थ दिला; आकार दिला–परमेश्वराने जगात जेव्हा माणूस निर्माण केला, तेव्हा त्याला घातलेल्या शपथांपैकी किमान एक तरी शपथ मी इमानाने पाळली होती. मानववंश मी वाढता ठेवीत होतो. या पृथ्वीवर शेकडो ठिकाणी मी माझा अंश प्रकाशकिरणांप्रमाणे पसरून दिला होता. शेकडो स्त्रियांना मी माता बनवले होते–

रागिणीही आता त्यांतीलच एक होती. मला तिच्या उंचावलेल्या ओटीपोटाकडे पाहता पाहता आठवले–**सहस्त्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् । स भूमिं विश्वतो वृत्वाऽत्यतिष्ठद्दशांगुलम् ।।** हा पुरुष हजारो मस्तके, हजारो डोळे, हजारो पाय धारण करणारा असून तो या विश्वाला पूर्णपणे व्यापून दहा अंगुळे उरून राहिला आहे! पुरुष! मी पुरुष आहे..सार्वभौम, साकार, सगुण, सचेतन, विराट अनंत असा मी पुरुष...अनादिकालापासून मी या रागिणीला ओळखतो आहे...रागिणी म्हणजे एक यज्ञवेदी आहे..आणि माझ्या पौरुषाच्या समिधा वाहून मी तिला तृप्त, भुक्त आणि मुक्त केले आहे..माझी अनादि शपथ मी फेडली आहे; रागिणी, आता मी तुझं काही देणं लागत नाही–लीव्ह मी अलोन ..ट मी गो अलोन––

'असं काय वेड्यासारखं पाहतोस? एखाद्या परक्या वाहुली-

कडे पहावं तसं...तुझी माझी ओळख होताना पहिल्या प्रथम सुद्धा तू अशा विचित्र नजरेनं पाहिलं नव्हतंस! काय झालंय तुला?' रागिणी वस्त्रांतर करता करता माझ्याशी बोलत होती.

'काही नाही, रागिणी, मला काही झालेलं नाही! फक्त आनंद झालाय...तुझ्याएवढाच आनंद झालाय मला..चल ये, लेटस् सिलेब्रेट!' मी मद्य चषकात ओतले आणि रागिणीला बोलावले. नव्या तलम वस्त्रातून रागिणी अतिशय स्फोटक दिसत होती. रागिणी जवळ येऊन बसली. क्षणभर तिचा मला नव्याने मोह वाटला. कोणाही पुरुषाला वाटावा तसाच, पण मी मन आवरले. संथपणे पिऊ लागलो. रागिणीनेही चषक ओठाला लावला. व ती अर्धोन्मीलीत पापण्यातून मला न्याहाळू लागली. त्या पापण्यांना चुकवीत मी बाहेर पाहू लागलो. आता आवारातील दिवे मंदावले होते आणि खाली दरीतले दिवे पेरल्यासारखे दिसत होते..कुठेतरी रातराणी फुललेली होती नि तो मेघांचा रातकिडा पुन्हा एका लयीत आपले घुंगुर छुमछुमावीत होता—छुम् छुम् छनक् झुम्, छन्क झुम्...

सुमारे दीडएक पेग व्हिस्की आम्ही मुक्यानेच प्यालो. प्रवास नुक्ता सुरू झाला होता नि सुरूवातीचे मुकेपण पुढ खूप बोलके होते, हे आम्हा दोघानाही ठाऊक होते. मला बोलावेसे वाटले तेव्हा मी म्हणालो—

'रागिणी, आता यापुढे तू मला विसरायला हवं आहे!'

'का म्हणून? आता तर मी तुला कधी..कधीसुद्धा विसरणार नाहीय्..सांगू? मी काय ठरवल्येय् मनाशी ते?——'

'सांग—'

'प्रिन्सिपॉलसाहेबांशी घटस्फोट घेऊन तुझ्याबरोबर लग्न करायचंय् मला!—'

'छे: छे: हा वेडेपणा होईल—असं काही तू करू नकोस—'

'का? हा वेडेपणा कसा? तूच एकदा म्हणाला होतास ना. एकमेकांना सर्वस्वी अनुरूप स्त्री आणि पुरुष जेव्हा एकत्र येतील तेव्हाच त्यांनी लग्नाचं बंधन स्वीकारावं! आपण एकमेकांना अनुरूप नाही का?'

'माझ्या बोलण्याचा तसा अर्थ घेऊ नकोस, रागिणी! अनुरूपता ही सापेक्ष असते...इट् इज् अ रिलेटीव टर्म...तुझ्यामाझ्यात तशी कोणतीही अनुरूपता नाही..साधर्म्य नाही...तू एक स्त्री आणि मी एक पुरुष..एक मादी..दुसरा नर..एका विशिष्ट गरजेतून एकत्र आलो. तसं पाहिलं तर सागर आणि तूही तसेच एकत्र आला होता...'

'म्हणजे तुला माझ्याबद्दल काहीच वाटत नाही? एवढं मी सारं तुझ्यासाठी करते. लग्नाचा नवरा. बिचारा साधासरळ..त्याला चुकवून मी तुझ्याशी संबंध ठवते...त्याला फसवून तुला अशी, या आडरानात भेटते...तुला सर्वस्व अर्पण करते..हे सारं कशासाठी












अनुक्रमणिका

–कशासाठी करते मी ? तू मला अखेर कोण समजणार आहेस ?'

रागिणीच्या लांबट पापण्याखाली अंगार उमलू लागला आणि मला खूप मोकळं वाटू लागलं. मला यापूर्वी भेटलेली प्रत्येक स्त्री जवळजवळ अशीच बोलली होती–आणि त्या प्रत्येक वेळी मला माझी भूमिका पुन्हा पुन्हा मांडावी लागली होती.

"माझं तुझ्यावर विलक्षण प्रेम आहे ! मी तुला कधीच विसरू शकणार नाही. मला असा सोडू नकोस रे! तुझ्यापासून खूपखूप हवंय मला" रागिणी आता माझ्या अगदी निकट सरकली होती. तिचे उष्ण शरीर माझ्या अंगाला स्पर्श करीत होते. तिने काचोळी घातली नव्हती आणि नितळ पारदर्शक पदराखालून तिचे उत्फुल्ल उरोज माझ्या डोळ्यांना चूड लावीत होते. आता अधिक चर्चेत वेळ घालवू नये असे सारखे मनात येत होते–

मी आवेगाने उठलो आणि रागिणीचे चुंबन घेतले. त्या चुंबनाचा पुढील अर्थ जाणण्याएवढी रागिणी चतुर होती. माझा तो नेहमीचा अनुभव होता–

पण या खेपेला तसं काही घडले नाही. रागिणी स्थिर राहिली. निर्विकारपणे तशीच स्वस्थ बसून मला म्हणाली–

'मला खरंच सांग–डू यू लव्ह मी ? मी तुला खरंच हवीहवीशी वाटते का ? का यापूर्वी तुला भेटलेल्या अगणित बायकांपैकीच एक मला तू समजतो आहेस ? आय वॉंट टू नो'– तिच्या हातातले पेय नुसतेच चमकत होते. ती एकही घोट घेत नव्हती––

'रागिणी, तुझ्याबद्दलच्या माझ्या भावना कधी बदलणार नाहीत ! तुझ्यावर माझं प्रेम आहे की नाही, हे मी सांगू शकत नाही. मात्र अगदी प्रथम तू मला दिसलीस तेव्हा एक तरुण, सुंदर, मैत्रिण म्हणून मला तू आवडलीस. . तुझ्या सहवासात कुणाही श्रेष्ठ अभिरुचीच्या माणसाला आनंदच व्हावा. .पण मग तुझी उदासीनताही मला कळली. . तुझ्यातल्या न्यूनतेमुळे तू उदास होतीस. . . माझ्या सहवासात तू फुललीस. .आणि आठवण कर. . माझ्या मालकीसाठी प्रथम तू पुढाकार घेतलास. . मी तुला मित्र म्हणून जेवढा हवा होतो, प्रियकर म्हणून जेवढा हवा होतो, त्याहून पुरुष म्हणून अधिक हवा होतो. .तू माझ्यामुळे झपाटली होतीस आणि तुझ्या मुलाचं पितृत्व तुला माझ्याकडून हवं होतं ! तुझी ती ओढ होती. . यू नेव्हर वॉंटेड मी अॅज युवर हजबंड ! जे सागर देऊ शकत नव्हते, ते मी तुला देऊ शकत होतो. . .आय् हॅव गिव्हन इट टू यू–संपला सारा मामला ! एवढंच आपल्यातील सत्य आहे. . .'

शिडात वारा भरलेला पडाव सरसरत पुढे जावा, तसा मी बोलत होतो आणि रागिणी श्वास रोधून ऐकत होती. . .मग तिने निःश्वास सोडले. . .एका ओल्या उदासीन स्वरात ती हळूच म्हणाली–

'होय, खरंच आहे तुझं म्हणणं. .मला आई व्हायचं होतं–तू फक्त निमित्त झालास. . .'

'तेच मला म्हणायचंय. .आता तुझं सारं लक्ष तुझ्या बाळाकडे लागेल. .हळू हळू तू मला विसरशील. .मी सांगतो तुला रागिणी, वूमन वुईथ अ चाइल्ड इज् मदर फर्स्ट अँड देन अ वूमन ! मूल झालेल्या बाईकडे मी 'बाई' म्हणून बघूच शकत नाही. ती आई असते फक्त–आणि ती मुलांसाठीच जगत असते–पुरुषाची आबाळ करून. . .त्याला दुःखी करून–म्हणूनच मी लग्नाशिवाय राहिलोय् ! जिचं आपल्यात लक्ष नाही, अशा बाईबरोबर जन्मभर लोंबकळत रहाणं परवडणार नाही मला ! मी पुरुष आहे–नर आहे–'

'तर मग पुरुष म्हणून फक्त अनेक बायकांना तू आजवर बिघडवलंस ! त्यांच्याशी व्यभिचार केलास. .त्यांच्या आयुष्याची धूळधाण केलीस ! ही पशुता झाली–' रागिणीचा राग शब्दात मावत नव्हता.

'मुळीच नाही ! मी कुणाचंही जीवन उध्वस्त केलेलं नाही ! उलट अनेकजणींचं जीवन मी फुलवलं. अगदी तुझीच गत. .त्यांना माझ्यापासून मुलं झाली. .त्यांना तीच हवी होती. .आता त्या स्त्रियांपैकी कुणी भेटली तर माझी ओळखही दाखवत नसते. . खरं सांगू ? उद्या तूही तेच करणार आहेस ! वन्स यू आर अ मदर–'

रागिणी विमनस्कशी गप्प राहिली. .मग तिने हातातलं मद्य एका घोटात पिऊन टाकलं. मग दरीतल्या दिव्यांकडे पहात ती निमूट बसून राहिली. रातकिडा गातच होता. आमच्यामध्ये पसरलेल्या त्या विचित्र शांततेमध्ये भक्त त्याचेच ठेकेदार गाणे वाजत होते. . मी ते गाणे आरपार कापीत पुढे बोलू लागलो–

'आणि दुसरं एक लक्षात घे ! रागिणी; मी स्वतःहून कोणाही स्त्रीवर स्वतःला लादलेले नाही आजवर. .एकाही कुमारिकेचा अनधिकृत अपमान मी केलेला नाही. एकाही मूल झालेल्या स्त्रीला फुसलावलं नाही. फक्त मातृत्वाला आसुसलेल्या स्त्रियांना मी सुखी केलं. ज्यांची उदासी मला कळली ती मी दूर केली आणि ते त्यांच्या इच्छेनुसारच घडलं. मी फक्त दुराचारी असतो, फक्त स्त्रीलंपट असतो, तर मनात आणीन ती स्त्री आपलीशी करण्याची अनंत साधनं माझ्यापाशी आहेत. . .मी तो मार्ग आचरलेला नाही. . . !'

'तुझ्या वागण्याला तू औदार्याची, परोपकाराची अध्यात्मिक बैठक देऊ पाहतोस. तू एक खोटा माणूस आहेस–आता माझं ऐक : 'परमेश्वरानं निर्माण केलेली प्रत्येक स्त्री ही आदिमायेचा अंश असते. . ती प्रथम माता असते आणि नंतर सर्व काही असते. .तिच्या समग्र व्यक्तित्वाचा केंद्रबिंदू म्हणजे तिचं मातृत्व. . .ती जन्मते तेव्हा माता असते आणि मरते तेव्हाही माताच असते. . .पुरुषाला हे कधीही कळलेलं नाही. . .जगाच्या आरंभापासून पुरुष अज्ञानीच आहे–तो फक्त आसक्त, लोलुप आणि अहंकारी असतो. . .स्त्रीला त्याच्या या दुर्गुणांची जाणीव नसेल कशी ? पण ती आपल्या मातृसुलभ वृत्तीने त्यावरही पांघरूण घालते–' रागिणीचा स्वर बदलला होता. ती वेगळीच भासत होती. मद्याचा अंशमात्र परिणाम तिच्या-

वर दिसून यत नव्हता. मी मात्र धुंदावलो होतो. माझ्या चित्तवृत्ती सळसळू लागल्या होत्या. . . याक्षणी मी कसलाही पराभव स्वीकारू शकत नव्हतो. . .

'मला तसं वाटत नाही ! पुरुष हाच आदिपुरुष. . . त्याने जन्मताच सव पृथ्वी, सर्व नगरे आणि सगळे देह व्यापले. **"स जातो अत्यरिच्यत् पश्चाद्भूमिमयो पुरः ।।"**—आणि पुढं ऐक—या आदिपुरुषाच्या नाभीपासून अंतरिक्ष निर्माण झाले, मस्तकापासून द्यूलोक पायापासून भूमि, कानापासून दिशा निर्माण झाल्या. . सार्‍या विश्वात पौरुष असे भरून राहिलेले आहे—तू एक यःकश्चित् 'स्त्री'. . . पुरुषाने पुरुषासाठी निर्माण केलेली एक साधनरूप वस्तू. . . !'

मी घटाघटा पीत होतो. उभा रहात होतो. हातात मद्यपात्र घेऊन रागिणीभोवती फेऱ्या घालत बोलत होतो. अधुनमधून मांड्या थोपटाव्या, भुजा उन्नत कराव्या आणि भुभुःकार करावा, अशी मला प्रबळ इच्छा होत होती. मी आकाशाएवढा उत्तुंग झालो होतो आणि रागिणी मला एक लहानसा बिंदू भासत होती. . .

मग समोरच्या दरीतून चंद्रबिंब प्रगट झाले. रागिणी तिकडे एकटक पहात होती. तो कोवळा चंद्र पाहताच मला पुन्हा पुरुषसूक्त आठवले **"चंद्रमा मनसो जातश्चक्षो सूर्यो अजायत ।।"** रागिणी, 'अग, हा समोरचा चंद्र आहे ना, तो सुद्धा पुरुषाच्या मनापासून उत्पन्न झाला. आणि सूर्य ? तोही पुरुषाच्या नेत्रापासून उत्पन्न झाला—ठाऊक आहे ? या साऱ्याचा निर्माता मी आहे, या साऱ्याचा उद्गाता मी आहे. चल ये. माझ्या स्वाधीन हो ? मला तुझा उपभोग घेऊ दे. . तुझ्यापासून चंद्र, सूर्य, तारे, अंतरिक्ष, पशू, पक्षी, फुले फळे निर्माण करू दे. . ."

मी बेभान झालो होतो. मी खाली वाकलो. रागिणीच्या पायापाशी गुडघे टेकून बसलो. तिच्या डोळ्यात डोळे बुडवीत म्हणालो—'आय् वाँट यू रागिणी ? . . . रागिणी; तू रडतेस ? तुझ्या डोळ्यात अश्रू ? का, का, काय झालं रागिणी ? रागावलीस का ? वाईट वाटलं का ? माझं चुकलं का ?— '

'नाही रे, तुझं काहीच चुकलं नाही. चल आपण आत जाऊ—' रागिणीने माझ्या हाताला धरले आणि मला ती शय्यागृहात घेऊन




गेली. . आपल्या हाताने तिने मच्छरदाणी सरकवली आणि मला आत घेतलं—

एखाद्या स्वप्नातून जाग यावी, तसा मी उत्तररात्री कधीतरी जागा झालो. रागिणीचे माझ्या गळ्याभोवतीचे हात बाजूला करून मी उठलो. रात्रीचे तीनचार तरी वाजले असतील. कानात पडलेले शब्द अगदी स्पष्ट होते. . पण ते स्वप्न होते की वास्तवात कुणी ते शब्द उच्चारले होते ? का तो एक भास होता ? काही कळत नव्हते. . . मी अस्वस्थ होऊन उठलो. दिव्याचे बटण ओढले. खोलीत सर्वत्र लख्ख उजेड पसरला. रागिणी एखाद्या लहान बालकासारखी निवांत झोपली होती. तिच्या मुद्रेवर तृप्त स्मित हास्य विलसत होते. पूर्वरात्री केलेल्या शृंगारनाट्याची इवलीशी खूणही तिच्या मुद्रेवर आणि देहावर दिसत नव्हती. ती कमळाच्या पानासारखी निश्चल पहुडली होती. शांत होती. मुग्ध होती. . .

मी मात्र अस्वस्थ होतो. कानात मघाशी ऐकलेले ते शब्द स्पष्ट घुमत होते. . . कोण बोललं होतं माझ्याशी ? रागिणी ? आदिमाया ? बाहुपाशातील रागिणी स्वप्नात आली होती ? मनातील चंद्राला भेटण्यासाठी ?—

मी टेबलावरील तांब्यातील पाणी प्यालो नि बाहेर व्हरांड्यात आलो. मोकळ्यावर बरे वाटले. तो रातकिडा थांबला होता. दरीतले दिवे स्वप्नातल्यासारखे दिसत होते. बाकी सारा परिसर निवांत होता. मग एकाएकी ते शब्द पुन्हा आठवले—"अरे, पण तुझा अंतकाळ जेव्हा जवळ येईल, तेव्हा तुला कुणाची आठवण येईल माहीत आहे ? तुझ्या पुत्राची ! माझ्या मुला, जवळ ये. . मला मांडीवर घे—असं तू आकांताने म्हणशील, तेव्हा तुझ्याजवळ कोण येईल ? तू शंभर पुत्र निर्माण केले असलेस तरी त्यातील एकही त्याक्षणी तुझ्या हाकेला धावून येणार नाही. कारण त्यांना माहीत नसेल की तू त्यांचा पिता आहेस ! तुझे पितृत्व पृथ्वीवरल्या शंभर वाटांनी चालत असेल. . . दहादिशात पसरलेलं असेल. . पण अखरच्या क्षणी ते फक्त तुझ्यापाशीच नसेल. . त्यावेळी तुला पुरुषसूक्त आठवणार नाही. . आठवेल ती तुझी आई. . . आणि तुझा मुलगा. . . म्हणून . . म्हणून वेड्या माणसा—त्या दोघांनाही जवळ घे—असा उन्मत्त होऊ नकोस ! माझं ऐक—'

होय, हेच ते शब्द ! ते शब्द माझ्या कानात पुन्हा एकवार घुमले आणि माझ्या घशात आवंढा आला. पायांना कंप सुटला. कपाळावर घाम जमला. मी एका विलक्षण ओढीने पुन्हा आत गेलो. रागिणी तशीच सुस्त निजलेली होती. तिच्या त्या सरोवरासारख्या चेहऱ्याकडे पाहतापाहता मी माणसात आलो. मला माझ्या मुलाची हाक ऐकू आली आणि मी रागिणीच्या शेजारी जाऊन पुन्हा निजलो. तिला माझ्या बाहुपाशात एवढे बद्ध केले की माझी क्षणापूर्वीची सारी व्याकुळ अस्वस्थता निमिषार्धात संपून गेली. . . यज्ञकर्म संपताना देवांना स्वर्गप्राप्तीचा आनंद लाभावा तसा आनंद मला लाभला आणि रागिणीला अधिकच निकट घेत मी पुटपुटलो,

**"यज्ञेन यज्ञमयजंत देवास्तानि धर्माणि प्रथमान्यासन् ।।"**

• • •









जयवंत दळवी

पाऊस पडून गेला होता. मी झोपून सकाळीच नेहमीसारखा उठलो. तळमजल्यावरील माझ्या खोलीचं मी दार उघडलं. पाहातो तर काय ?– तो माझ्याशी चक्क हसला. एक वीत लांब जीभ वाहेर काढून हाः हाः हाः करीत तो हसला. हे मी सांगितलं तर तुम्ही सुद्धा हाः हाः करीत हसाल. आणि म्हणाल, काय ? सांगता काय ? कुत्रा तुमच्याशी हसेलच कसा ? कसा हसेल ते मी काय सांगू ? पण हसला एवढं मात्र खरं ! तो हसला यात कसलीही शंका नाही. माझ्या मनात तरी मुळीच शंका नाही.

क्रमाक्रमानं सांगतो. जरा ऐकून घ्या !

पाऊस नुकताच पडून गेला होता. तुम्ही म्हणाल, कशावरून ? कारण जमीन ओली होती. मी झोपून सकाळीच उठलो. तुम्ही म्हणाल, कशावरून ? कारण रात्री मी झोपलोच होतो. मी दार उघडलं. तुम्ही म्हणाल, कशावरून ? कारण रात्री झोपताना मी दार बंदच केलं होतं. झालं ? म्हणजे इथपर्यंत तर शंकेला जागाच नाही.

आता ऐका !

मी दार उघडलं. उघडलं मात्र–मी दार कधी एकदा उघडतो याचीच वाट बघत तो उभा होता. मला बघताच त्यानं तोंड उघडलं. जीभ वाहेर काढली आणि दात दाखवीत तो माझ्याशी हसला. नुसता 'काय कसं काय ?' असं विचारीत आपण हसतो तसा नाही हसला. तर माझ्याशी किंवा घराण्याशी दीर्घकालीन घरोबा असल्यासारखा तो हसला !

आता पुनः तुम्ही म्हणाल, कशावरून ? तर बामजींना विचारा. बामजी म्हणजे आमचे शेजारी ! मी हे त्यांना तावडतोब सांगितलं. तर तेही हसले ! हाः हाः हाः करीत हसले. हसताना त्यांनी दातसुद्धा दाखवले. पण त्यांनी जीभ मात्र बाहेर काढली नाही. कारण त्यांची जीभ जरा जड आहे !

तर ते असे हसले, आणि म्हणाले, "तो नुसता हसूनच थांबला?"

"म्हणजे काय ?" असं मी विचारलं.

"त्यानं आपले हात जोडून राम राम सुद्धा म्हटलं असेल ?" असं बामजींनी विचारलं !

तर आता तुम्हाला गंमत सांगतो ! तुम्ही हसणार असाल तर हसा ! आपण हसणाराचं तोंड धरू शकत नाही–तुमचंही नाही आणि त्या कुत्र्याचंही नाही. पण मी सांगतोय् त्यावर विश्वास ठेवा.

मी हा असा दारात उभा. तो पायरी सोडून हा असा अंगणात उभा. आणि तो हसला ! तो हसताक्षणीच मला मोठी गंमत वाटली. मूळातच मला हसणारांची गंमत वाटते. हसतात ते आपल्याला आवडतात. त्यामुळे तो कुत्रा मला एकदम आवडला. आणि मी गंमतीनंच म्हटलं, " राम. . राम !"

त्यानं चक्क मानेला दोन हिसके दिले आणि "राम...राम"

म्हटलं. ते ऐकताच मी ज्याम टरकलो. म्हटलं, हे हुडुत म्हणून घालवून द्यायचं पात्र नव्हे. हे वेगळं काम आहे.

आणि कसे कोण जाणे, माझ्या नकळतच माझ्या तोंडून शब्द गेले, "काय. .कसं काय ?"

"बरं आहे !" असं तो म्हणाला. देवाची शपथ घेऊन सांगतो. खरंच तो असं म्हणाला.

त्यासरशी माझे हात आपोआप जोडले गेले.

आणि काय हो आश्चर्य ? त्यानं ढुंगण टेकलं आणि सरळ पुढले दोन हात किंवा पाय काय असतील ते चक्क जोडले.

"आत या ना. . .बसा. . . !"

असं मी म्हणताच माझा सासरा सुद्धा इतक्या आत्मविश्वासानं आत आला नसता इतक्या आत्मविश्वासानं चक्क छाती पुढं काढून तो आत आला. माझ्या खोलीत एकच खुर्ची ! त्या खुर्चीवर त्यानं टुणकन उडी मारली आणि अंगाचं कडबोळं करून तो ऐटीत बसला.

ते पाहून मात्र मी चांगलाच चमकलो. मी त्याच्या डोळ्यात निरखून पाहिलं. साल्याचे डोळे कुत्र्याचे नव्हते. माणसासारखे पिंगट डोळे. विशेष म्हणजे आमच्या घरात सर्वांचेच असे पिंगट डोळे ! मनात आलं, साला हा आहे तरी कोण ? लेकाचा माझ्यासकट घरातली चीज न् चीज आपल्या ओळखीची असल्यासारखा तो सगळीकडे बघत राहिला. माझ्या खाटेवर अस्ताव्यस्त पडलेलं पांघरूण सुद्धा त्यानं पाहिलं. त्यानं त्या पांघरूणाकडे पाहिलं तेव्हा मी मनातल्या मनात जरासा घाबरलोही. "एवढा वाढलास, पण नीटनटकेपणा कसला तो माहीत नाही !" असं तो दरडावून म्हणेल अशी मला भीती वाटली. म्हणून मी तावडतोब पांघरूणाची व्यवस्थित घडी केली आणि गादीवरची चादरही नीट करून ठेवली. तसा तो पुनः एकदा खुषीत येऊन हसला.

माझ्या डोक्यात साली नाना चक्रं फिरत राहिली. सारखा एकच प्रश्न मनात घुमू लागला. . .हा आहे तरी कोण ? आधीच कुत्रा म्हणजे साधंसुधं जनावर नव्हे. माणसावर लोभ करणारं जनावर ! घरात कुणावर मृत्यु ओढवणार असला तर यमाची पावलं आधी कुत्र्याला ऐकू येतात. रात्र झाली की, हेल काढीत सर्वाआधी तो रडू लागतो. धर्मराजाबरोबर स्वर्गात फक्त कुत्रा गेला होता म्हणतात. त्यावेळी त्याला जाताना कुणी पाहिला कोण जाणे ! खरं खोटं आपल्याला माहीत नाही. पण गेला होता म्हणतात. तसा हा कुत्रा आता थेट स्वर्गातून आला असेल काय? स्वर्गात जाऊ शकतो, तर स्वर्गातून येऊ का नाही शकणार ? आलाही असेल !

हा विचार मनात यतो न येतो तोच माझ्या डोक्यात एकदम गारगोटी आपटावी तशी चकमक पडली. एकदम आठवलं. हे काका तर नसतील ? माझ्या एका दूरच्या काकांना कुत्र्यांचं फार वेड होतं. पण काकी चारित्र्यानं तेवढीशी बरी नव्हती. म्हणून काकांनी विहिरीत उडी टाकून आत्महत्या केली होती. त्यांनी गळ्याला दोर बांधला, त्याला मोठा दगड बांधला आणि त्यांनी विहिरीत उडी घेतली. त्या गोष्टीला आता खूप वर्षं झाली. पण असलेच भाद्रपदाचे दिवस ! त्यांचेही डोळे आमच्यासारखे पिंगट होते. . .तेच आता कुत्र्याच्या रूपानं आले की काय ?

"काका ऽ ऽ !" असा एक शब्द माझ्या तोंडातनं निसटला.

"हुं : हुं : हुं : !" असा रडल्यासारखा होकार काकांच्या गळ्यातनं आला.

मी एकदम हरखून गेलो. आणि आधारासाठी खाटेवर बसलो. पण एकदम लक्षात आलं, लहान माणसांनी आपल्यासमोर बसलेलं काकांना आवडत नसे. म्हणून मी चटकन उठून उभा राहिलो.

"काका, थोडं दूध आणतो. . !" काकांना दूध आवडायचं.

"हुं: हुं: हुं: !" असा काकांच्या गळ्यातनं आवाज आला.

"कुठला कुत्रा. . .कुठला काका. . ." असं कुरकुरत वामजी माझ्या खोलीत आले.

"वामजी, नमस्कार करा. . ."

असं मी म्हणताच वामजींनी नमस्कार केला. काका लगेच सरकून बसले आणि त्यांनी हात जोडून वामजींना नमस्कार केला. ते पाहताच वामजी एकदम टरकले. आणि शेंडी खाजवत काकांना निरखू लागले.

"आता राम राम म्हणा--"

असं मी म्हणताच वामजींनी दबकत घाबरत "राम. .राम" म्हटलं.

"राम. .राम. . ! " काका म्हणाले.

"हे सालं भलतंच प्रकरण आहे. . . !" असं म्हणता म्हणता वामजींचं धोतर सुटायची पाळी आली.

"घाबरू नका, वामजी !" मी म्हटलं, "काका आपलेच आहेत."

त्यावर काका जीभ काढून पुनः हसले.

वामजींना वाटलं, आता आपल्यालाही हसायला पाहिजे. म्हणून तेही हसले. पण जाताना म्हणाले, "छगन, काका-बिका हे डोक्यातनं काढून टाक. कुत्रा इमानी आहे एवढंच लक्षात ठेव !"

वामजींचं म्हणणं मला पटलं नाही.

काकांच्या संगतीत दोन दिवस बरे गेले. ऑफिसला जाताना मी खोलीला कुलूप लावलं की काका अंगणात शतपावली करीत.

**....आजच्या तरुण पिढीचे सर्वार्थाने आघाडीचे लेखक असे ज्यांच्याबद्दल निःशंकपणे म्हणता येईल अशा श्री. जयवंत दळवी यांची ही विनोदी कथा म्हणजे अद्भुत विनोदाचा एक उत्कृष्ट नमुनाच ! गेल्याच दिवाळी अंकातील त्यांनी 'दीपावली'-साठी खास लिहिलेली 'स्वप्नाच्या सावल्या' ही कादंबरी अजून वाचक विसरले नसावेत... विनोदी साहित्याप्रमाणेच गंभीर लेखनही तितक्याच समर्थपणे करणारे ते आजचे एकमेव लेखक होत....**

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

लहर आली की, बामजींच्या खोलीत जात. बामजी त्यांना ताटली-तनं भात-वरण वाढीत, ते खात. हसत, नमस्कार करीत, राम राम म्हणत. त्याची बामजीना एवढी संवय झाली की, ते सुद्धा दर पाच मिनिटांनी जीभ बाहेर काढून हसत, हात जोडून नमस्कार करीत आणि राम राम म्हणत. .पुढ्यात कुणी नसला तरी !

आणि मग मात्र एकदा काकांनी माझी अब्रू घालवली. मी होतो ऑफिसला जाण्याच्या गडबडीत. मी कपडे चढवले आणि खाटेवर बसून पायात बूट घालणार तोच. . .एका बुटाचे लचके तोडून काकांनी अर्धा बूट खाऊन टाकला होता. एरव्ही बूट काकांनी खाल्ला असा मला संशय सुद्धा आला नसता. मला वाटलं असतं, रात्री उंदरानं किंवा घुशीनं बूट कुरतडून खाल्ला म्हणून ! पण त्याच क्षणाला काका माझ्या नायलॉनचा पांढराशुभ्र मोजा अक्षरशः गिळत होते. क्षणभर मला काय करावं तेच सुचेना ! काकांचा धड रागही येईना, धड दयाही येईना.

तेवढ्यात दुर्दैवानं बामजी माझ्या खोलीत आले.

"या बामजी—" असं मी मुद्दामच मोठ्यानं म्हणालो. काकांनी ऐकावं म्हणून ! म्हटलं, काकांना काही अब्रूची चाड असेल तर ते पटकन मोजा टाकतील.

पण काका तद्रूप होऊन मोजा गिळत होते.

ते दृश्य बामजींनी पाहू नये म्हणून मी एकदम बामजींच्या पुढ्यात उभा राहिलो आणि म्हटलं, "बामजी, नेहमीप्रमाणे आजही ताटलीतनं वरण-भात कालवून काकांना द्या. आणि लिंबू आणलेलं असेल तर भातावर लिंबू पिळा ! वरणावर लिंबू बरं !"

**'आकाऽऽऽऽवाणी' : आपली आवड !**

**कालच्या 'आपली आवड' मधली गाणी कोणा-कोणाच्या आवडीची होती त्यांचे पत्ते सांगा.**

पण माझ्या बोलण्याकडे बामजींचं लक्षच नव्हतं. ते काका, मोजा आणि उरलेला अर्धा बूट याकडे बघत होते.

"बामजी—" मी पुन: हाक मारली.

तो शांतपणे म्हणाले, "अरे छगन—"

मी म्हटलं, "काय ?"

"तुझा काका—" बामजींचं वाक्य पूर्ण होण्याआधी मी ठसका लागल्यासारखा मोठ्यानं खोकलो. बामजींनी तुझे काका असं म्हणण्याऐवजी एकदम एकेरीवर येऊन तुझा काका असं म्हणावं ते मला मुळीच आवडलं नाही. कुणालाही आवडणार नाही. तुम्हाला आवडेल ?

पण माझ्या खोकण्याकडे सुद्धा बामजींनी लक्ष दिलं नाही. ते पुन: म्हणाले, "अरे छगन—"

मी म्हटलं, "काय ?"

"तुझा मेलेला काका नॉनव्हिजिटेरियन होता का रे ?"

"का ?"

"या तुझ्या काकानं चक्क बूट खाल्ला म्हणून म्हणतो !"

मी काहीच बोललो नाही. काय बोलणार ? काकांनी बूट तर खाल्लाच होता. "ब्राह्मण ना रे तो ?"

मी लगेच स्टोव्ह पेटवला आणि दूध तापवलं. ते पिता येईल एवढं थंड केलं. त्यात थोडी साखर घातली. (बदाम, केशर वगैरे कुठून आणणार ?) आणि बशीत दूध ओतून ते त्यांच्या पुढ्यात ठेवलं.

आता गंमतीचा योगायोग कसा तो बघा ! रात्रीच मी कप-बशी धुताना माझ्या हातातनं कप निसटला आणि फुटला. आजवर माझ्या हातून फक्त बशाच फुटत आल्या होत्या. फक्त काल रात्रीच तेवढा कप फुटला आणि बशी उरली. पण बशीच उरली म्हणून बरं ! बशी फुटली असती तर काका कपातनं दूध कसे प्याले असते ?

च्यॅक. . .च्यॅक आवाज करीत काका दूध प्याले. ते दूध पीत असताना मी त्यांच्या गळ्यातला पट्टा चाचपून पाहिला. म्हटलं, पट्टाच आहे की आत्महत्येच्या वेळची दोरी आहे ते बघू ! पण पट्टा होता . मला एकदम भडभडून आलं. पट्टा सोडण्याचा मी प्रयत्न केला. पण मान हालवून त्यांनी पट्टा सोडू दिला नाही. (पट्ट्याला दगड बांधून पुन: विहिरीत उडी टाकायचीच काय, काका ?)

मी धावत बामजींच्या खोलीत गेलो. आणि त्यांना काकांची सर्व हकीकत सांगितली.

"तुझा मेलेला काका कुत्र्याच्या रूपानं आलाय ?"

"असं वाटतं ! काकांना कुत्रे फार आवडत !" असं मी सांगितलं !

"अस्सं !" बामजी म्हणाले, "उद्या तू काकांच्या बरोबर गेलास तर—"

"तर काय ?"

"प्रत्येक खांबाबर तंगडी वर करशील !" असं म्हणत बामजी खदखदा हसले.

"बामजी, चेष्टा नकोत ! तुम्ही प्रत्यक्ष येऊन बघा !"

"काय बघायचं ? कुत्रा बघायचा ?"

"असा तसा कुत्रा नाही. तो चक्क माझ्याशी हसला !"

"नुसता हसूनच थांबला ?"

"म्हणजे काय ?"

"त्यानं आपले हात जोडून राम राम सुद्धा म्हटलं असेल ?"

"होय बामजी ! तो हात जोडून राम राम सुद्धा म्हणाला."

"काय सांगतोस तू, छगन ?"

"तुम्ही या आणि समक्ष भेटा काकांना--"

"कोण ?"

"तुझा काका ! आणि असलं अभक्ष्यभक्षण करतो ! बुटाचं कातडं म्हणजे रेड्याचं नाही तर घोड्याचं ! शीः शीः !"

"शीः शीः !" मीही चटकन बोलून गेलो. आणि मग मलाच शरम वाटली ! शीः ! काकांनी रेड्याचं, घोड्याचं कातडं वकावका खावं म्हणजे काय ? एक वेळ नायलॉनचा मोजा खाल्ला तर ठीक आहे ! खा...खा...असं मनातल्या मनात म्हणत मी दुसराही मोजा काकांच्या पुढ्यात टाकला. नाहीतरी एक मोजा शिल्लक ठेवून उपयोग काय ? कुणाला द्यायचा म्हटला तरी एक पाय तुटलेला माणूस शोधायला पाहिजे.

पण दुसरा मोजा काकांनी खाल्ला नाही.

तेव्हा बामजी म्हणाले, "काका साला पक्का दिसतोय !"

मी म्हटलं, "का ?"

"तुझा सफेत मोजा म्हणजे त्याला कांदा वाटला असेल !"

"कशावरून ?"

"मटणाबरोबर कांदा खातात ना ? दुसरा बूट पुढ्यात टाक, म्हणजे मग तो बुटाबरोवर दुसरा मोजा खाईल...कांदा म्हणून !"

पण बामजी सांगतात म्हणून मी दुसरा बूट काकांच्या पुढ्यात टाकला नाही. उरलेल्या त्या बूटाचे जुना बुटवाला चार आणे तरी देईल !

त्याच दिवशी संध्याकाळी ऑफिस सुटल्यावर मी घरी आलो. तर बामजी माझीच वाट बघत रस्त्यावर उभे होते. मला बघताच ते पुढं आले आणि रागानं म्हणाले, "सालं आहे काय हे ?"

मी म्हटलं, "काय झालं ?"

"काही एक विचारू नकोस--" बामजी म्हणाले, "आत्ताच्या आत्ता तुझ्या काकाला डॉक्टरकडे घेऊन जा--"

"का ?"

तुझ्या काकाला नॉन्व्हेजिटेरियन फूड आणि नायलॉनचा कांदा पचलेला नाही ! अरे बकऱ्याचं मटण वेगळं आणि रेड्याचं वेगळं ! पचायला नको ?"

"पण झालं काय ?"

"हे बघ–"

मी पाहिलं. अंगणात जागोजाग ओकून काकांनी अक्षरशः घाण केली होती.

आता काय करावं याचा वामजीनी मला विचार सुद्धा करू दिला नाही. ते बाहेर गेले आणि टॅक्सी घेऊन आले.

"म्हणाले, घेऊन जा–"

मी काकांना घेऊन टॅक्सीत बसलो आणि टॅक्सी निघाली. तेवढ्यात काकांच्या तोंडून वॉक् असा आवाज आला. तो टॅक्सीवाल्याला ऐकू येऊ नये म्हणून मी मोठ्यानं खोकलो. पुनः वॉक् ! पुनः खोकलो ! दवाखान्याजवळ टॅक्सी थांबली तेव्हा खोकून खोकून माझा घसा दुखू लागला होता.

मी मीटर पाहिला. दोन रुपये झाले होते.

टॅक्सीवाला म्हणाला, "छे रुपया दो–"

"क्यों ?"

"क्यों ? अंदर देखो ! सालेने मेरी टैक्सी गंदी की ! अभी टैक्सी धोएगा कौन ? तुमारा चाचा धोएगा ?" टॅक्सीवाल्यानं एकदम आवाज़ चढवला.

टॅक्सीवाल्यानं माझा चाचा काढल्यामुळे माझा अपमान झाला होता. पण तो अपमान मोज्यासारखा मी गिळून टाकला आणि त्याच्या हातावर सहा रुपये ठेवले.

डॉक्टरांच्या दवाखान्यात शिरलो. या सर्व प्रकारामुळे मी इतका गांगरलो होतो की काही विचारू नका. मी इतका गांगरलो नसतो तर कुत्र्याला घेऊन मी फॅमिली डॉक्टरकडे गेलो असतो का ? पण मूर्खासारखा गेलो. डॉक्टरांच्या भोवती इतर पेशंट बसले होते. तरी मी गेलो आणि डॉक्टरांच्या पुढ्यात उभा राहिलो.

"काय छगनराव ?" असं डॉक्टर म्हणाले.

"जरा अर्जण्ट, डॉक्टर ! केस सिरियस आहे !" एवढं सुद्धा मी मूर्खासारखा म्हणालो.

"कोण ?"

"हा ...." असं म्हणन मी काकांकडे पाहिलं मात्र !

डॉक्टर ताडकन् उठले. पेशंट हसल्यामुळे त्यांचा अपमान झाला होता. ते ओरडून म्हणाले, "तुम्हाला अक्कल नाही ? मी तुम्हाला कुत्र्यामांजराचा डॉक्टर वाटलो ?"

"सॉरी डॉक्टर...लक्षात नाही आलं !"

"त्याला मोरबागला वामजीकडे घेऊन जा–"

"वामजी ?" मी एकदम चमकलो.

"वामजी चुनावाला."

"पत्ता–"

"मोरबागला जा ! पिठाच्या चक्कीकडे. गो...गो.... युसलेस...नो सेन्स..." डॉक्टर पटापट थुंकत होते.

तेवढ्यात त्याचं काकांकडे लक्ष गेलं. काका डॉक्टरांचा बूट.. तेवढ्यात डॉक्टरांनी पेकाटात लाथ घालताच काका राम राम म्हणायचं विसरून क्यॅ..क्यॅ करीत केकाटले आणि त्यांनी टुणकन् रस्त्यावर उडी मारली.

मी खाली उतरलो तेव्हा सगळे पेशंट आपापली रोगराई विसरून मला आणि काकांना खदाखदा हसत होते. मनात म्हटलं, हसा..हसा ! आमचे काका सुद्धा हसतात !

मी दुसरी टॅक्सी केली. आत बसताच संध्याकाळच्या प्रेपरची पिशवी करून मी ती काकांच्या तोंडावर धरली. 'टॅक्सी तुमारा चाचा धोएगा ?' हे ऐकायला नको. सुदैवानं पेपर कुरतडून खाण्याच्या नादात काका ओकायचं विसरले आणि फक्त एक रुपयात माझी सुटका झाली.

वामजी चुनावाला कुणी कुत्रा येतो का याचीच वाट बघत होता. पण तो म्हातारा पार्शी हुशार असावा. कारण त्याच्या पायात मोजेही नव्हते आणि बूटही नव्हते. अनवाणी पायानीच तो घरापुढल्या छोट्या बागेत फिरत होता.

"सैवजी ! केम छो ? सूं थयूं ?" असं त्यानं विचारलं.

"मारा काका..." मी गर्भगळीत होत म्हणालो आणि चाचरत थांबलो. सालं इथं कुत्रा म्हणायचं सोडून काका कसं म्हणालो कोण जाणे !

"ह्येला तू साला काका बोलते ?"

"केम ?"

"ये साली कुत्ती हाय ! काकी बोल नी ! चाची बोल... चाची !"



अनुक्रमणिका

"चाची ?" मी आणखी बुचकळ्यात पडलो. इतका की, नायलॉनचा मोजा माझ्याच पोटात आहे असं मला वाटलं आणि मी अधिकच अस्वस्थ झालो. क्षणभर त्या चुनावालाला काय सांगायचं ते विसरून मीच चाचीची तपासणी करू लागलो. तिच्या पोटावरची चामखिळं. . .शेपटीखाली. . .असू ते. .असू दे ! चाची तर चाची !

"झाला काय ये सालीला ?"

चुनावाला तिला एका तोंडानं चाची म्हणाला आणि दुसऱ्या तोंडानं सालीही म्हणाला ! म्हणा. .म्हणा ! काय वाटेल ते म्हणा !

"केम ? झाला काय ? सूं थयूं ?"

"हिनं नायलॉनचा मोजा गिळलाय. . ."

"केटला ?"

"एकच !"

"एकच ? दुसरा मोजा काय केला ?" तो दुसरा मोजा चुनावालाला पाहिजे होता की काय कोण जाणे !

"आणि एक बूट. . . !"

"केटला ?"

"अर्धा !"

"दुसरा काय केला ?"

उरलेलं सगळं बहुधा चुनावाल्याला गिळायचं होतं. पण मी काही बोललो नाही. नुसता हसलो आणि गप्प राहिलो.

"एम ?" असं म्हणत चुनावाला तिला आत घेऊन गेला आणि त्यानं तिला जालीम औषधं दिली. मग तो तिला बाहेर बागेत घेऊन आला.

पाचदहा मिनिटांनी चाची मानेला हिसडे देऊ लागली. आता ही ओकणार आणि मोजा बाहेर येणार म्हणून आम्ही दोघेही गुडघ्यावर हात घेऊन ओणवे झालो.

तेवढ्यात चाची ओकली आणि तिच्या तोंडातून गांधी टोपी बाहेर पडली.

"ये तो साला गांधी टोपी छे ! मोजा काय बोलते ?" असं चुनावाला केकाटला.

मीही दचकलो. ही साली गांधी टोपी आली कुठून ? आणि मोज्याचं काय झालं ? बुटाचं काय झालं ? सालीनं सगळं पचवलं की काय ?

"ये चाची अपोझिशन पार्टीनी मेंबर छे केम ?"

"केम ?"

"काँग्रेसवालाना टोपी खाल्ली सालीने. . ."

चुनावालाच्या या विनोदावर मी थोडा हसलो. आणि चुनावालाच्या तोंडाकडे पाहात म्हटलं, "मेरा नायलॉनका मोजा. . ."

तेवढ्यात चाचीनं अंगाला पिळोखे दिले आणि पाठीमागनं मोजा टाकला. तो पाहाताच बद्धकोष्ठ माणसाला व्हावा तसा मला आनंद झाला आणि मी हसलो.

## निधर्मी कडबोळी

[ राजकीय दिवाळी वाजण्यापूर्वी ]

साहित्य :– फक्त हिंदू धर्म वगळून इतर धर्म–प्रत्येकी एक किलो; न्यूनगंड कंपनीचे 'शांतता' छाप तेल–अर्धा लिटर; चिमुटभर तिखट, मीठ. (केवळ पाहण्यासाठी)

कृती :– वर सांगितलेले सर्व धर्म समप्रमाणात पिसून नीट भाजणी करावी त्यात थोडेसे 'शांतता' छाप मोहन घालून, भाजणी नीट मळावी काही वर्षे ही भाजणी तशीच धूळ खात ठेवावी म्हणजे ती खरोखरच मळल्यासारखी वाटेल. नंतर मुहूर्त पाहून एके दिवशी अहिंसावादी मंत्री (शक्य तो महिला) शोधावा व त्याच्या हस्ते न्यूनगंड कंपनीच्या तेलात कडबोळी तळावीत. मधून मधून त्यावर तोंडची वाफ सोडावी.

ही कडबोळी फारच लुसलुशीत लागतात व त्यांनी अंगातली अस्मिता पुरेपूर नाहीशी होते.

"मिळाला ना समदा ? युवर लॉस्ट प्रॉपर्टी. . .लॉस्ट अँड फाऊण्ड ! केम ?"

"बुटाचा तुकडा राहिला–"

"तो हजम झाला असणार ! जवा दो !"

"दवा दो ?"

"दवा दो नाय ! जवा दो ! जाव दे !"

त्यानं हात पुढे केला.

जवा दो ! असं म्हणून चालायला लागावं असं वाटलं.

"किती ?"

"वीस रुपया आपो !"

वीस रुपये ? एक गांधी टोपी. . .कुणाची कोण जाणे. . .पण जाऊ दे. त्या टोपीचे आठ आणे ! मोजा. .दीड रुपया. .एकूण दोन रुपये किंमतीची प्रॉपर्टी बाहेर काढल्याबद्दल वीस रुपये ? ये सूं छे ? निदान दोन रुपये कमी करून अठरा रुपये तरी ?

"आपो वीस रुपया !"

मी वीस रुपये देऊन चाचीला घेऊन बाहेर पडलो. परत जाताना चालतच गेलो. म्हटलं, या चाचीला चालवलं पाहिजे. निदान बुटाचा तुकडा तरी हजम होईल.

घरी आलो तर बामजी माझी वाट बघत उभे होते.

ते म्हणाले, "काय झालं रे छगन ?"

मी म्हटलं, "काही विशेष नाही. डॉक्टरांनी दोन गोळ्या दिल्या."

( पान ९८ वर पहा )

अनुक्रमणिका

نوشته نیست به هوشی از عبارت سیواجی بنام متصدیان

دو انایان بادشاه عالمگیر انکه برضمایر انوار الابصار و خواطر ذوی

الافکار پوشیده نماند هر وزرای نامدار و امرای نامدار از مدت

سه سال درین صوبه تشریف آورده و حسب الحکم حضرت صاحبقرانی

خداوندگیتی ستانی محو بضبط وطن و قلاع این کس مصدور می باید

جواب می نویسند که عنقریب مفتوح خواهد شد و نمی دانند

که سمند تلاش بیقیاس در تنگ این مکان معرض عاجز است

و بدست آوردن دشوار ماعدت تعجب ست که از تحریر انشت

تصویر شو بر هیچ نه اندیشیده راستی را که موجب استکار از دست

आलमगीर बादशहाच्या मुत्सद्यांना व विचारवंतांना
पाठविलेले शिवाजीराजांचे मूळ फारसी पत्र

चित्रकार द. ग. गोडसे

**प्रेरणा**

लेखांक १ ला

प्रभाव

# शिवरायांचे लिहिणे कैसे?

**.... 'दीपावली' तून 'पोत' ही लेखमाला प्रसिद्ध होत असतानाच ' हा ललित प्रबंध डॉक्टरेट देण्याच्या पात्रतेचा आहे' असे धन्योद्गार अनेक जाणकार साहित्यिकांनी ज्या लेखकाबद्दल काढले त्याच चित्रकार श्री. द. ग. गोडसे यांची ही तेवढ्याच तोलाची विचारप्रक्षोभक आणि ललितरम्य लेखमाला...**

अज महाराज सिवाजी
    बनामे मुतसद्दियान व दानायाने बादशहा आलमगीर...

आलमगीर बादशहाच्या मुत्सद्यांना व विचारवंतांना
    शिवाजी महाराजांकडून...

शिवाजीराजांनी इ. स. १६६४-६५ च्या दरम्यान, औरंगजेबाच्या काही मुत्सद्यांना व विचारवंत सल्लागारांना जे फारसी पत्र पाठविले त्या पत्राचा आज पुन्हा विचार करावयाचा आहे. पुन्हा विचार अशासाठी की आमच्यामते शिवाजी राजांचे हे फारसी पत्र, फारसी स्वरुपात, आज बहुधा प्रथमच मराठी वाचकांसमोर येत आहे म्हणून. आजपर्यंत या फारसी पत्राच्या इंग्रजी मराठी भाषांतरांशीच (?) आमचा परिचय होता. ही भाषांतरे यथार्थ नाहीत याची जाणीवही आम्हाला नव्हती; येवढेच नव्हे तर ही अयथार्थ भाषांतरे म्हणजेच शिवरायांचे मूळ फारसी पत्र असे गैरसमजुतीने धरून चालून ही भाषांतरे साऱ्याच शिवचरित्रविषयक ग्रंथांतून देण्यात येऊन या पत्राचा विचार व अभ्यासही या भाषांतरांनाच प्रमाण समजून आजपर्यंत करण्यात आला आहे.

शिवरायांचे हे फारसी पत्र गेल्या शतकाच्या पूर्वार्धात हिंदुस्थानाबाहेर नेले गेल्यामुळे, ते प्रत्यक्षात काय आहे हे अभ्यासण्याची सोयही नव्हती व तसा आजपर्यंत मराठी इतिहासकारांनी प्रयत्न केल्याचेही आढळून येत नाही. त्यामुळे आजपर्यंत, या पत्राच्या निरनिराळ्या भाषांतरातील अयथार्थता तर उघडकीस आली नाहीच, तसेच मूळ पत्राच्या सत्यस्वरूपाचाही कोणाला बोध होऊ शकला नाही. आज शिवरायांचे हे पत्र त्याच्या फारसी उपलब्ध स्वरूपात समोर ठेवून एका वेगळ्या दृष्टिकोनातून अभ्यासण्याचा प्रयत्न करावयाचा आहे.

लंडन येथील रॉयल एशिआटिक सोसायटीच्या ग्रंथालयात फारसी" हस्तलिखितांची बाडे आहेत. या बाडातील "खुतुत इ सिवाजी' या नावाच्या संग्रहात शिवाजी राजांचे उपरोक्त पत्र आहे. "खुतुत इ सिवाजी" म्हणजे शिवाजीची पत्रे. नावाबरहुकुम ती अनेक असावयास पाहिजेत; परंतु या संग्रहात शिवाजी राजांचे येवढे एकच पत्र आहे आणि क्रमांकाने ते पहिलेच आहे. बाकी इतर फारसी पत्रे व फर्माने आहेत. औरंगजेबाने मराठा सरदारांना लिहिलेली, शाहूने निझामाला पाठविलेले, औरंगजेबाचा मुलगा अकबर याने संभाजी राजांचा मंत्री कविकलश यांस लिहिलेले, मोगलसरदारांनी पाठविलेली बातमीपत्रे; औरंगजेबाची फर्माने आणि औरंगजेब व अकबर या बापलेकात झालेला अखेरचा कडवट पत्रव्यवहार इ. इ. त्यातील काही विशेष. शिवाजी राजांचे पत्र पहिलेच असल्यामुळे कदाचित ह्या संग्रहाला चुकीने शिवाजीची पत्रे असे नाव देण्यात आले असावे.

'खुतुत इ सिवाजी' या पत्रसंग्रहावर फेरिश्ताचा प्रसिद्ध भाषांतरकार जनरल ब्रिग्ज याचे नाव आहे. ब्रिग्ज स्वत: फारसी भाषा तज्ज्ञ होता. त्याने अनेक अस्सल फारसी कागदपत्रे इ. स. १८३५ साली इंग्लंडमध्ये नेल्याचे कळते. या कागदपत्रात शिवकालीन फारसी पत्रेही असली पाहिजेत याची जाणीव इतिहासाचार्य राजवाडे यांना होती. "ब्रिग्ज, ग्रँट डफ, म्यॅकेन्झी इत्यादी गृहस्थांनी विलायतेत नेलेले कागद-





अनुक्रमणिका

पत्र लंडन येथे जाऊन शोधले पाहिजेत," असे त्यानी मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड १ च्या प्रस्तावनेत बजावले आहे.

गेल्या शतकाच्या पूर्वार्धात इंग्लंडमध्ये नेण्यात आलेल्या ह्या मूळ फारसी कागदपत्रांच्या नकला, जनरल ब्रिग्जने करून ठेवल्या होत्या असे दिसते. "खुतुत इ सिवाजी" हा पत्रसंग्रह आज उपलब्ध आहे तो अशा नकललेल्या स्वरुपात. ह्या नकला शिकस्ता लिपीत करण्यात आल्या असून स्वतः ब्रिग्जच्या देखरेखीखाली त्याने नेलेल्या मूळ कागदपत्रांवरूनच करण्यात आल्या आहेत. स्वतः ब्रिग्ज फारसी जाणकार असल्यामुळे त्याने करवून घेतलेल्या ह्या नकला, मूळ, अस्सल पत्रावरहुकुमच असाव्यात असे धरून चालण्यास प्रत्यवाय नसावा.

सारांश, आज विचारात घ्यावयाचे शिवाजी राजांचे फारसी पत्र हे अस्सल स्वरुपात नसून, शिकस्ता लिपीत मुळावरून 'नकललेले' आहे हे घ्यानात ठेवणे आवश्यक आहे. बहुधा, मूळ फारसी पत्र नक्स-लिपीत असावे व त्याची ही नकल शिकस्ता लिपीत करण्यात आली असावी. नकल करताना काही फरकही झाले असण्याची शक्यता आहे. परंतु तो फरक मजकुरात न होता लेखनतंत्रात झाला असावा येवढेच. आज उपलब्ध असलेल्या पत्रातील मजकुराचे स्वरुप, विचार-संगती, उत्कटता, भाषासौष्ठव इत्यादींचा विचार करता मूळ फारसी पत्रात व ह्या नकलेत अर्थाच्या दृष्टीन तरी फारसा फरक झाला नसावा.

नकल करताना सुद्धा मूळपत्रातील मजकूर गोळाबेरजेने देण्याची काही नकलकारांची प्रवृत्ती असते. परंतु अशी गोळाबेरजी नकल ओळखता येते. तिच्यातील त्रुटी वाचतानाच जाणवतात. शिवाजी राजांच्या पत्राची ही नकल गोळाबेरजी असावी असे वाटत नाही. या नकलेतील साराच मजकूर येवढा एकसंध व संगतवार आहे की मुळातील काही भाग नकलेत गाळण्यात आला असावा ह्या शंकेला जागा उरत नाही.

सारांश, शिवाजी राजांच्या मूळ फारसी पत्राची ही उपलब्ध नकल मजकुराच्या दृष्टीने मूळ फारसी पत्रावरहुकूमच आहे असे जाणवल्यानंतरच पुढील सारे विवेचन केले आहे. चूक भूल देणे घेणे.

शिवाजी राजांचे पत्र म्हणजे शिवाजी राजांनी सांगितलेले व लेखनिकाने लिहून घेतलेले पत्र. अशी पत्रे लिहिणारे शिवाजी राजांचे किमान दोन लेखनिक प्रसिद्ध आहेत. राजांची फारसी पत्रे लिहिणारे मुन्शी नील प्रभू आणि मराठी मजकूर मोडी लिपीत लिहिणारे बाळाजी आवजी. आज ज्या पत्राचा विचार करावयाचा आहे ते फारसी पत्र राजांनी सांगितलेले व मुन्शी नील प्रभूंनी लिहिलेले.

पत्रलेखनाच्या ह्या पद्धतीत राजांनी सांगितलेला मजकूर किती व लेखनिकाने त्यात स्वतःचा म्हणून घातलेला मजकूर कोणता, यावद्दल शंका निर्माण होण्यास वाव आहे. शिवाजी राजांच्या इतर राज्यकार-भारविषयक पत्रातून मुन्शीने अथवा लेखनिकाने घातलेला ठराविक राज्यकारभारविषयक परिभाषेचा मजकूर येणे शक्य आहे व तसा तो इतर अनेक पत्रांतून आलाही आहे. अथवा लेखनिकाने स्वतः तयार केलेला मजकूर, राजांना वाचून दाखवून, राजांनी त्याला आपली अनुमति दिली असेही असण्याची शक्यता आहे. किंवा राजांनी मजकूर सांगितला व त्याचा तर्जुमा नील प्रभूंनी फारसीत केला असेही कोणी म्हणू शकेल. या साऱ्या शंकांचा विचार करून ह्या पत्रातील मजकुराचा अभ्यास केल्यानंतर मात्र, सुरुवातीच्या मायन्यांचा ठराविक भाग वगळून बाकी सर्व मजकूर स्वतः शिवाजी राजांच्या तोंडचाच आहे यावद्दल शंका रहात नाही.

आज विचारात घेतलेले पत्र केवळ राज्यकारभारविषयक नाही किंवा ठराविक परिभाषेत लिहिलेला तो सरकारी लेखही नाही. याउलट सतराव्या शतकातील, एका प्रभावी व्यक्तिमत्वाचे शब्दांकित झालेले ते मनोगत आहे. विचार व भावना नेटक्या उत्कटतेने आविष्का-रित करणारे ते एक भाष्य आहे. या विचार व भावनांची उत्कटता व उद्‌गारातील सूचकता लक्षात घेतली की हा मजकूर खुद्द शिवरायां-चाच; लेखनिक नील प्रभू अथवा इतर कोणाला तो सुचणेच शक्य नाही यावद्दल खात्री वाटते. किंबहुना मजकुराचा साराच थाट-घाट येवढा शिवाजी 'बाणाचा' आहे, की सूक्ष्म निरीक्षण केल्यास शिव-रायांचे व्यक्तिमत्व या लहानशा लेखात प्रतिबिंबित झालेले दिसावे. लेखनिक नील प्रभू, फारसी भाषाप्रभू असेलही; परंतु एखाद्या भाषाप्रभूने लिहिलेले हे केवळ 'कलमकारी' पत्र नव्हे! स्वतः शिवाजी राजांना फारसी भाषा चांगली अवगत होती याचे दाखले कागदोपत्री आहेतच. फारसी संस्कृतीबरोबरच फारसी भाषाही राजांनी पूर्ण आत्मसात् केली होती व प्रसंगविशेषी आपले मनोगत फारसी जाणकारांनाही त्यांच्याच शब्दात ते किती प्रभावीपणे विशद करू शकत याचे हे पत्र उत्कृष्ट उदाहरण आहे.

**'आकाशवाणी': परिसंवाद!**



**...आपण प्रथम वाचकांचे दोन ढोबळ गट करू; एक खेड्यातील निरक्षर वाचकांचा आणि दुसरा शहरातील साक्षर वाचकांचा...**

पण येथे खरा प्रश्न भाषाप्रभुत्वाचा नाहीच. तो आहे भाषेत आविष्कारित होणाऱ्या जाणीवा निष्ठांचा आणि विचार भावनांचा व यांचे प्रभुत्व आहे शिवरायांकडे. या पत्रातील जाणीवा निष्ठा, त्याचप्रमाणे पत्रातील विचार व भावना स्वभावतःच प्रभावी असल्यामुळे भाषेचे साधनही त्यांच्या प्रभावाने उजळून निघाले येवढेच. कोणाही भाषाप्रभूच्या केवळ 'क़ागज़ी' करामतीला हे साधणे शक्य नव्हते.

शिवाजी राजांची आज जवळ जवळ दोनशे पत्रे उपलब्ध आहेत. शिवाजी राजांकडून पाठविण्यात आलेली सरकारी, बिनसरकारी आणि खाजगी. या साऱ्यांची अस्सल पत्रे आज उपलब्ध नाहीत. बहुतेकांच्या नकलाच सापडल्या आहेत. मूळ पत्रांच्या नकला करणारांनीही नकला करताना घोटाळे करून ठेवलेले आढळतात. उतारे करताना त्यांनी मुळातील मजकुरात काही फेरफारही केले असण्याची शक्यता आहे. काही मूळ फारसी पत्रांची भाषांतरे आहेत. ही भाषांतरे शिवकालीन नसून अलीकडे करण्यात आली आहेत. शिवाय ती मूळ फारसी पत्रांची यथार्थ भाषांतरेही नाहीत. काही या तथाकथित भाषांतरांची पुन्हा वेगळ्या भाषेत केलेली भाषांतरे आहेत– व तीही मूळ फारसी मजकुराशी तर सोडाच, परंतु त्याच्या भाषांतरित मजकुराशीही प्रामाणिक नाहीत.

आज अभ्यासावयाच्या शिवरायांच्या फारसी पत्राची कथा अशीच करुण आहे.

इ. स. १६६४–६५च्या दरम्यान शिवाजी राजांनी हे फारसी पत्र लिहीले. ह्या पत्राच्या प्रती शिवरायांनी औरंगजेबाच्या अनेक सरदार सेनापतींना पाठविल्या होत्या याचा पुरावा मोंगल सेनापती जयसिंग व दिलीरखान ह्यांनी शिवाजी राजांस पाठविलेल्या उत्तरात पहावयास मिळतो. राजांच्या ह्या पत्रातील काही वाक्प्रचार व कल्पना यांचा दोघांनीही आपल्या उत्तरात उल्लेख केल्याचे वाचून तर या पत्राच्या खरेपणाबद्दल खात्रीच पटते.

हे मूळ पत्र जनरल ब्रिग्जने इंग्लंडमध्ये नेले व शेवटी त्याची नकल खुतत इ सिवाजी या संग्रहात, रॉयल एशिआटिक सोसायटीच्या ग्रंथालयात ठेवण्यात आली. विसाव्या शतकाच्या पहिल्या दशकात, प्रसिद्ध इतिहासकार जदुनाथ सरकार यांनी, या पत्राची नकल लंडनहून मागवून तिचे इंग्रजी भाषांतर 'मॉडर्न रिव्ह्यू'च्या जानेवारी १९०७ च्या अंकात प्रथम छापले. त्यावेळी फोटोप्रत काढण्याची आधुनिक सोय नसल्यामुळे लंडनमध्ये असलेल्या उपरिनिर्दिष्ट नकलेवरून, नकललेली नकलच जदुनाथांना मिळाली असावी. जदुनाथांनी प्रसिद्ध केलेल्या या इंग्रजी भाषांतरावरून रियासतकार सरदेसाई यांनी या पत्रातील काही भागाचे–संपूर्ण पत्राचे नव्हे–गोळाबेरजेने मराठी भाषांतर करून ते मराठी रियासतीच्या दुसऱ्या भागात छापले (पान ९४) आणि गंमत अशी की रियासतकारांचे हे, जदुनाथांच्या इंग्रजी भाषांतराचे अपूर्ण व भोंगळ मराठी भाषांतरच आज साऱ्या शिवचरित्रविषयक ग्रंथातून, मूळ फारसी पत्राचे प्रमाणित भाषांतर म्हणून सर्रास देण्यात येते. पुढे सरदेसायांनी मराठ्यांचा

इतिहास इंग्रजीत छापला. त्यातही त्यांनी या पत्राचे एक वेगळेच गोळाबेरीजी इंग्रजी काहीतरी छापले.

म्हणजे पहा– मूळ शिवकालीन फारसी पत्र, नंतर त्याची शिकस्ता लिपीतील नकल; या नकलेचे भावार्थाने इंग्रजीत भाषांतर, या भाषांतराचे पुन्हा अपूर्ण आणि सदोष मराठी भाषांतर आणि शेवटी या भोंगळ भाषांतराचेही तथाकथित इंग्रजी काहीतरी ! ! या अनेक कायापालटीत मूळ पत्रातील फारसी मजकूर सही सलामत सुटणे सुतराम अशक्य !

जदुनाथ सरकारांनी मूळ फारसी नकलेवरून केलेले इंग्रजी भाषांतरच यथार्थ नाही. किंबहुना यथार्थ भाषांतर करण्यापेक्षा भावार्थ लक्षात घेऊन ते करणे असाच त्यांचा उद्देश होता व तो त्यांनी आपल्या House of Shivaji या पुस्तकात नमूदही करून ठेवला आहे. (आवृत्ती तिसरी, पान ११७) त्या उद्देशानुसार हे भाषांतर, काही ठिकाणी मूळ फारसी शब्दांचा व कल्पनांचा त्यांना अभिप्रेत झाला तो अर्थ लावून तर काही ठिकाणी गोळाबेरजेने केवळ भावार्थ लक्षात घेऊन करण्यात आले आहे. असे असले तरी जदुनाथांनी मूळ संपूर्ण फारसी पत्राचे भाषांतर केले आहे हे निश्चित. सरदेसायांना मूळ फारसी पत्र बघण्याची संधी मिळाली नसावी, अथवा त्याची आवश्यकता वाटली नसावी. त्यांनी जदुनाथांच्या इंग्रजी भाषांतरावर सर्वस्वी विसंबून हे पत्र मराठीत भाषांतरित केले पण ते संपूर्ण नव्हे, तर त्यातील काही भाग वगळून (आमच्या मते महत्त्वाचा भाग) शिवाय जदुनाथांच्या इंग्रजी भाषांतराचे सरदेसायांनी केलेले मराठी भाषांतरही व्यवस्थित नाही. यथार्थाने नाहीच पण भावार्थानेही नाही. खरं म्हणजे ते भाषांतरच नाही. ते वेगळेच काही तरी आहे. शिवाजी व जदुनाथ ह्या दोघांपासूनही वेगळे. सरदेसायांच्या या तथाकथित भाषांतरातील अव्यवस्थितपणा एकवेळ समजण्यासारखा आहे पण मूळ पत्रातील काही भाग वगळण्यातील त्यांचे धोरण मात्र केवळ अगम्य आहे.



पुढे सरदेसायांच्या इंग्रजी 'न्यू मराठा हिस्ट्री"मध्ये हे पत्र देतेवेळी तरी त्यांनी किमान जदुनाथांचेच इंग्रजी भाषांतर द्यावयाचे होते! परंतु तसे न करता ह्याच पत्राचे जे तथाकथित इंग्रजीकरण देण्यात आले आहे ते तर सर्वस्वीच निराळे आहे.

वास्तविक पहाता शिवाजी राजांचे हे फारसी पत्र लंडनच्या रॉयल एशिआटिक सोसायटीच्या ग्रंथायलात आहे याची नोंद जदुनाथ सरकारांनी या पत्राचे इंग्रजी भाषांतर छापले त्यावेळीच प्रस्तावनेत केली होती. (मॉडर्न रिव्ह्यू, जानेवारी १९०७). या पत्राची नकल तेथून मागविण्याचा प्रयत्न मराठी इतिहासकारांपैकी कोणीही, केलेला आढळत नाही; सरदेसायांनीही नाही. कदाचित साधनांच्या अभावी तसे करणे शक्य झाले नसावे; शिवाय इतर काही अडचणीही असतील. अशा परिस्थितीत जदुनाथानी केलेले इंग्रजी भाषांतर, सरदेसायांनी सर्वस्वी प्रमाणित मानावयास नको होते. शिवाय या भाषांतराचेही अर्धवट भाषांतर न करता संपूर्ण भाषांतर करावयास पाहिजे होते.

या पत्राच्या यथार्थ भाषांतराबाबत जदुनाथांसकट सर्वांनीच दुर्लक्ष केले असे वाटते. शब्दाला शब्द ठेवून अथवा गोळाबेरजेने अर्थ लावून भाषांतर होत नसते. म्हणूनच मूळ फारसी पत्रातील शब्द प्रतिमा, वाक्प्रचारांचा नेमका आशय जाणून घेऊन भाषांतरकारांनी त्या आशयाची आपल्या भाषेत पुन्हा शब्द प्रतिभा, वाक्प्रचारांनीं समर्पक निर्मिती करण्याचा प्रयत्न करणे इष्ट होते. आशयाची समर्पकता मजकुरातील (आविष्कारातील) शब्द, प्रतिमा वाक्प्रचारांच्या योजनेत व त्यांच्या अंतर्गत संघटनेत असते. या अंतर्गत संघटनेचा अभ्यास म्हणजेच पोताचा अभ्यास. हा अभ्यास भाषांतरकारांनी दुर्लक्षिल्यामुळेच ह्या पत्राची भाषांतरे ढिसाळ तर झालीच पण त्याचबरोबर मूळ पत्रालाही अन्याय करती झाली. या पत्राचा अभ्यासकही त्यामुळेच गोंधळतो. या पत्राचे प्रसिद्ध मराठी भाषांतर वाचावे ते विसंगत वाटते. त्याचे मूळ जे जदुनाथ सरकारांचे इंग्रजी भाषांतर वाचावे तर त्यात व मराठी भाषांतरात मजकूर व अर्थ या दोन्ही बाबतीत तफावत असल्याचे आढळते. शेवटी जदुनाथ सरकारांनी ज्या फारसी पत्रावरून भाषांतर केले ते मूळ पत्र अभ्यासावे तर ते प्रत्यक्षात दोन्हीपेक्षा वेगळेच असल्याचा शोध लागतो.

आमचे लक्ष या मूळ फारसी पत्राकडे जाण्याचे कारण, मराठी इंग्रजीतील भाषांतरेच. शिवकालीन गद्यपद्य साहित्याचा "पोताच्या" दृष्टीकोनातून विचार करीत असता, या भाषांतरित पत्रातील मजकुराचा शिवकालीन अस्सल साहित्याशी मेळ बसेना. तेव्हा मूळ फारसी पत्र काय आहे हे पाहणे आवश्यक वाटले. लंडनच्या रॉयल एशिआटिक सोसायटीतून मूळ पत्राची फोटोप्रत मागविली आणि तिच्या अभ्यासाने, मूळ पत्र व त्याची निरनिराळी भाषांतरे यांच्यातील गोंधळ स्पष्ट झाला.

शिवाजी राजांचे हे फारसी पत्र केवळ राजकीय व्यवहाराचे सरधोपट असे असते तर त्याची अथवा त्याच्या अनेक भल्याबुऱ्या









ापांतर रूपांतरांची येवढी चिकित्सा करण्याचे कारण नव्हते. केवळ ाजकीय व्यवहाराच्या पत्रांची भाषांतरे त्या पत्रांच्या सरधोपट कृतीमुळे अधिक प्रामाणिकही झाली असती. परंतु हे पत्र राजकार-ातले सरधोपट तर नाहीच उलट तो एका अर्थाने शिवाजी राजांचे नोगत आविष्कारित करणारा एक महत्वाचा लेख आहे हे भाषांतर-र्त्यांनी न ओळखल्यामुळे ह्या पत्राच्या निरनिराळ्या भाषांतरात ढसाळपणा आला. येवढेच नव्हे तर या साऱ्या भाषांतरातील वेंगरूळ-णामुळेच मूळ फारसी पत्राच्या गुणवत्तेकडेही आजपर्यंत कोणाचे क्ष गेले नसावे.

सारांश, पत्रातील मजकुराच्या पोताचा, भाषांतरकारांनी अभ्यास रूनच त्याचे भाषांतर करावयास पाहिजे होते. हे पत्र लिहिणाऱ्या ावाजी राजांची विशिष्ट जीवननिष्ठा, या निष्ठेमुळे निर्माण ालेल्या जाणीवा व ह्या जाणीवा विशद करण्याकरिता वापरण्यात ालेल्या भाषेचे तंत्र इ. इ. या पत्ररूपी आविष्काराच्या, पोताच्या टकांची जर भाषांतरकर्त्यांनी अभ्यासपूर्वक दखल घेतली असती तर ा पत्राची भाषांतरे मूळ फारसी पत्राशी अधिक जवळीकीची झाली सती.

मूळ फारसी पत्राच्या पोताचे आम्ही निरीक्षण केले तेव्हा आम्हास ाय आढळले ? शिवकालीन आविष्काराच्या पोतात आढळणाऱ्या ाळखीच्या साऱ्या खुणा या पत्रातही आढळल्या व शिवाजी राजांचे फारसी पत्र इतर शिवकालीन अस्सल साहित्याच्या मराठी पंक्तीत नासंकोच येऊन वसले.

**ठ फारसी पत्र**

**नविश्त ए नीलप्रभू मुन्शी अज महाराज सिवाजी बनामे मत-द्दयान व दानायान बादशहा ए आलमगीर आन्के बरझमाइरे ठुल अबसार ब रव्वातिरे जविल अबकॉर, पोशीदा न मानद के राये कामगार व उमराये नामदार अजमुद्दते से साल दर इं सौब ारीफ आवर्दन्द व हुक्मे हजरत साहिब करानी खुदावन्दे गीती सतानी हतवी वजब्ते वतन व कल्लाए इं कस के सुदूर मीयाबद जवाब बे ीसन्द के अनकरीब मफतूह ख्वाहद शुद. व नमीदानन्द के समन्दे ाश बेकयास दरतके इन मकान साआब आजिझ अस्त व बदस्ते वुर्दन दुश्वार. वाइसे तआजुब अस्त के अजकसरते तहेरीर तस्वीरे ाए तशवीर हेच न अन्दीशीदा रास्तीरा के मूजिबे रस्तगारी अस्त ादस्त मी दहन्द चे वतन मंजूर मिस्ल कलॅह कल्यान व बीदर के क़ई अरसए वसी के कस्द मोरचहाल. बयूरिश पेश बुरदानीस्त हहाय बुलंद दोसद फरसंग दराज व चहेल फरसंग पहेन दॉरद व ळहाये जाबजा व दुश्वार अजगायद मुस्तहकम शस्त किलाह ासख्त व चन्द बलबे दरिया नीज वाकेअन.**

**चुनानचे अफझलखान अज जानिबे अदालत पनाह बा जुनूद ए ावान बजाए रसीद लाचार व अर्जए तलफ दर आमद चेरा गुजश्तरा अजकरारे वाकेआ मारूजं नमीदौरन्द के बखुदा हानीज कजियाबाज आयद. बाद, खान ए मरहूम अमीर उल उमरा मोहिमे इं कोहाये सपेहर करीन व दर्राहाये कॉरे अमीनरा मुस्तइद शुदा, से साल सय्ये बलिग नमूदन्द व अकल्ले अय्याम व हुजूरे पुरनूर मअरूज न दाश्तन. आखीरस बमक्तझाए दरोग चुनान वाकें हाएला बरखुद मुआएना नमूदा शरमिन्दा रफतन्द के अज हरमिनशम्स**

**न हरजाए मरकब तवान ताखतन...**
**के जाहा सिपर बायद अनदाख्तन.**
**इं कसरा मुहाफिजते वतन खुद लाजिम**
**हरचन्द बराए व कॉरे खुद खिलाफे वाकेआ बनवीसन्द**
**फा अम्मा अजकरामे एजदे मतआल गुनचाए मुराद बर आइंदा**
**आरिंदे खुसूमत दर वतन ए मालूफे इं गोषा नशोन शगुफ्ता नयाफ्ता अस्त**
**बतरसद खेरतमन्द जीं बहरे खून..**
**कॅझूकस नबुरदास्त कश्ती बुरूं.**

जदुनाथ सरकारांनी जानेवारी १९०७ च्या 'मॉडर्न रिव्ह्यू'मध्ये छापलेले, शिवरायांच्या वरील फारसी पत्राचे इंग्रजी भाषांतर :

**From Maharaja Shivaji, to Officers and Councillors of the Emperor Alamgir**

Letter written by **Nil Prabhoo, Munshi.**

Be it not concealed from the hearts of foresighted and thoughtful men, that for the last three years, the able Councillors and famous generals (of the Emperor) have come to these parts. To the orders issued by the Emperor for seizing my country and forts they reply "these will be soon conquered". They do not know that even the steed of unimaginable exertion is too weak to gallop over this hard Country and that it's conquest is difficult. It is a matter of great wonder that they do not at all expect the fruit of shame from such writings filled with ficti ious statements, but (on the contrary) cast off truthfulness, which is the cause of salvation. And why ? My home unlike the forts of Kalyan and Bidar, is not situated on a specious plain, which may enable trenches to be run (against the walls) or assault to be made. It has lofty hill ranges two hundred leagues in length and forty leagues in breadth; everywhere there are nullahs hard to cross, sixty forts of extreme strength have been built, and some of them are on the sea coast.

Hence Afzalkhan, an officer of Adilshah (Ali II King of Bijapur) came to Jauli with a large army but perished helplessly. Why do not you truly report to the Emperor what has happened here, so that the same fate may not overtake you ?

After the death of the abovementioned Khan the Amir-ul-umra, who was appointed against these sky-kissing hills and abysmal passes, laboured hard for three years and constantly wrote to the Emperor that I was going to be defeated and my land conquered in the shortest space of time.

But at last, as all false men deserve, he encountered such a terrible disaster and went away in such a disgrace that it is clearer than the Sun —

> "It is not everywhere that the charger can gallop There are places where one has to fling away his shield".

It is my duty to guard my land. Although to save their reputation they had written to the Emperor the opposite of the t ue state of things, yet thank God, the bud of desire of no inva!or of the beloved country of this retired man has (yet) blossomed forth —

> The wise should beware of this river of blood From which no man (ever) carried away his boat in safety.

रियासतकार सरदेसाई यांनी जदुनाथ सरकारांच्या इंग्रजी भाषांतरावरून केलेले मराठी भाषांतर (मराठी रियासत भाग २, पृष्ठ ९४)

आज तीन वर्षे वादशहाचे मोठमोठे सल्लागार व योद्धे आमचा प्रदेश कावीज करण्यासाठी चालून येत आहेत, हे तुम्हां सर्वांस माहीत आहे. वादशहा हुकूम फर्मावितात, 'शिवाजीचे किल्ले व मुलुख कावीज करा.' तुम्ही जवाव पाठविता 'आम्ही लवकरच कावीज करतो.' आमच्या या कठीण प्रदेशात नुसता कल्पनेचा घोडा सुद्धा नाचविणे कठीण आहे. मग तो प्रदेश कावीज करण्याची गोष्ट कशाला! भलत्याच खोट्या वातम्या वादशहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हांला लाज कशी वाटत नाही! कल्याणी व वेदरचे किल्ले केवळ उघडच्या मैदानात होते ते तुम्ही कावीज केले. आमचा प्रदेश अवघड व डोंगराळ आहे. नदीनाले उतरून जाण्यास वाट नाही. अत्यंत मजबूत असे साठ किल्ले आज माझे तयार आहेत. पैकी काही समुद्र-किनाऱ्यावर आहेत. बिचारा अफझलखान जावळीवर फौज घेऊन आला आणि नाहक मृत्युमुखी पडला. हा सर्व प्रकार तुम्ही आपल्या बादशहास का कळवीत नाही? अमीर उल उमराव शाइस्तेखान आमच्या या गगनचुंवित डोंगरात व पाताळास पोचणाऱ्या खोऱ्यात तीन वर्षे सारखा खपत होता. 'शिवाजीचा पाडाव करून लवकरच त्याचा प्रदेश कावीज करतो,' असे बादशहाकडे लिहून लिहून थकला. ह्या खोडसाळ वर्तनाचा परिणाम त्याला भोवला. तो परिणाम सूर्यासारखा स्वच्छ सर्वांच्या समोर आहे. आपल्या भूमीचे संरक्षण करणे हे माझे कर्तव्य आहे. आणि तुम्ही बादशहाकडे कितीही खोट्या बातम्या लिहून पाठविल्या तरी मी आपले कर्तव्य बजावण्यास चुकणार नाही.



सरदेसायांनी त्यांच्या New History of the Marathas या ग्रंथात (सरकारांच्या मूळ इंग्रजी भाषांतराचा तळटीपेत उल्लेख करून) शिवाजी राजांच्या फारसी पत्राचे इंग्रजी भाषांतर म्हणून देण्यात आलेला मजकूर (New History of Marathas Vol. I Page 150)

At thi; time (1664) Shivaji wrote a very strong letter to the Officers and Coun; llors of the Emperor in which he wrote :—

"You very well know what results have been achieved by the famous generals and able Counsellors sent by the Empe or du ing the last three years for seizing my country and my forts. How is it you don't realize that this is an impossible task? Your officers are not ashamed of reporting entirely fictitious accounts. My home here is not like the towns of Kalyani and Bedar which could be easily assaulted and taken. My country has lofty hill-ranges two hundred leagues in length and forty in breadth and is well protected by sixty strong forts newly built. Afzalkhan came against me and perished helplessly. Your great Amir-ul-umra Shaista Khan laboured hard for three years and went away in disgrace after suffering a terrible disaster. It is my duty to guard my land, and I will do it. Thank God, no invador of my beloved country has yet blossomed forth.

फारसी पत्रावरून करण्यात आलेला मराठी तर्जुमा.

आलमगीर बादशहाच्या मुत्सद्यांना व विचारवंतांना....

शिवाजी महाराजांकडून, मुन्शी नील प्रभूलिखित,

अत्यंत बुद्धिमान व दूरदृष्टि विचारवंतांपासून ही गोष्ट लपून राहू शकत नाही की बादशहाचे कर्तबगार अधिकारी व नामवंत सरदार (माझ्या) प्रांतात गेली तीन वर्षे येत आहेत व त्यांना "माझे वतन व किल्ले जप्त करा असा पृथ्वीपती बादशहाचा हुकूम




अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

आहे. त्यास (हुकुमास) ते येथून लिहून पाठवितात की "ते (वतन व किल्ले) आम्ही थोड्याच दिवसात काबीज करतो."

ते (अधिकारी) जाणत नाहीत की तर्काचा कल्पनातीत घोडा सुद्धा या अवघड डोंगरी मुलुखात दौड करण्यास असमर्थ ठरतो व हा प्रांत हाती येण्यास कठीण आहे.

बादशहाला वारंवार (असे) खोटे लिहूनही अखेर परिणाम (त्या सरदारांची) नामुष्की हाच झाला. आश्चर्य आहे की, सत्यकथनाचे मूळ जे सत्य तेच त्यांनी (आपल्या) हातून घालविले होते; याचा त्यांनी मुळी विचारच केला नाही.

कल्याण व बीदर हे खुल्या मैदानातले किल्ले (त्यांनी) मोर्चे लावून चढाई करून घेतले. पण माझे वतन असे चढाई करण्यालायक नाहीच. येथे प्रचंड उंच पहाड आहेत; दोनशे मैल लांब व चाळीस मैल रुंद; व ठायी ठायी नाले. शिवाय अत्यंत दुर्गम व मजबूत असे साठ किल्ले बांधलेले पैकी, काही समुद्रकिनाऱ्यावर.

अफझलखान (विजापूरच्या) बादशहाच्या वतीने प्रचंड फौज घेऊन येथे पोहोचला व शेवटी अगतिक बनून नाश पावला. त्याचा सर्वस्वी नाश झाला. हा प्रत्यक्ष घडलेला वृत्तान्त त्यांनी (सरदारांनी) बादशहाला कळविला नाही... का ?– त्याच आपत्तीपासून त्यांनी स्वतःसही (कदाचित) वाचविले असते.

खानाच्या मृत्यूनंतर अमीर-उल-उमरा (शायस्ताखान) मोहीम घेऊन आला. आकाशा[illegible] भिडलेले उत्तुंग प्रचंड पहाड व थांग न लागणाऱ्या दऱ्या व खोरी यात सतत तीन वर्षे शक्तीपलीकडे अफाट प्रयत्न करूनही अखेर हा प्रांत काबीज करण्यात तो अयशस्वी झाला. तरी तो बादशहाला लिहून कळवीत होता की "याचे (माझे) वतन तावडतोब जप्त करून थोड्याच अवधीत मी बादशहा सलामतच्या खिदमतीत हाजर होत आहे."

शेवटी (असे) खोटे लिहिण्याचे फळ म्हणजे प्रचंड पराभव व वाताहत होऊन तो शरमिंदा होऊन परत गेला; ही वस्तुस्थिती सूर्यापेक्षा सुद्धा स्पष्ट व जाहीर आहे.

(काव्यपंक्ती)

"(आक्रमकाचा) घोडा जगात सर्वत्र दौडू शकत नाही
(काही) जागा अशाही असतात (की त्याठिकाणी– आक्रमकाला) आपली ढाल (शरणागतीमुळे) खाली ठेवावी लागते."

मला, माझ्या वतनाचे संरक्षण स्वयं–आवश्यक (आहे)

जरी आपली इभ्रत राखण्याकरिता त्यांनी (सरदारांनी) सत्यपरिस्थितीच्या विरुद्ध लिहून (खोटा) वृत्तान्त कळविला असला तरी सर्व शक्तिमान प्रभूच्या कृपेने या माझ्या प्रिय वतनात व माझ्यासारख्या एकीकडे रहाणाऱ्या व्यक्तीविरुद्ध शत्रुत्व घेऊन येणाऱ्या (कोणाही) आक्रमकाच्या मनातील (दुष्ट) हेतूची कळी अजून तरी कधी पुरती उमलली नाही.

(काव्यपंक्ती)–"सूज्ञांनी या रक्ताच्या समुद्राचे भय बाळगणेच इष्ट
कारण (या समुद्रातून) कोणालाही आपली नाव सुरक्षितपणे नेता आली नाही."

टीप:–शिवाजी राजांच्या फारसी पत्राचा आम्ही केलेला हा तर्जुमा आजच्या मराठी भाषेचा स्वीकार करूनच केलेला आहे. शिवकालीन मराठी शब्दकळा आणि वाक्यरचना येथे समर्थपणे योजता आली असती तर हवे होते. तथापि शिवरायांची प्रतिमा स्वच्छपणे दिसावी याकडे मात्र कटाक्षाने लक्ष पुरविले आहे.

इ. स. १६६३–६४ मधील शिवाजी राजांचे पराक्रम एकापरी एक अशा चढत्या उमेदीचे झाले की मोगल बादशहा आलमगीरही अस्वस्थ झाला. अफझलखान अंगे मारल्याची खबर जुनी होत नाही तोच शायस्तेखानावरच्या धाडसी हल्ल्याची बातमी येऊन थडकली. ती ऐकत असतानाच सुरत लुटली जाऊन पाऊण कोटीची मालमत्ता शिवाजी राजांनी रायगडी सुखरूप नेल्याचे कळले. हे सारे सहन करून स्वस्थ बसणे आलमगीरच्या स्वभावातच नव्हते. शिवाजी राजांचा पुरा बंदोबस्त करण्याचा त्याने निश्चय केला. आणि ३० सप्टेंबर १६६४ या दिवशी राजा जयसिंग या मातबर रजपूत सरदाराची शिवाजीच्या स्वारीवर नेमणूक केली. हिजरी सन १०७५ च्या रबिलावलचा १९ वा चन्द्र.

जयपूरचा मिर्झा राजा जयसिंग म्हणजे मोगल दरबारातील शहाजहानच्या वेळेपासून एक बडे प्रस्थ. कछवाह रजपूत सेनापती तसाच मुरलेला मुत्सद्दी. मोगल बादशहाच्या नात्यातला. तीन पिढ्यांचा नातेसंबंध सांगणारा–बुजुर्ग. जयसिंगाचे आजोबा राजा भगवानदास यानी आपली बहिण अकबरास दिलेली. जयसिंगाचे वडील मानसिंग यांची बहीण जहांगीर बादशहास दिलेली. वयाच्या बाराव्या वर्षापासून मोगल सैन्यात चाकरी करून तरवार गाजविलेला योद्धा. पराजय त्याला ठाऊक नव्हता. मध्य आशियातील बल्क, बदकशानपासून तो अहमदनगर विजापूरपर्यंत आणि काबूल कंदहारपासून मोंघीर मुर्शिदाबादपर्यंत–येवढ्या अफाट चौरसचौरस प्रदेशात लढाया मारलेला अनुभवी सेनापती. लढाईतील बहादुरीबद्दल बक्षिस मिळाले नाही असे साल सुने जायचे नाही. मोगली लष्करात त्याचा मान शहाजाद्यांच्या बरोबरीचा. युद्ध कौशल्यापेक्षाही मुत्सद्देगिरीबद्दल ख्याती विशेष. प्रथमदर्शनीच छाप पाडणारे सैनिकी व्यक्तिमत्व व मुरब्बी मुत्सद्याचे मधुर भाषण. तुर्की, फार्सी, हिंदी या भाषांवर सारखेच प्रभुत्व. फारसी संस्कृतीतील रीतिरिवाज रोमरोमात भिनलेले. राजनिष्ठेबद्दल आलमगिरालाही शंका घेण्यास वाव नाही. देह सदैव बादशहा सलामतच्या खिदमतीत अर्पण केलेला.

असा हा अनुभवी सेनापती व मुरलेला मुत्सद्दी, बरोबर कडवा पठाण सरदार दिलेरखान, दाऊदखान कुरेशी, राजा जयसिंग शिसोदिया, राजा सुजनसिंह बुंदेला आदि अनेक शूर मातबर हिंदू मुसलमान










अनुक्रमणिका

सरदार, कडवे स्वार पठाण व उन्माद रजपूत यांची प्रचंड फौज– शिवाय इतालियन गोलंदाज निकोलाय मनूची याचा पोख्त तोफखाना घेऊन मोठ्या वंदोवस्ताने शिवाजी राजांवर निघाला. . .

"पृथ्वी आकाशापर्यंत एकच धुराळा उठला. ऐसा सेनासमुद्र दक्षिणेस चालिला. . . मुक्काम होय तेथे दीडगांव लांब (व) गांवभर रुंद लष्कर रहात असे."

जयसिंगाच्या स्वारीचे हे मोगली संकट दक्षिणेस उतरण्याच्या सुमारासच शिवाजी राजांनी (बहुधा) आज विचारात घेतलेले फारसी पत्र दक्षिणेतील मोगल सरदारास पाठविले असावे असे दिसते.

साडेतीनशे वर्षे अव्याहत उरावर वसलेले यवनी सत्तेचे जीवघेणे दडपण झुगारून देऊन स्वतःच्या देशात (वतनात) स्वामी म्हणून सर्वांसह मानाने जगण्याचा प्रयत्न करणे; एका बाजूस अदिलशाही व दुसऱ्या बाजूस अजस्र मोगलशाही अशा एकापरी एक बलदंड सत्तांचे यमपाश गळ्याभोवती पडले असताही स्वतंत्र जिणे जगण्याची दुर्दम्य ईर्षा बाळगणे व ह्या ईर्षेच्या सिद्धीसाठी अहर्निश सावधान राहून, प्रसंगी पडेल ते साहस अथवा बलिदान करावयास स्वतः सातत्याने सिद्ध रहाणे व स्वकीयांना सिद्ध करणे असे हे सतीअसीधारेचे खडतर वाण राजांनी मोठ्या जिद्दीने उचलले, ते स्वातंत्र्यावरील अढळ निष्ठेमुळे, वतनाच्या प्रखर जाणीवेमुळे. राजांचे सारे जिवितकार्यच या दोन निष्ठांनी नियत आहे. त्यांच्या प्रत्येक आचारविचार व उच्चारामागे या दोन शक्तींची प्रेरणा आहे. या फारसी पत्रामागेही ह्याच दोन शक्ती उभ्या आहेत.

शिवाजी राजांची ही जीवन निष्ठाच या पत्राविष्काराच्या पोतातील अधिष्ठित शक्ती आहे. आविष्कारातील जाणीवात ती उत्कटतेने प्रतीत झाली आहे. अमूर्त जाणीवांना साकार करणाऱ्या प्रतिमात ती स्पष्टपणे प्रतिबिंबित झाली असून या प्रतिमांचे रूप करणाऱ्या भाषासाधनाचे तंत्र सुद्धा या मूळ शक्तीच्या अनुज्ञेने घडविले गेले असून भाषेच्या तांत्रिक यंत्रणेवर तिचा प्रभावी तावा आहे. आविष्कारातील तालतोलांची स्थिती–गती या सार्वभौम शक्तीनेच नियत केली आहे.

ही उपरिनिर्दिष्ट जीवननिष्ठा या पत्रातील 'वतना'च्या संकल्पनेत साक्षात्कारी झाली आहे आणि म्हणूनच 'वतन' ही संकल्पना ह्या पत्रातील आविष्काराचे एकमेव, स्वयंअधिष्ठित, शक्तिकेंद्र आहे. या शक्तीचा प्रभाव पत्रातील आशयावर आहे तसाच तो आशय साकार करणाऱ्या आकृतीवरही आहे. भाषा माध्यमातील दृष्टांत प्रतिमा, वाक्प्रयोग व शब्द आदि साधनांची तांत्रिक जडणघडण, थाटघाट, तालतोल या शक्तीच्या अनुज्ञेने संयत आहे, नियत आहे, –द्रुत-विलंबित आहे.

पत्राच्या एकंदर मजकुरात 'वतन' हा शब्द पाच वेळा प्रत्यक्ष आला आहे; वतनाची संकल्पना पाच निरनिराळ्या प्रकारांनी सूचित अथवा वर्णन करण्यात आली आहे. मजकुरातील प्रत्येक 'उच्चार' व 'विचार' वतनाच्या संकल्पनेशी प्रत्यक्ष–अप्रत्यक्षपणे निगडीत आहे. मजकुराचा स्रोत अशा थाटात फेकलेला की त्याच्या प्रकाशाच्या आभेने वतनाची संकल्पना–शब्द–वाक्यागणिक आकार घेत घेत शेवटी पूर्णपणे साकार होते ती एका सोलीव, समर्थ व एकसंध प्रतिमेत.

या पत्रातील वचनाचा पहिलाच उल्लेख मुत्सद्देगिरीने करण्यात आला आहे. वादशहा आलमगीरने त्याच्या दक्षिणेत आलेल्या सरदार सेनापतींना पाठविलेल्या 'शिवाजीचे वतन व किल्ले जप्त करा' या हुकुमाचा दाखला शब्दशः देऊन, शिवाजीचे स्वतःचे वतन आहे ही वस्तुथिती स्वतः वादशहालाही मान्य आहे, हे राजानी वादशहाच्या सरदार सेनापतींच्या आवर्जून नजरेस आणून दिले आहे. माझे स्वतःचे वतन असल्याची पावती खुद्द वादशहानेच दिली असल्याची नोंद त्याच्या दक्षिणेतील सरदार सेनापतींनी तर घ्यावीच, शिवाय वादशहाच्या सल्लागारांनी व सरदार उमरावानीही घ्यावी हा उद्देश.

हे वतन खरे. . . परंतु ते प्रत्यक्षात कसे आहे?–त्याची प्रकृती कशी?– हिंदुस्थान वतनापेक्षा या 'दखनी' वतनाचा भूगोल कसा वेगळा आहे याचे थोडक्यात पण अत्यंत समर्पक शब्दात नंतर विवेचन करण्यात आले आहे. राजे लिहितात– 'ते (वादशहाचे दक्षिणेतील सरदार) वादशहाला कळवितात की शिवाजीचे वतन व किल्ले आम्ही थोड्याच दिवसात कावीज करतो. तसे त्यांच्या हातून अजून घडले नाही, तरीही ते वादशहाला खोटा वृत्तांतच कळवीत असतात. माझ्या वतनाचा भूगोल काय आहे याचे त्यानी कधी वर्णन केले आहे काय?– 'समन्दे तलाश वेकयास' या अवघड प्रदेशात 'आजिज्ञ अस्त.'

समन्द म्हणजे उमद्या जातीचा खानदानी घोडा. वदामी रंगाचा व काळ्या शेपटीचा हा घोडा, खास शाही स्वारीचा घोडा समजण्यात येई. मोगल चित्रांतून या घोड्याचे चित्रण नेहमी आढळते. नाजुक, निमुळत्या, टोकदार कानांची चलाख हालचाल करीत, आपली वाकदार मान मोठ्या दिमाखाने डावी-उजवीकडे वळवीत चौफेर शोधक तीक्ष्ण दृष्टिक्षेप टाकून पुन्हापुन्हा आसमंताचा 'तलाश'(शोध) घेणारा तल्लख, अस्वस्थ, उच्चैश्रवा ज्यांनी प्रत्यक्ष अथवा चित्रात पाहिला असेल त्यांनाच या 'समन्दे तलाश'च्या दृष्टांताचे स्वारस्य कळेल. शोधाचा, तर्काचा असा हा 'वेकयास' म्हणजे कल्पनातीत (चपळ) घोडा सुद्धा या अवघड प्रदेशात दौड करण्यास असमर्थ ठरतो, असे राजे लिहितात.

वास्तविक पहाता 'समन्दे कयास' म्हणजे कल्पनेचा घोडा असा सर्वसाधारण रूढ वाक्प्रचार आहे. परंतु याठिकाणी राजांनी म्हटले, समन्दे तलाश, म्हणजे तर्काचा घोडा. कल्पनेऐवजी तर्काची त्यांनी केलेली निवड जेवढी समर्पक आहे तेवढीच सूक्ष्म व व्यापक आहे. खरे म्हणजे हा दृष्टांतच फार मार्मिक आहे. तर्कायेवढाच लक्ष्यवेधी. वाचताक्षणीच घोडदळाच्या कसलेल्या सेनापतीने चमकून लगाम ओढावा असा; परंतु ह्या पत्राच्या साऱ्याच भाषांतरकारांनी या









सुंदर दृष्टांताचा कसा विचका केला आहे हे स्वतः वाचकांनीच ताडून पहावे.

राजे पुढे लिहितात "–असा हा दुर्गम प्रदेश "वदस्त आवुर्दन दुश्वार" आहे–हाती (कब्जात) आणण्यास दुश्वार (कठीण) आहे.

"कल्याण व वेदर हे मैदानी किल्ले त्यांनी चढाई करून घेतले हे खरे आहे"–राजे पुढे लिहितात. "परंतु या किल्ल्यांना मोर्चे लावून ते सर करणे तसे सोपेही होते. (पण कल्याण व बीदरच्या मैदानी प्रदेशावरून तुम्ही माझ्या वतनाची कल्पना करीत असाल तर ती साफ चूक ठरेल)" – असे सुचवून राजे आपल्या वतनी प्रदेशाचे वर्णन करतात ––

"माझा प्रदेश म्हणजे उंच धिप्पाड पहाड; दोनशे मैल लांब व चाळीस मैल रुंद, ठायी ठायी नाले असलेला. त्यातच अत्यंत दुर्गम व अभेद्य असे साठ किल्ले आणि जंजिरे बांधलेले."

उत्तर हिंदुस्थानच्या अफाट मैदानी हिशेवाने, राजांनी वर्णन केलेला प्रदेश म्हणजे फारच लहान प्रांत. एका दौडीतच काबीज होणारा. परंतु दख्खनच्या भूगोलात हा केवळ गैरसमज. धिप्पाड पर्वतांनी व खोल दऱ्याखोऱ्यांनी स्वभावतःच दुर्गम असलेल्या ह्या समुद्रकाठच्या प्रदेशात साठ अभेद्य किल्ले जंजिऱ्यांची भर घालून आपले वतन आपण किती अधिक वज्रदेही वनविले आहे याची राजांनी मोगल युद्धविशारदांना स्पष्ट समज दिली आहे.

वतनाचे शब्दचित्र येथे संपते. दृक प्रत्ययाचे हे वर्णन संपते ते पुढील भावसंवेदनात्मक प्रत्ययाची सूचना देऊन.

अशा अवघड व कडेकोट प्रदेशात पाऊल ठेवण्याचे धाडस करणाऱ्या अविचारी दिग्गजांचे शेवटी काय झाले याचे भावसंवेदनात्मक कथन सुरू होते. राजे सांगतात "अदिलशाही सरदार अफझलखान येथे प्रचंड फौज घेऊन आला व सर्वस्वी नाश पावला. खानाच्या मृत्यूनंतर अमीर–उल–उमरा–शायस्ताखान मोहीम घेऊन आला. आकाशाला भिडलेले उत्तुंग प्रचंड पहाड व थांग न लागणाऱ्या दऱ्या व खोरी यात सतत तीन वर्षे अफाट प्रयत्न करूनही, अखेर हा प्रांत काबीज करण्यात तो अयशस्वी झाला. तरीही तो बादशहाला लिहून कळवित होता "याचे (माझे) वतन तावडतोब जप्त करून मी वादशहा सलामतच्या खिदमतीत हाजर होत आहे." शेवटी असत्य कथनाचे फळ त्याला मिळाले. प्रचंड पराभव, वाताहत व नामुष्की होऊन तो परत गेला, ही गोष्ट (लपलेली नाही) सूर्यप्रकाशाहून स्वच्छ आहे."

आपल्या वतनातील पहाडांबद्दल शिवाजी राजांना नितान्त प्रेम आहे. धीट धिप्पाड पहाड म्हणजेच आपले वतन अशी त्यांची धारणा आहे. "कोह हाय बुलंद, कोह हाय सपेहर करीन" उत्तुंग पहाड, आकाशाला भिडलेले पर्वत असे त्यांचे गौरवयुक्त वर्णन ते करतात. हे पहाड म्हणजे वतनाचे निसर्गदत्त वरदान आहे हे ते जाणतात. आकाशाच्या अर्हनिश संगतीत रहाणाऱ्या या नगाधिराजांवर त्यांची अढळ श्रद्धा आहे. वतनाचे रक्षण करणाऱ्या या चंड प्रचंड दिक्पालांबद्दल त्यांना कृतज्ञता वाटते. त्यांच्या मनातील हे प्रेम आदर व कृतज्ञता या छोट्या पत्रानही सूक्ष्मपणे व्यक्त झाली आहे.

"कोह हाय सपेहर करीन" याचा अर्थ आकाशाएवढे पहाड असा केला तर पहाडाची प्रतिमा अधिकच विशाल होते. महाराष्ट्रातील 'खोरी' येवढी खोल की त्यातून वस्ती करणारांना वर आकाशात सुद्धा पहाडांचीच गर्दी दिसावी. गिरीशिखरांच्या दाटीतून दिसलाच तर आकाशाचा लहानसा निळा तुकडा दिसायचा. पहाड आकाशाच्या मापाने मोजावे असा हा देश. अक्षरशः दगडांचा, पहाडांचा देश. येथे, डोंगर नाही असा भूभाग नाही. किमान टेकडी नाही असे निसर्गदृष्य नाही. मनोजनित भूमितीत विस्तारापेक्षा निसर्गाच्या उंचीची मातबरी अधिक. आणि उंची मोजायची ती आकाशाला आधार देणाऱ्या पहाडांच्या मापाने. निसर्गाने दिलेला उंचीचा उच्चांकच येवढा उत्तुंग की त्यासमोर उंचीचा तोरा मिरविणाऱ्या साऱ्या मिनारी (कुतुबमिनार, चांदमिनार आदि) खुज्या ठराव्यात.

राजांनी पत्रात केलेले आपल्या बुलंद पहाडांचे कौतुक येवढे उघड आहे की जयसिंग आणि दिलेरखान यांनी राजांना लिहिलेल्या पत्रात या कौतुकाचा काहीशा उपरोधाने उल्लेख केला आहे.

या पत्राच्या भाषांतरकारांनी मात्र या धीट धिप्पाड पहाडांच्या अक्षरशः टेकड्या बनविल्या आहेत. जदुनाथ सरकार त्यांचे " Sky Kissing Hills " असे वर्णन करतात, तर सरदेसाई त्यांना












"गगनचुंबित डोंगर" म्हणतात. जदुनाथ सरकारांच्या भाषांतरावर, सरदेसाई कसे सर्वस्वी अवलंबून होते याचे प्रत्यंतर येथे येते. जदुनाथ सरकारांनी "गगनचुंबी" म्हटले तर सरदेसायांनी त्यांना "गगनचुंबित" ठरविले, येवढाच फरक एकमेकांच्या संगतीत रहाणाऱ्या आकाश पहाडावर (मूळ पत्रातील) या दोघाही भाषांतरकारांनी केलेला चुंबाचुंबीचा हा आरोप, पत्रातील प्रसंग लक्षात घेता अनुचित व अशिष्ट वाटतो.

यानंतर पत्रातील काव्यपंक्ती येतात.

—(आक्रमकाचा) घोडा जगात सर्वत्र दौडू शकत नाही (काही) जागा अशाही असतात की (त्याठिकाणी आक्रमकाला) आपली ढाल (शरणागतीमुळे) खाली ठेवावी लागते.

पत्रात ह्या ठिकाणी देण्यात आलेल्या फारसी काव्यपंक्ती अत्यंत समर्पक आहेत. वतनाच्या भावसंवेदनात्मक वर्णनाची पूर्ती काव्यचरणांनी करण्यात शिवाजी राजांची रसिकता व औचित्य दिसून येते. गद्यात जे स्पष्ट सांगता येत नाही ते समर्पक पद्यात सुचवावयाचे या तत्कालीन व्यवहाराचा राजांनी मोठ्या चातुर्याने उपयोग केला आहे. माझ्या वतनात पाऊल टाकणाऱ्या आक्रमकाला आपले शस्त्रच नव्हे तर ढालही खाली ठेवावी लागते हे त्यांनी सुचविले आहे. फारसी जाणकारांच्या मते ह्या ओळी प्राचीन फारसी काव्यातल्या आहेत, बहुधा शहनाम्यातल्या. या काव्यपंक्तींवरून, शिवाजी राजांनी घेतलेल्या फारसी 'तालिमी'चा अंदाज बांधता येतो.

या पत्रात अशा प्रकारच्या काव्यपंक्ती दोनदा देण्यात आल्या आहेत. वर वर्णन केलेल्या व पत्राच्या शेवटी दिलेल्या. या चारीही काव्यपंक्ती जदुनाथ सरकारांनी न वगळता इंग्रजीत भाषांतरित केल्या आहेत. सरदेसायांनी मात्र आपल्या तथाकथित मराठी इंग्रजी भाषांतरातून त्या नेमक्या वगळल्या आहेत. असे करण्यात त्यांचा काय हेतू होता हे कळण्यास मार्ग नाही. त्यांचे हे कृत्य इतिहासकाराच्या भूमिकेशी मात्र सर्वस्वी विसंगत वाटते. ह्या काव्यपंक्ती भाषांतरातून वगळण्याने मराठी भाषांतराचे काय नुकसान झाले याचा शोध वाचकांनीच घेतलेला बरा.

वतनाच्या संकल्पनेची दृक व भाव अशा दोन्हीही संवेदनांनी घडविलेली समर्थ प्रतिमा उभी केल्यानंतर पुढच्याच वाक्यात या पत्रातील सर्वात महत्त्वाचे उद्‌गार शिवाजी राजांनी काढले आहेत.

"ई कसरा मुहाफिझते वतन ख़ुद लाजिम"

मला, (माझ्या) वतनाचे संरक्षण स्वयं-आवश्यक (आहे)

या पत्रातील सर्वात महत्त्वाचे वाक्य. निःसंदिग्ध, नेमके, औचित्यपूर्ण, तर्कनिष्ठ आणि नाट्यपूर्ण. हे सारे गुण या पाच शब्दांच्या सुभाषितात आहे. ते सुभाषित तर आहेच, त्याहीपेक्षा या पत्रातील ते सर्वश्रेष्ठ भाष्य आहे.उच्चाराने आणि अर्थाने. भावनेने जेवढे उत्कट, तेवढेच विचाराने तर्कनिष्ठ. मोजक्या अक्षरांचे पण विशाल आशयाचे. पत्राच्या मजकुरातील कल्पनांची धारणा, प्रतिमांची योजना, वाक्प्रयोगांची सूचना आणि शब्दांची लक्षणा, हा सारा प्रपंच या श्रेष्ठ भाषिताच्या जन्माकरिता थाटण्यात आला आहे. किंबहुना या पत्राचा सारा अट्टाहास या पाच शब्दांसाठी आहे.

वतनासंबंधीची आपली ही भूमिका मांडताना शिवाजी राजांनी कमालीचा संयम व निश्चय दाखविला आहे. विचारात तसा उच्चारातही. सुसंस्कृत आदब व पराक्रमी आत्मविश्वास यांचा प्रसन्न गंध तर या फारसी पत्राच्या ज़ेर ज़बरमधून दरवळतो. भाषेचे सहज सौष्ठव, दाखल्यांचे सूचक औचित्य व विवेचनातील शालीन स्पष्टत्व पाहिले की राजांचे मराठमोळे, पहाडी व्यक्तिमत्त्व, प्रसंगी फारसी तहेज़िबीचा तलम मुलायम लिबासही किती सहजपणे अंगावर चढवी











याची प्रचीती येते. आपल्या वतनावरचे प्रेम त्यांच्या प्रत्येक उच्चारात जाणवते. वतनाचे शब्दचित्र रेखाटताना त्याचप्रमाणे वतनविषयक भावसंवेदना विशद करताना पत्रात वतनाचा आग्रह त्यांनी धरला परंतु आक्रस्ताळेपणा करून नव्हे. हट्ट जरूर आहे परंतु हेकेखोरपणा नाही. धिटाई आहे ती मर्यादा सांभाळून. स्पष्टपणा आहे तो अवाक्षर वगळून. "मला माझ्या वतनाचे संरक्षण स्वयं-आवश्यक आहे" हे या पत्रातील महान आशयाचे वाक्य उच्चारात कटाक्षाने 'सभ्य' आहे, आदवशीर आहे.

हे वाक्य जदुनाथ सरकारांच्या "It is my duty to guard my land" या वाक्याशी अथवा सरदेसायांच्या आपल्या भूमीचे संरक्षण करणे हे माझे कर्तव्य आहे." असल्या आक्रस्ताळी भाषांतराशी वाचकांनी ताडून पहावे. श्री. ब. मो. पुरंदऱ्यांनी हेच पत्र (सरदेसायांचे भाषांतर) आपल्या शिवचरित्रात दिले आहे–परंतु काही वैशिष्ट्यपूर्ण फरक करून. ( शिवाजीचे पत्र म्हणजे वेशीवरचा बे-वारशी नगारा–कोणीही यावे आणि हवा तसा बदडावा)" आपल्या भूमीचे संरक्षण करणे हा माझा फर्ज आहे" असे पुरंदरे लिहितात. सरदेसायांच्या संस्कृत 'कर्तव्या'ऐवजी, त्यांनी फारसी 'फर्ज' वापरला, हा फरक. सरदेसायांचे 'कर्तव्य' हे सरकारांच्या 'duty'चे शब्दशः भाषांतर; त्याचप्रमाणे पुरंदऱ्यांचा 'फर्ज' हे सरदेसायांच्या कर्तव्या'चे भाषांतर. केवळ शब्दाला प्रतिशब्द दिल्याने अर्थपूर्ण भाषांतर होते असा साऱ्यांचाच समज झालेला; परंतु जदुनाथ सरकारांनी आपल्या भाषांतरात वापरलेला du:y हा शब्दच चुकीचा होता हे ध्यानात न आल्यामुळे सरकारांची चूकच सरदेसाई पुरंदरे यांनी शब्दशः गिरविली.

सुदैवाने शिवाजी राजांना संस्कृत व फारसी या भाषा ज्ञात असल्याचे दाखले इतिहासात आहेत. ते भाषापंडित नव्हते हे खरे; परंतु कर्तव्य म्हणजे काय व फर्ज हा शब्द केव्हा वापरावा येवढे भाषाज्ञान त्यांस नक्कीच होते.

"ईकसरा मुहाफिजते वतन खुद लाजिम"च्या ऐवजी "ईकसरा-मुहाफिजते वतन फर्ज अस्त" असे त्यांना लिहिता आले असते. परंतु कर्तव्याचा असा आक्रोश करण्यापेक्षा स्वयं–आवश्यकतेची जाणीव अधिक मूलभूत वाटल्यामुळे 'ड्यूटी, कर्तव्य, व फर्ज' या शब्दांच्या आतषबाजीऐवजी, 'स्वयं–आवश्यकते'ची मंद ठाणवईच त्यांनी पत्करली.

याउलट, "स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी बजावणारच" या लोकमान्य टिळकांच्या वाक्यातील अवसान, सरकार-सरदेसायांच्या ह्या भाषांतरात शिरलेली दिसते. सरकारांनी आपले भाषांतर छापले व सरदेसायांच्या रियासती प्रथम प्रसिद्ध झाल्या त्या काळातील शिवप्रतिमेच्या तोंडी– या दोन्हीही भाषांतरातील अवसानी वाक्ये, कदाचित, शोभूनही दिसली असतील. आज मूळ पत्राचा अभ्यास करताना ती वाक्ये– शिवाजीची नाहीत, तर भाषांतरकाराची–खोटी व उसनी आहेत असे नजरेस येते. "नकल्याच खोट्या बातम्या बादशहाकडे लिहून पाठविण्यास तुम्हाला लाज कशी वाटत नाही" असले अर्वाच्य वाक्य भाषांतरात शिवरायांच्या तोंडी घालून भाषांतरकारांनी त्यांना अक्षम्य अन्याय केलेला आहे.

किंबहुना या साऱ्याच भाषांतरांतून शिवरायांची प्रतिमा उभी रहाते ती हट्टी, आक्रस्ताळी, असभ्य, अवाक्षरांचा उच्चार करणारी, उन्मत्त ! ! !

मोगली सामर्थ्याचे प्रचंड दडपण मनावर असतानाच शिवरायांनी हे पत्र लिहिले खरे, परंतु त्याबद्दल मनात फाजील भीती बाळगून मात्र नव्हे. त्यामुळेच, शेवटी, पत्राचा हा 'सनदशीर' मार्ग दुर्लक्षिला गेल्यास परिणाम काय होईल याचा इशारा देण्यास ते विसरले तर नाहीच पण घाबरलेही नाहीत. पत्रातील मुख्य मजकुराप्रमाणेच इशाऱ्याचे हे आखरी कलमही तेवढेच स्पष्ट व समर्पक आहे.

राजे लिहितात, "स्वतःची प्रतिष्ठा वाचविण्याकरिता जरी त्यांनी (माझ्या वतनावर चालून येणाऱ्या आक्रमकांनी) बादशहाकडे वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे वृत्तान्त पाठविले, तरी सर्वशक्तिमान प्रभूच्या कृपेने या माझ्या प्रिय वतनात (वतन ए मालूफ) माझ्यासारख्या एकीकडे रहाणाऱ्या व्यक्तीविरुद्ध (ई गोषानशीन), शत्रुत्व घेऊन येणाऱ्या (कोणाही) आक्रमकाच्या मनातील (दुष्ट) हेतूची कळी अजून तरी कधी पुरती उमलली नाही" (या वाक्यातील "ई गोषा नशीन" हे राजांनी स्वतःचे केलेले वर्णन तर कमालीचे हृद्य वाटते.)

कोणताही इशारा म्हटला की त्यात जरब ही हवीच. आवश्यक असलेली जरब, पुन्हा दोन सूचक काव्यपंक्ती देऊन, राजांनी तेवढ्याच निर्भीड व नाट्यपूर्ण रीतीने पत्र समाप्त केले आहे.

"सूज्ञांनी या रक्ताच्या समुद्राचे भय बाळगणेच इष्ट,

कारण (ह्या समुद्रातून) कोणालाही आपली नाव
सुखरूप नेता आली नाही ॥

––मुळात 'रक्ताचा समुद्र' असताना, जदुनाथ सरकारांनी आपल्या भाषांतरात 'रक्ताची नदी' असे म्हटले आहे.

'पोताचा' विचार करीत असताना, शिवरायांच्या ह्या उपेक्षित पत्राकडे लक्ष गेले. हे पत्र शक्य तेवढ्या मूळ स्वरूपात वाचकांसमोर ठेवण्याचा हा बरावाईट प्रयत्न आहे.

पुढील विचार 'प्रेरणेचा' या पत्राच्या अभ्यासाने दाखविलेल्या दिशेनेच तो करावयाचा – परंतु पुढील लेखात.

• • •

**[या लेखमालेतील दुसरा लेख 'दीपावली'च्या जानेवारी १९७१ च्या अंकात प्रसिद्ध होईल.]**

अनुक्रमणिका




# एका वास्तववादी नाटककाराची

**मी** : नमस्कार. आपली मुलाखत घ्यायला आलो आहे.

**ना** : का ? नाटकं लिहायचा धंदा वंद करून आता इथं वळला वाटतं ?

**मी** : हो.

**ना** : नाटकं लिहिणं वंद का केलंत ?

**मी** : लोक तक्रार करायला लागले.

**ना** : काय ?

**मी** : तुमची नाटकं पाहिली किंवा वाचली की सहज समजतात म्हणे. जरा वास्तववादी नाटकं लिहायचा प्रयत्न करा म्हणाले.

**ना** : मग करा.

**मी** : तोच कसा करायचा, हे कळावं म्हणून तुमची मुलाखत घ्यायला आलो.

**ना** : विचारा.

**मी** : तुम्ही आतापर्यंत किती नाटकं लिहिलीत ?

**ना** : सतरा.

**मी** : त्यापैकी किती चालली ?

**ना** : चालण्यासाठी नाटकं लिहायची असतात, हे अगोदर डोक्यातून काढून टाका.

**मी** : टाकलं—पण मग ती कशासाठी लिहायची ?

**ना** : राहावत नाही म्हणून. कुठल्या तरी असह्य विचारांनी अस्वस्थ झालं म्हणजे लिहिल्याशिवाय राहावत नाही.

**मी** : पण खाडिलकर, कोल्हटकर, गडकरी असेच अस्वस्थ होऊन नाटकं लिहायला वसत.

**ना** : हे गृहस्थ कोण ?

**मी** : मोठे नाटककार होऊन गेले.

**ना** : पूर्वीच्या काळी ?

**मी** : हो.

**ना** : मग ते खरे नाटककार नव्हेत. खरे तेजस्वी नाटककार अलिकडेच जन्म घेऊ लागले आहेत. पूर्वीचे नाटककार कित्ते गिरवीत होते—अक्षर वळणदार करण्यासाठी.

**मी** : कालिदास, भाससुद्धा ?

**ना** : शेक्स्पीयरसुद्धा.

**मी** : पण तो साहेब़ होता. साहेबाला तुम्ही नावं ठेवता ?

**ना** : मॉडर्न साहेबांना आम्ही मानतो. या जुनाट साहेबांना नव्हे ! तुम्ही कामू वाचला आहे ? सार्त्र वाचला आहे ?

**मी** : कोण हे ?

**ना** : कोण हे ? कामू, सार्त्र हे कोण





अनुक्रमणिका

म्हणून विचारता? उद्या बेकेट कोण, ब्रेट्झ् कोण असंही विचाराल!

**मी :** उद्या नाही–आजच विचारतो.

**ना :** म्हणजे हेही तुम्हाला माहीत नाहीत? अहो, इतकी वर्षं जगून केलंत काय?

**मी :** तुमच्यासारखीच सतरा नाटकं लिहिली.

**ना :** जाळून टाका ती.

**मी :** मग हे कामू, सार्त्र, बेकेट वगैरे कोण आहेत ते कळेल?

**ना :** निदान आपल्याशिवाय जगात आणखी नाटककार आहेत, हे तरी कळेल.

**मी :** तसे खूप नाटककार मला माहीत आहेत. खानोलकर, कालेलकर, कलगूट-कर. पण तुम्ही नावं घेतलीत ती कधी कानावरून गेली नाहीत.

**ना :** कशी जातील? आपण मराठी माणसं म्हणजे कूपमंडूकवृत्तीची. फक्त आपल्या आसपासच्या भागात काय चाललं आहे एवढं पाहतो. व्यापक दृष्टी आहे कुठं आपल्याला?

**मी :** हे सारे साहेब कुठल्या प्रकारची नाटकं लिहितात?

**ना :** मॉडर्न–अल्ट्रा मॉडर्न. संपूर्ण वास्त-वतादर्शक. जे तुमच्या सारख्यांना कधी सुचायचंही नाही–सुचलं तरी लिहायची हिंमत व्हायची नाही, अशा विषयावर त्यांची नाटकं असतात.

**मी :** म्हणजे काल्पनिक?

**ना :** काल्पनिक नाही-- सोळा आणे वास्त-विक.

**मी :** वास्तविक? वाः, चांगला शब्द आहे. वास्तविक म्हणजे वास्तवदर्शी?

**ना :** हो. अगदी नग्न वास्तवदर्शी. कसला आडपडदा नाही. अगदीच संपूर्ण सत्य. हंड्रेड पर्सेंट सत्य.

**मी :** पण सत्य असलं म्हणून ते जस्संच्या तस्सं रंगभूमीवर आणता येत नाही.

**ना :** ते तुम्हाला! पण आजचे नाटक-कार–

**मी :** म्हणजे विलायतेतले?

**ना :** हो हो–तिथले नाटककार वाटेल त्या विषयाची वास्तवपूर्ण चिरफाड करून स्टेजवर दाखवतात.

**.... सुप्रसिद्ध नाटककार आणि नाट्य-दिग्दर्शक श्री. मो. ग. रांगणेकर यांनी एकेकाळी 'चित्रा', 'तुतारी', 'वसुंधरा' यांसारखी साप्ताहिके काढून खुसखुशीत विनोद आणि उपहास यांचा एक मानदंडच निर्माण केला, तो अजूनही कोणी ओलांडू शकलेले नाही ... ही मुलाखत त्यापूर्वीच्या लेखनाची पुन्हा एकदा आठवण करून देईल...**

**मी :** घाबरत नाहीत?

**ना :** (तुच्छतेने नुसता हुंकार) हुंः!

**मी :** कमाल आहे.

**ना :** अहो, नुकतंच एक नाटक स्टेजवर आलं.

**मी :** विलायतेतल्या?

**ना :** हो. ते नाटक फक्त दीड मिनिटाचं होतं.

**मी :** किती? दीड मिनिटाचं (हसतो)

**ना :** हसता काय? या दीड मिनिटात तुमच्या चार तासांच्या नाटकात होणार नाही तो परिणाम करून गेला नाटककार.

**मी :** कुठं?– नाही म्हणजे दीड मिनिटात नाटक कसं होणार आणि त्याचा परिणाम काय होणार?

**ना :** ते तुमच्यासारख्यांना नाही कळणार. आम्हाला विचारा.

**मी :** सांगा. काय होतं ते नाटक?

**ना :** पडदा उघडतो तेव्हा स्टेजवर गडद अंधार!

**मी :** पण उशीरा येणाऱ्या प्रेक्षकांना डोअरकिपर्स आपल्या इकडे बॅटरीनं सीटस् दाखवतात तेव्हा स्टेजवर 'लाइट' जातो–

**ना :** तिथं नाटकाच्या वेळेपूर्वी सगळे प्रक्षक येतात. नंतर आलेल्यांना आत घेत नाहीत.

**मी :** म्हणजे पु. ल. देशपांडेंची 'स्टाईल' त्यांनीही उचलली! वस्ताद आहेत हे साहेब लोक! -- पुढे काय होतं?

**ना :** त्या स्टेजवर कचऱ्याचा भला मोठा ढीग असतो.

**मी :** म्हणजे म्युनिसीपाल्टीच्या गाड्या ठिकठिकाणी रस्त्याच्या कोपऱ्यावर जमवून ठेवतात तसा?

**ना :** हो – तसा. त्या कचऱ्याच्या ढीगावर थोडा वेळ प्रकाशात असतो.

**मी :** वेट अ मोमेंट. थोडा वेळ म्हणजे किती? कारण सबंध नाटक दीड मिनिटाचं– म्हणून विचारतो.

**ना :** थोडा वेळ म्हणजे पंधरावीस सेकंद.

**मी :** मग काय होतं?

**ना :** मग नुकतंच जन्मलेलं एक पोर त्या कचऱ्यात फेकण्यात येते.

**मी :** खरं?

**ना :** हे नाटक आहे. तिथं खरं पोर दर प्रयोगात कसं फेकायला मिळणार?

**मी :** पण हे 'वास्तविक' नाटक आहे ना?

**ना :** म्हणून काय झालं? – पुढे ऐका. ते पोर एकदम रडायला लागतं.

**मी :** हे पण खोटं?– रेकॉर्ड केलेलं?

**ना :** पण काय ते रडणं! प्रेक्षकांचं काळीज फाटून जातं. आणि हे रडणं पांचदहा सेकंद झालं की एक भला मोठा सुस्कारा!

**मी :** प्रेक्षकांचा?

**ना :** नाही— स्टेजवर.

**मी :** म्हणजे रडण्याप्रमाणं सुस्कारा पण रेकॉर्ड करून ठेवलेला!

**ना :** असेल. पण 'इफेक्ट' केवढा?

**मी :** पुढं?

**ना :** पुढं काय? हळुहळू दोन्ही बाजूंनी पडदा येतो.

**मी :** म्हणजे खेळ खलास?

**ना :** अर्थात्.

**मी :** अहो, पण एवढंच पाहायला लोक येतात?

**ना :** मग आणखी काय पाहाणार? जे पाहिलं त्यानंच ते प्रभावीत होतात. तो काळाकभिन्न कचरा, ते पोराचं रडणं आणि नंतर तो भला मोठा सुस्कारा–केवढा गहन आशय आहे यात! जीवनाचं केवडं करुण दर्शन आहे हे!

**मी :** पण एवढं पाहून प्रेक्षक मुकाट्यानं जातात?–– आपल्याकडे तर लोक











अनुक्रमणिका




# मोठ्या लोकांचे छोटे धंदे!!




स्वतःच्या कपड्यांवरचा चिखल धुण्याचे काम अजून न संपल्यामुळे ग्राहकांचे कपडे धुण्यास वेळ नाही!

## तांबडा वाघ.




# एक्स्पो-(झ्‌ड) ७०

## पांढरा हत्ती.






# मध्ये न उघडलेली नवी दालने




गोहत्याबंदी झालीच पायजे.
कूऽऽऽऽ
नंदगवळी.
बड्यांचे 'लघु' उद्योग-धंदे!!!
सकामोक.
'बड्या आघाडी'ची सहकारी हातभट्टी.
सत्ताविरहाचे दुःख विसरायला लावणारे एकमेव देशी मद्य!
सत्तामद्य


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



स्टेजवर चढले असते आणि त्यांनी तिकिटाचे पैसे परत मागितले असते !

**ना** : आपल्याइकडचे नाटककार तसेच आपल्याकडचे प्रेक्षक ! जगाच्या मागं हजार वर्ष.

**मी** : या नाटकाचं पुस्तक नाही निघालं ?

**ना** : त्याचीच वाट पाहतो आहे. पुढच्या बोटीनं येईल म्हणतात.

**मी** : मग आपल्याला इथं मराठीत पाहायला मिळेल ! ते रडणं इंग्लिश पोराचं असणार ! आणि तो सुस्काराही जरा चांगला घेतला पाहिजे. नाहीतर आपल्या इकडे म्हणजे नाक शिंकरल्यासारखा आवाज काढतील ! तेवढं जरा मराठीत बघा.

**ना** : आता सांगा, अशी जबरदस्त नाटकं तिथं निघताहेत आणि आपल्या इकडं "बाळा जो जो रे" आणि "मी कुणाचा आणि तू कुणाची ?" असली गचाळ नाटकं निघताहेत ! आणि म्हणे मराठी रंगभूमी प्रगतीपथावर आहे !

**मी** : तुम्हांला नाही वाटत ?

**ना** : नॉन्सेन्स ! कसली प्रगती चालली आहे ?

**मी** : वा : असं कसं ? पूर्वी नुसती 'फिक्स्ड' स्टेजवर नाटकं होत. आता ते स्टेज फिरतं, सरकतं, घसरतं, पसरतं—आणि तरी एक सुद्धा नट घसरत नाही ! आणि पूर्वी फक्त शनिवार रविवार आणि बुधवारी नाटकं व्हायची. आता बघा, दररोज नाटक. दुपारी, रात्री, सकाळी. लवकरच मध्यरात्री एक वाजता पण सुरू करणार आहे एक कंपनी आपली नाटकं ! आणि तुम्ही म्हणता—प्रगती नाही !

**ना** : ही प्रगती काय कामाची ? प्रगती पाहिजे नाटकात—नाटचविषयात. त्याबाबतीत कुठला नाटककार आज धडाडी दाखवतोय ?

**मी** : आता तुमच्याकडेच सर्वांचं लक्ष आहे. काही केलंत तर तुम्हीच कराल, असं म्हणताहेत सारे जण !

**ना** : दाखवतो ना आता माझी धडाडी ! कुणी अजून हिंमत केली नसेल असे प्रसंग आणतो स्टेजवर.

**मी** : उदाहरणार्थ ?

**ना** : उदाहरणार्थ—शौचकूप !

**मी** : (नाकावर रुमाल धरून) काय—शौचकूप ? आणि स्टेजवर ? आयला.

**ना** : का नाही ? आतापर्यंत प्रत्येक नाटकात आयला पडदा उघडला की दिवाणखान्याचा सीन ! एक सोफा सेट, सेंटर टी पॉय, एक रायटिंग टेबल आणि खुर्ची, एखादं कपाट, बुकशेल्फ आणि रामागडी झटकतो आहे फर्निचर ! जीवनात काय माणसं फक्त हॉलमध्येच दिवसाचे चोवीस तास बसतात ? स्वयंपाकघर नाही ? बेडरूम नाही ?



तनखे बंद झालेत. आता भत्तावाढ मागायला आपण मोकळे झालो !

**मी** : मग त्यापैकी काहीतरी तुम्ही नाटकात वापरा. पण एकदम शौचकूप म्हणजे—

**ना** : का — शौचकूपात तुम्ही कधी जात नाही ? रावापासून रंकापर्यंत शौचकूप कुणाला सुटला आहे ?

**मी** : नाही—पण स्टेजवर शौचकूप म्हणजे—

**ना** : हेच ते. तुम्ही पारंपरिक लोक. जे बाबा आदमच्या काळापासून चालत आले आहे, तेच तुम्हाला पहायला पाहिजे. म्हणूनच मी तुम्हाला हा धक्का देणार आहे. जीवनाचं वास्तव दर्शन घडवणारी नाटकंच यापुढं मी लिहिणार आहे.

**मी** : पण ती चालतील ?

**ना** : आयला ! पुन्हा तुमचं तेच क्रियापद—चालतील ? अरे पण इकडे कोण लेकाचा चालण्यासाठी नाटकं लिहितो आहे ?

**मी** : पण थोडे लोक तरी असलं नाटक पाहायला येतील ?

**ना** : येतील—येतील. असाही एक वर्ग प्रेक्षकांचा असतो, की ज्यात सगळे लोक नाकं मुरडतात तेच पाहायला जाणं त्यांना आवडतं !

**मी** : अहो, पण नाटचसमीक्षक फाडून खातील तुम्हाला ! माहित नाही तुम्हाला.

**ना** : भ्रम आहे तुमचा. उलट, हे असलं नाटक ते उचलून धरतील ! त्यात जीवनाचं सखोल दर्शन घडतं म्हणतील ! जीवनाचा गहनरम्य आशय प्रतीत झाला आहे, असं लिहितील ! सर्वसाधारण लोकांना वाटतं त्यापेक्षा या समीक्षकांना नेहमी निराळं वाटतं, हे मी पाहून ठेवलंय.

**मी** : पाहा बुवा. अजूनपर्यंत जगातल्या कुठल्याच रंगभूमीवर कुणी शौचकूप दाखवलेला नाही, तेव्हा——

**ना** : नामर्द आहेत लेकाचे ! डरपोक ! वास्तवदर्शी नाटकं लिहायची तर स्टेजवर शौचकूप का नको ?—आता तुम्हाला अनुभव आला आहे की नाही—मला माहीत नाही—पण मी सांगतो, शौचकूप हे साहित्यिकांचं स्फूर्तिमंदिर आहे.

**मी :** (घामाघूम होऊन) अहो अहो, म्हणता काय ?

**ना :** (आपल्याच तंद्रीत) तेथे बसल्यावर जगातल्या अनेक लेखकांना अनेक भव्य कल्पना सुचल्या असतील. मला तर माझी सगळी नाटकं शौचकूपातच सुचली आहेत.

**मी :** तुमच्या नाटकांच्या बाबतीत ते कुणीही मान्य करील हो. पण टागोर, कालिदास, शेक्स्पीयर, बर्नार्ड शॉ, मामा वरेरकर सगळयांना काय शौचकूपात लेखनाची स्फूर्ति मिळाली ?

**ना :** मी असं ठासून सांगतो. कुणी उघडपणे ते कबूल करणार नाही—लाज वाटते त्यांना—मला नाही वाटत. प्रेक्षकांना जीवनाचं वास्तव दर्शन घडवायचं असेल तर तिथं तडजोड कामाची नाही. शौचकूप म्हणजे शौचकूप ! असा धक्का देतो पाहा प्रेक्षकांना ! तुमचा तो भाऊचा धक्का काहीच नाही !

**मी :** भाऊचा म्हणजे भाऊ पाध्येचा ? द्या— द्या—. नाही तरी त्याला अलिकडे वाटू लागलंय, आपणच एकटे जगाला धक्के देऊ शकतो ! तरी पण शौचकूप् म्हणजे—

**ना :** तुम्हाला शौचकूपाचं जीवनातील स्थान अजून कळलेलं नाही, म्हणून असे बावरून गेला आहात ! अहो, त्या दिवशी एका परिसंवादात एकासाठी जवळ आलेल्या नटीनं आपल्या भाषणात ठणकावून सांगितलं, "माझ्या तारुण्याचं रहस्य म्हणजे **मी** सकाळी उठल्याबरोबर प्रथम शौचकूपात जाते !"

**मी :** मेक—अप् करायला ?

**ना :** नाही—पोट साफ करायला. ज्याचं पोट साफ आहे तोच आपलं तारुण्य आणि चैतन्य टिकवतो. जगातले शौचकूप नाहीसे झाले, तर निम्मी लोकसंख्या खलास होईल.

**मी :** नाहीतरी जगाची लोकसंख्या दिवसेंदिवस फार वाढत चालली आहे. नवीन घर बांधणाऱ्यांनी आता शौचकूपाची उचलबांगडीच केली पाहिजे ! तुमच्या नाटकात याचाही खल तुम्ही केलाच असेल !

**ना :** मी काय काय केलं आहे, ते नाटक स्टेजवर आल्यावर पहा.

**मी :** अलिकडच्या नेपथ्यकारांनाही आव्हानच आहे हे शौचकूप स्टेजवर दाखवायचा म्हणजे ! तरी बरं, कुठं तरी मी वाचलं होतं, एका 'फॉरिन' नाटकात बागेच्या सीनमध्ये फुलांचा वासही लोकांना येत होता.—तसं काही तुमच्या या शौचकूपाच्या सीनमध्ये—

**ना :** (उत्साहाने) आयडिया ! स्टेजवर ही क्रांति केली पाहिजे. सुवासिक रंगभूमी ! हंड्रेड पर्सेंट वास्तवता !

**मी :** (घाबराघुबरा होऊन) अहो, म्हणजे तुमच्या या नाटकात तसं काही करणार की काय तुम्ही ? लोक म्हणतील, हे नेपथ्य की कुपथ्य ? शी: शी:

**ना :** शी: शी: काय ? वास्तवता काय सांगते ? शौचकूपात काय तुम्हांला फुलांचा वास येणार ? जो तिथला वास तोच प्रेक्षकांना आला तरच ते हंड्रेड पर्सेंट वास्तववादी दृश्य होईल !

**मी :** बापरे !

**ना :** असेच तुमच्यासारखे सगळया प्रेक्षकांनी उद्गार काढले पाहिजेत—बापरे ! लोकांना ही आता सवय केली पाहिजे. ती कचकड्यासारखी नाटकं आता बस्स

झाली! मी तर सगळ्या रूढ कल्पनांना जोराचे धक्के देत राहाणार. हे पाहिलंत—

**मी** : काय ते?

**ना** : माझ्या एका नाटकातला 'सीन' तुम्हास वाचून दाखवतो. एक नुकताच लग्न झालेला तरुण. वेळ रात्रीची. तो आपल्या झोपायच्या खोलीत जोरजोरानं फेऱ्या घालतो आहे—

**मी** : झोपण्याच्या खोलीत तो झोपत का नाही?

**ना** : कारण तो बायकोची वाट पाहातो आहे. ती जुन्या परंपरेत वाढलेली. सासु-सासरे झोपायला गेल्याशिवाय नवऱ्याच्या खोलीत जायला लाजणारी.

**मी** : मग तो भडकला असेल!

**ना** : हो—सारख्या सिगरेटी ओढीत असतो आता ऐका (वाचू लागतो)

**नवरा** : आलीस? नशीब माझं. काय करीत होतीस इतका वेळ?

**बायको** : अहो, मामंजी आणि सासुबाई झोपायला गेल्याशिवाय मी कशी येऊ?

**नवरा** : का? रोज तू माझ्याजवळ रात्र-भर झोपतेस हे माहीत नाही त्यांना?

**बायको** : तरी पण त्यांचा मान ठेवायला हवा ना?

**नवरा** : तुझ्या पुढ्यात त्या दोघांना त्यांच्या खोलीत जाताना काही लाज, शरम वाटते का? मग तुलाच—

**बायको** : अहो, काय बोलता हे?

**नवरा** : काय खोटं बोलतो? ती दोघं एका खोलीत जाऊन झोपत नाहीत?

**बायको** : अहो, त्यांचं वय काय—आपलं काय!

**नवरा** : काही सांगू नकोस मला. वय झालं म्हणून सवय जाणार होय?

**बायको** : शी: शी:— आपल्या आईबापा-बद्दल असं बोलवत तरी कसं तुम्हाला?

**नवरा** : हे बघ आम्ही काही पुंडलिकांचे वंशज नाही. जे वाटतं ते खुल्लम खुल्ला बोलतो. आमचे आईवडील झाले, म्हणून काही ते जगावेगळे नाहीत. तहान—भूकेप्रमाणे विषयवासनाही मरेपर्यंत माणसात असतेच असते.

**बायको** : आता या वयात त्यांना तसं काही वाटणं शक्य तरी आहे का?

**नवरा** : तू त्यांच्या खोलीत कधी डोका-वून पाहिलं आहेस रात्री?

**बायको** : शी: भलतंच काय विचारता हे?

**नवरा** : भलतंच नाही—अगदी "मॅटर ऑफ फॅक्ट" बोलतो आहे मी. आपण उगाच सौजन्याचं ढोंग करीत नाही.—बरं, झोप आता. ये अशी.

**बायको** : दिवा तरी घालवते.

**नवरा** : कशाला? उजेडात आपण काय करतो, ते आपल्याला दिसू नये म्हणून?

**बायको** : तुमच्या जिभेला हाड नाही का हो?

**नवरा** : पण-खरं बोलायची देखील चोरी! आता इथं तुझ्यामाझ्याशिवाय कुणी आहे का? मग दिवा कशाला काढायचा? मी तर म्हणतो हा दरवाजादेखील उघडा ठेव. जगात प्रत्येक माणूस जी गोष्ट करतो तीच आपण करणार. त्यात चोरी कसली?

**बायको** : म्हणून काय त्याचं प्रदर्शन करायला हवं? काही रीती पाळल्या पाहिजेत ना?

**नवरा** : कुत्रे नाही भर रस्त्यावर वाटेल ते करीत?

**बायको** : ते कुत्रे आहेत, आपण माणसं आहोत.

**नवरा** : म्हणजे कुत्र्यांना माणसांपेक्षा कमी समजतं, असं तुला वाटतं की काय? पण त्यांच्यामध्ये हा ढोंगीपणा नाही. आपण माणसंच महाढोंगी. सगळं काही चोरून लपून छपून करायला हवं आपल्याला!

**बायको** : हे पहा, तुमचं डोकं ठिकाणावर नाही. झोपा पाहू स्वस्थ. दिवा घालवते मी.

**नवरा** : अशानं तू माझा कोंडमारा करते आहेस. माझ्या स्वाभाविक भावनांची हत्या करते आहेस. माझ्यातलं मीपण नष्ट करते आहेस. सबंध दिवस घराबाहेर वणवण फिरून रात्री आम्ही घरी येतो, ते नुसते झोपायला नाही. माणूस बाहेरख्याली होतो, तो घरात असा अतृप्त राहिल्यामुळे—त्याच्या वासनांचा चेंदामेंदा झाल्यामुळं. पण हे तुम्हा बायकांना समजत नाही, आणि आम्ही बाहेर माडचा चढू लागलो की आमची निष्कारण बदफैली म्हणून नाचक्की होते.

**बायको** : पण तुम्हाला कुणी काय नाही म्हटलं?

**नवरा :** मग दिवा घालवायचा नाही. दार वंद करायचं नाही. कबूल ?

**बायको :** तुम्हाला हवं ते करा.

**नवरा :** (रंगात येऊन) अरे, वा रे मेरी प्यारी !

**ना :** वोला–आहे कुणाची हिंमत असं लिहायची ?

**मी :** नाही–शपथ नाही.

**ना :** असे एकएक धक्के देणार आहे मी प्रेक्षकांना. त्याशिवाय रंगभूमीची प्रगती होणार नाही.

**मी :** अशा नाटकांनी नक्की होईल म्हणता ?

**ना :** झालीच पाहिजे. नाहीतर यापेक्षाही कडक नाटकं लिहावी लागतील.

**मी :** आता याच्यापेक्षा कडक म्हणजे–

**ना :** तुम्हाला इंग्लंड–अमेरिकेत काय चाललं आहे माहीत नाही.

**मी :** नाही–नाही.

**ना :** तिथं स्टेजवर स्त्रीपुरुषांच्या संभोगाचेही 'सीन्स' दाखवतात !

**मी :** (गुदमरून) म्हणजे ॲक्चुअली पुरुष आणि स्त्री यांचा–यांचा––

**ना :** हो हो–त्यांचा शारीरिक, वैषयिक संबंध !

**मी :** आणि–आणि प्रेक्षक तो पाहातात ?

**ना :** मग काय उठून स्टेजवर जाणार ?

**मी :** आपल्या इकडे जातील ! आपली पैज !

**ना :** अडाणी-गांवढळ आहेत प्रेक्षक आपले.

**मी :** पण जगात जे चालू आहे, ते इतकं उघड उघड दाखवायलाच कशाला हवं स्टेजवर ?

**ना :** नाटकात वास्तवता आणण्यासाठी. नाटकात केव्हा केव्हा प्रत्यक्ष घडलेले खरे प्रसंग नाही घालीत ?

**मी :** अहो, पण ते प्रसंग असतात–हा अतिप्रसंग आहे ! तुम्ही आता वाचून दाखवलंत त्यातली ती बायको म्हणते त्याप्रमाणे आयुष्यात जे घडत त्याचं स्टेजवर प्रदर्शन कशाला करायला हवं ?

**ना :** त्याशिवाय नाटकात जिवंतपणा येत नाही–रसरशीतपणा येत नाही. हल्लीची ती काय नाटकं आहेत ? साली बुळबुळीत गिळगिळीत, ओल्या बोंबलासारखी ! कणाच नाही त्यांना. सगळं तद्दन खोटं, ढिसाळ ! माझं हे नाटक स्टेजवर येऊदे–बघा काय दाणादाण उडते ती !

**मी :** पण सेन्सॉरने पास केलं पाहिजे ना !

**ना :** सेन्सॉरची X X X X X X !!

**मी :** पण त्याशिवाय नाटक स्टेजवर आणता येत नाही.

**ना :** आम्ही आणू. करा म्हणावं आमच्यावर खटला ! साली आपली मोफत पब्लिसिटी ! आणि त्यातून सुटलो तर आयला नाटक पण जोरात चालेल !

**मी :** अशी नाटकं पाहिल्यामुळं आजच्या तरुण पिढीपुढे वाईट आदर्श ठेवल्यासारखं होईल, असं नाही वाटत तुम्हाला ?

**ना :** यात काय वाईट आहे ?

**मी :** अहो, तुमच्या त्या मघाच्या 'सीन'मध्ये तो नवरा आपल्या आईबापाबद्दल जे बोलतो–

**ना :** त्यात काय खोटं आहे ?

**मी :** खोटं नसलं तरी ते बोलावं का मुलानं?

**ना :** बेलाशक, आमची ही नाटकं पाहून असं आपल्या बापाबद्दल बोलण्याइतकी मुलं धीट होतील. खोटया नीतिमत्तेसाठी त्यांची तोंडं दाबून ठेवण्यात काय अर्थ ? त्यांच्या बुद्धीचा, विचाराचा विकास का थोपवावा ? यापुढे सर्वांना संपूर्ण स्वातंत्र्य –आचाराचं आणि विचाराचं संपूर्ण स्वातंत्र्य मिळालं पाहिजे. तरच आपल्या देशाचा उद्धार होईल. नाहीतर राजकीयदृष्टया देश जसा खड्यात चालला आहे, तसा सामाजिक आणि सांस्कृतिकदृष्टयाही जाईल. त्यापासून तुम्ही–आम्ही त्याला वाचवला पाहिजे.

**मी :** आम्ही पण ?

**ना :** हो–तुम्ही पण.

**मी :** माफ करा. देशाला वाचवण्याच्या तुमच्या–आमच्या कल्पनेत जमीन अस्मानाचा फरक आहे.

**ना :** देश राहू दे–पण रंगभूमीला वाचवण्यासाठी तरी तुम्ही काही हिंमत दाखवाल की नाही ?

**मी :** तुमच्यासारखी ?–छे. आता रंगभूमीला तुमच्यापासून कसं वाचवता येईल, ते प्रथम पाहिलं पाहिजे ! अहो, नुकतीच पंचवीस-तीस वर्षांपूर्वी मराठी रंगभूमीची शंभर वर्षं भरली होती–त्यातून तिला कशीबशी एकदा वाचवली ! आता पुन्हा तिची शंभर वर्षं भरणार आहेत की काय, अशी आम्हाला धास्ती वाटते आहे ! तेव्हा तुम्हाला काही दुसरा धंदा सुचतो का पहा–बिचाऱ्या मराठी रंगभूमीला आणखी थोडी वर्षं सुखासमाधानानं जगू दे !–आणि मिस्टर, एक करा. तुम्ही मघा म्हटलंत ते आम्हास पटलं. आधी पोट साफ ठेवलं पाहिजे ! तेव्हा तेवढं एक करा. म्हणजे असली भलती सलती नाटकं सुचणार नाहीत तुम्हाला ! अच्छा–बाय बाय.

(जीव घेऊन पळतो).

• • •



**ह. मो. मराठे**

चौघेही एकदमच लॉजवर आले. केवळ योगायोग. चौघे काही एका गावचे नव्हते. एका गावाहूनही आलेले नव्हते. मुंबईत एक परीक्षा होती. परीक्षा वरच्या ॲडमिनिस्ट्रेटिव्ह पोस्टसाठी. पगार बरा होता. इन्क्रीमेंट्स दणकेबाज होती. म्हणून चौघेही जण आले होते. परीक्षास्थळाला जवळ म्हणून चौघांनीही अर्थात अलगअलगपणे—ते लॉज पसंत केलं. प्रत्येकजण अगदी अलगपणे लॉजवर उतरला. शेजारच्या खोल्या मिळाल्या. एकानं दुसऱ्याची चवकशी केली. दुसऱ्यानं आणखी तिसऱ्या चवथ्याची. अशी झट्दिशी ओळख झाली. सर्वांचं उद्दिष्ट एकच. ध्येय एकच. परिस्थिती त्या दिवसापुरती तरी एकच. सर्वांच्या डोक्यात एकच विचार. परीक्षा. वरच्या पोस्टसाठी सिलेक्शन. बडा पगार. बऱ्यापैकी आयुष्य जगण्याचं स्वप्न. त्या दिवसापुरती सर्वांची अंतःकरणं समान विचारानं धडधडली. त्या दिवसापुरते ते चौघेही परस्परांचे जिगरदोस्त बनून गेले.

परीक्षेला जाताना चौघेही एकदमच गेले. चौघांचे नंबरही जवळजवळच लागले होते. कारण परीक्षार्थींची संख्या तशी फार मोठी नव्हती. रिटन टेस्ट सुरू होण्यापूर्वी चौघांनीही एकमेकांना बेस्ट विशेस दिल्या. चौघेही परीक्षेतून एकदमच मोकळे झाले.

चौघांपैकी एकालाही पर्सनल इंटरव्ह्यूसाठी थांबायला सांगण्यात आलं नाही.

चौघेही निराश झाले. चौघांचीही मनं फाटून गेली.

चौघेही सारखेच उध्वस्त होत लॉजवर परतले. सकाळी गावी परतायचं. मुंबईत रहावं असं आता त्यांना वाटत नव्हतं. चार्म उरला नव्हता. सिलेक्शन झालं असतं किंवा निदान अंधुक आशा दिसली असती तरी ते राहिले असते. पण ती आशा एकालाही नव्हती. सकाळी सर्वांच्या गाड्या. थोड्याफार अंतराने सुटणाऱ्या. चार दिशांना चौघे आपापल्या सुखदुःखांचे हविर्भाग भोगण्यासाठी जाणार होते.

खोलीत आल्यावर सर्वांनी आपली गळून गेलेली शरीरे वेगवेगळ्या ठिकाणी फेकून दिली. एकजण खुर्चीवर बसला. एकजण खिडकीच्या चौकटीत लोंबकळला. दोघेजण विस्कटलेल्या अस्ताव्यस्त बिछान्यांवर विसावले.

पुष्कळ वेळ कुणीच काही बोललं नाही. अविनाश खुर्चीवर बसलेला होता. त्याने

सिगरेट पेटवली. मग इतरांनीही. मसामसा धूर सुटू लागले. आवेगाने सिगरेटी संपू लागल्या.

'माझ्या फार होप्स होत्या. माझं सिलेक्शन होईल असं मला फार वाटत होतं'. अविनाश बोलला.

'तसं आम्हांलाही वाटत होतं. आमच्याही फार होप्स होत्या.'

'पण माझी अपेक्षा होती. मला फार जरूर होती. फार जरूर होती.' अविनाशची सिगरेट भराभरा संपू लागली. 'फार गरज होती रे दोस्तानो मला. येताना खूप होप्स बाळगून आलो होतो. –'

तसा आता प्रत्येकजण समदुःखी असूनही एकेकटा आपल्या दुःखाला जणू सामोरा जात होता. अविनाश बोलत होता तरी इतर तिघांवर तशी फारशी प्रतिक्रिया होत नव्हती. तिघेही सिगरेट पीत बसून होते.

अविनाश थोडावेळ एकाकीच सिगारेट फुंकत बसून होता. पुन्हा पोटातलं दुःख उफाळून आल्यागत म्हणाला, 'मला खूप होप्स होत्या. माझं व्हायलाच हवं होतं सिलेक्शन. वायकोनं सत्यनारायण आंगवला होता.'

'सत्यनारायण ?'

'म्हणजे आता नाही का ? नोकरी मिळाली असती तर सत्यनारायण पुजणार. नाहीतर काही नाही. ही चायला मंकस भलतीच इंटरेस्टिंग आहे.'

'असे थट्टेवारी नेऊ नकोस. मला फार गरज होती. वायको तारेची वाट बघत असेल. तिला कळवायचं होतं. फेव्हरेवल वाटलं असतं एकूण सगळं तर टेलिग्राम करायचा होता. वाट बघत असेल. आजच माझ्या धाकट्या मुलीचा वाढदिवस, फार वाटत होतं. त्या पोरीच्या नशीवानं तरी काही चांगलं घडेल, पण. . .नाही. सालं गांडूपण म्हणतात ते हे.'

अविनाशनं आणखी सिगरेट पेटवली.

आतापर्यंत सगळे एकत्रच होते काल-पासून हे खरं. पण बोलण्याचे विषय अभ्यासविषयाशी व परीक्षेशी संबंधित होते. अजून कुणीच फारसं स्वतःसंबंधी

**......गतवर्षी 'साधना'च्या दिवाळी अंकातील 'भर दुपारी, निष्पर्ण झाडावर' या दीर्घकथेने सर्वांचे लक्ष वेधले आणि श्री. ह. मो. मराठे हे एकदम प्रसिद्धीच्या प्रकाशझोतात आले. त्यांची प्रस्तुत कथा तशीच मनाला अस्वस्थ करून सोडणारी, हादरा देणारी...**

बोलला नव्हता. अविनाश एखादा द्रव उतू जावा तशा उकळ्या फुटून बोलू लागला होता. आता त्याच्या पर्सनल स्टोरीत इतरांना थोडा थोडा इंटरेस्ट निर्माण व्हायला लागला होता. थोड्याशा दूर उभ राहून तिघांपैकी एकेकजण अविनाशला उसवताना पाहू लागला.

'फार होप्स होत्या मला. हा चान्स मिळाला असता तर शंभरदीडशेचा दरमहा फरक पडला असता. म्हणजे वर्षाकाठी दीड हजार. वस्स काटकसरीने आजच्या-सारखंच राहून पाचसहा वर्षात मोकळा झालो असतो.'

'मोकळा ?'

'गुंतलायस कशात ?'

'कर्ज. सहा हजार. ते फिटेपर्यंत व्याज वाढत वाढत ते दहा हजार होणार. दहा हजार रुपयांचे कर्ज.'

'इतकं कर्ज करून काय केलंस ?'

'हा वारसा आहे. वडिलोपार्जित वारसा.'

अविनाश गप्प झाला. फक्त त्याच्या तोंडातील सिगरेट आवेगाने जळत राहिली.

'वडिलांचा इतकाच वारसा उरलाय. घर कर्जाखाली आहे. अगदी मोडकळीलाच आलंय. पण ते मला सोडवायलाच हवं. घर वडिलांच्या वडिलांनी बांधलं. ऐसपैस. वडिलांनी ते संभाळलं फक्त. दुरुस्तीसुद्धा केली नाही. शक्यच नव्हतं. वडील वारताना घरावर सहा हजारांचे कर्ज.'

'घर मोठं आहे ?'

'हो.'

'मग असं का करत नाही ? तुमची सिटी आता रॅपीडली एक्स्पांड होतेय. विकून टाक. दहा बारा हजार येतील. त्यातून कर्ज फेडून शिवाय स्वतःला एक ब्लॉक घेता येईल.'

'असं वाटतं अनेकदा; पण शक्य होत नाही. भावना गुंतल्यात. वडिलांनी शेवटचं एकच सांगितलंय–घर कर्जातून मोकळं कर, दुरुस्त कर. विकू नको. घर विकायचा विचार मनात आला की अपराधी वाटतं.'

इतर तिघे आरामात लोळत होते ते उठून वसले. अविनाशच्या या कथनाने त्यांचं आता मनोरंजन होऊ लागलं होतं. एकजण तर खोखो हसू लागला.

'म्हणजे वडिलांना वचन का काय ते दिलंयस की काय ?'

'होय ! वचनच. घर कर्जातून सोडवून दुरुस्त करीन असं सांगितलंय. ते मला काही करून साधलंच पाहिजे. आजचा चान्स जमला असता तर आशा बरता आली असती.'

'वचनपूर्तीसाठी ?'

'च्यायला. भलताच जुनाट आहेस दोस्ता तू–'

'बाप मरून गेला ना ? आता कसलं वचन नि काय ? घर टाक विकून नि हो मोकळा.'

अविनाशला काही बोलावंसं वाटलं. पण तो बोलला नाही. तो बसला होता त्याच्यासमोर खिडकी होती. तो खिडकीतून बाहेरच्या उंच उंच इमारतींकडे आणि त्यापलीकडच्या अस्पष्ट धूसर आकाशाकडे बघत राहिला.

'आमची साला तयारी बापालासुद्धा विकायची आहे. त्याच्या वचनाचं काय घेऊन बसलायस.'

'जग किती पुढं गेलंय बघ. श्रावणबाळाचं आणि पुंडलीकाचं जग कधीच संपलं.'

'संपू दे.' अविनाश इतकं बोलून थांबला. नंतर खडकात मूर्ती खोदावी तशा स्वरात म्हणाला.

'ते जग संपून गेलं म्हणूनच आपल्या आयुष्यांची अशी परवड चाललीय. म्हणूनच आपणाला नोकऱ्या मिळत नाहीत. पैसा मिळत नाही.'

इतर तिघे आता थोडचा गंभीर मूडमध्ये आले. अविनाश त्यांना आता जवळचा वाटू लागला.

'आपल्याबरोबरच्या पैकी कोणकोण सिलेक्ट होतील रे त्या पोस्टस्साठी ?' अविनाशने वातावरण बदलण्यासाठी म्हणून विचारलं.

'तो एक चष्मेवाला,' 'दुसरा तो सूट घातलेला,' 'आणखी तो दोंदल्या,' 'हा हा तो साला मद्रासी वाटत होता.' 'माझ्यासमोर बसलेला एकजण भरारा लिहीत होता. टेक्निकल प्रश्नांना साला एसेटाओप उत्तरं लिहीत होता की काय नकळे.'

'आणि ती स्कर्टवाली गोरटेली मड्डम?'

'ती तर साली सर्वात आधी. पर्सनल इंटरव्ह्यूच्या वेळी भडवीनं स्कर्ट वर करून रंगीन दुनिया दाखवली की झालं. तावडतोब सिलेक्शन.'

अविनाशला हे ऐकून चटका बसल्यागत झालं.

'चल. असं नसेल. आपल्यापेक्षा हुशार असेल ती लेका. म्हणून तिचा इंटरव्ह्यू बरा होईल.'

'तुम्ही अजून खरंच सत्ययुगात आहा राजे.'

'दोस्ता असं नसतं. बाई बरी दिसली आणि जरा सैल असली की सिलेक्शन. त्यांनी काही करायचं नसतं. इकडेतिकडे फिरायचं. थानं नि कंबर हेलकावायची नि साहेबांचं मनोरंजन करायचं. बस्. इतकंच.'

एखाद्या अद्भूत कथेतल्या परिस्थितीचे वर्णन ऐकावं तसं, अविनाश हे ऐकत होता.

'हे बरं नाही. स्त्रीची किंमत यापेक्षा अधिक असली पाहिजे समाजात.'

'असते ना. बाईबाईप्रमाणं ती बदलते. बाई पुष्कळशी देखणी, पुष्कळशी सैल असेल तर साहेबांचं मनोरंजन ती जास्त करील. तिला बरी किंमत मिळते.'

'तुला बायकांची किंमत किती असते हे बघायचे असेल तर वेश्यावस्तीत जा. सिनेमा वर्ल्डमधे जा. नाहीतर पॉश सोसायटीत जा.'

'ज्या मूल्यांच्या नावानं तू संतापतोयस ना ती तिथं तुला लाथेने उधळलेली दिसतील.'

'तुमची ती मूल्ये व तुमच्या बायकांची किंमत यावरून आठवलं बघा. बंगालमधलं कुठलं ते सरोवर—हां, रवीन्द्र सरोवर—तर च्यायला हव्यातशा कुचलल्या बायका तिथं लोकांनी—'

'पण ते सारं खोटं आहेय् असा रिपोर्ट बाहेर आलाय—'

'रिपोर्ट काय खरे असतात—ते बनवायचे असतात. आपण कसा कामाचा रिपोर्ट बनवतो—'

रवींद्र सरोवराची माहिती वाचून अविनाश मनोमन उलथापालथा झाला होता. त्यावेळी त्याच्या मनोबुद्धीनं भोगलेल्या वेदना पुन्हा जाग्या झाल्या. म्हणाला,

'ते सालं प्रकरण भलतंच भयंकर होतं. माणसं पशूसारखी वागली. मी फार त्रासलो होतो तेव्हा—'

'तुमचं नॅचरल आहे. बापाची अंतिम इच्छा म्हणून मोडकळीला आलेलं घर सावरत बसणारी माणसं तुम्ही—पण आपणाला मात्र काही झालं नाही, मी अगदी स्वस्थ होतो.'

'रवींद्र सरोवराचं कशाला ? इथं मुंबईत दोनचार वर्षांपूर्वी कसला तरी मोठा समारंभ होता. खूप गर्दी जमली होती लायटिंग बघायला. खूप मस्त रोषणाई होती. आणि अचानक लाईट्स गेले. लोकांनी साल्या बायकांच्या बॉड्या फाडल्या——'

'हे सालं सगळं भयानक चाललं आहे—'

'हे काहीच नाही. याहून खूप भयानक चाललंय् सगळीकडे—'

'काल म्हणे साली नागपूरजवळ नक्षलवाद्यांनी गाडी लुटली—'

'कलकत्त्यात तर नक्षलवाद्यांचा धूमाकूळच चाललाय्. रोज लुटालूट. बॉम्बफेक. साली तिथं बाँबची दुकानंच आहेत म्हणे चक्क.'

'आपला समाज पार उध्वस्त होण्याची ही लक्षणं आहेत. मला भय वाटतं—आपलं भवितव्य काय ?' अविनाश उत्कटपणे उसळून म्हणाला. त्यावेळी तो एका बँकेतला क्लार्क नव्हता. एखाद्या महान प्रेषितासारखा देश आणि समाज याचं अंतरंग न्याहाळीत होता.

'दुसरं काय होणार या समाजाचं ? सत्यानाश.'

'होऊ दे. काही बिघडणार नाही.'

'आपला समाज पार बिघडवलाय् लोकांनी. पैसेवाल्यांनी. पॉलिटिक्सवाल्यांनी. वशिलेबाजांनी—संपून जाऊ दे हा समाज. आपणाला काही दुःख नाही त्याचं—'

'आपला महान देश आणि महान संस्कृती' अविनाश व्याकूळ झाल्यागत शब्द उच्चारीत होता.

तिघांपैकी एकजण पुन्हा खोखो हसू लागला.

'च्यायला देश आणि संस्कृती, काय भयानक बोलतोस रे तू ? हे असलं कुणी बोलताना ऐकलं की मला चक्क शौचाला होतं. आत्ता पण व्हायला लागलं.' तो उठलाच. संडासाच्या बाजूने निघाला. जाताना म्हणाला, 'अविनाश, तुमची संस्कृती आणि मूल्य यांच्या नावानं मी झक्कपैकी शौचाला जाऊन येतो.'

अविनाशला खुर्चीवर बसल्याबसल्या अग्निकुंडात फेकल्यासारखं झालं. त्याला वाटलं, हिंदुस्थानच्या संस्कृतीसंबंधी असं बोलणाऱ्याला चागलं झोडपावं. त्यानं त्वेषासरशी एक सिगरेट पेटवली आणि चार झुरके मोठ्या आक्रस्ताळीपणाने घेतले. एखाद्या दुष्टाचं मुंडकं छाटावं तशी सिगरेटची राख झटकली. तो काही न बोलता गप्प बसून राहिला.

. संस्कृती आणि समाज यांच्यासंबंधी विचार करताकरताच त्याला आठवलं की आपलं आज सिलेक्शन झालं नाही. येताना आपण मोठ्या अपेक्षा बाळगून आलो होतो. आज छोटीचा वाढदिवस. त्याचं मन मुंबईच्या लॉजमधल्या खोलीतून उडालं आणि दूर नागपूरच्या बाजूच्या एका मध्यमप्रतीच्या शहरातल्या जुनाट, जीर्ण, पडायला झालेल्या, कर्जाच्या भाराने वाकलेल्या घरात गलं. घरात त्याची बायको आणि दोनतीन मुलं त्याच्या तारेची वाट बघत होती. अविनाशला मोठ्या पगाराची नोकरी मिळणार होती.








कर्ज आणि दारिद्रय फिटणार होतं. त्याची आशास्वप्नं त्याच्या पत्नीच्या डोळ्यांत तरंगत होती. तिनं छोटीला थोडंसं सजवलं होतं. इतर दोघा मुलांच्याही पानाभोवती रांगोळी काढलेली होती. अविनाश तिच्यासमोर जाऊन उभा राहिला. झाली निवड ? नाही. का ? काही न बोलता अविनाशचं मन परत लाँजवर परतले.

'आपलं सिलेक्शन का झालं नसेल रे' अविनाशनं आपल्या दोघा सोबत्यांना विचारलं. टेस्ट तशी काही टफ नव्हती. प्रश्न तसे सोपे होते. तुमचं मला माहीत नाही. पण माझी उत्तरं सॅटिसफॅक्टरी वाटायला हरकत नव्हती.'

'आमची तरी उत्तरं का सॅटिसफॅक्टरी नसावी? आमचंही सिलेक्शन का होऊ नये?'

'आम्हालाही अधिक पैसा मिळाला तर नको असतो असं नाही. हवा असतो. पण मिळत नाही.'

'माझे वडील कॅन्सरनं आजारी आहेत. त्यांच्या औषधोपचारासाठी मला पैसे हवेत. कुठं मिळतील ? ही नोकरी मिळाल्यानं माझी गरज भागली असती असं नाही. पण एक आशा. आज कर्ज काढू. उद्या फेडू. शिवाय बाप जगेल ही आशा नाहीच. आणि तो लवकर मरत पण नाही.' आपली कथा सांगणारा थोडा वेळ थांबला. पुन्हा म्हणाला, 'कॅन्सरच्या पेशंटचं एक बरं असतं. शेवटीशेवटी ते बोलत वगैरे नाहीत. त्यामुळे माझा बाप शेवटची एखादी इच्छा वगैरे सांगून माझ्याकडून कसलं वचन वगैरे घेण्याची शक्यता नाही.' आपली कथा सांगणारा मग स्तब्ध बसून राहिला.

'अविनाशराव, तुम्हाला एक सांगू ? बडे जॉब्स मिळविण्यासाठीही वशिला लागतो. ओळखदेख. आता ही खरे म्हणजे वरची परीक्षा. पण तिथंही आपली ओळख नाही म्हणून डाळ शिजत नाही. मी सांगतो आमच्या बँकेच्या हेडऑफिसमध्ये साध्या प्यूनची नोकरी द्यायला पाचशे रुपये तो सुंदरम घेतो. उघडउघड धंदा करतोय तो. तिथल्या कुणाही प्यूनला विचार. तो हेच सांगेल.' आपली कथा सांगणारा

( दीपा. ८ )

हाही थोडा वेळ थांबला. मग स्वतःविषयी बोलू लागला, 'मला पण ही नोकरी मिळायला हवी होती. माझी बायको फार आजारी आहे. पाच वर्षं झाली. मोठ्या खर्चाचे उपाय झेपत नाहीत म्हणून सोपे-सोपे उपाय करतोय. पगाराचा बराच भाग तिच्या औषधात खर्च होतोय. सालं लग्न झाल्यानंतर वर्षभरानं जो सुखाला पारखा झालो तो अजून तिथपर्यंत पोचत नाही.'

संडासला गेलेला चौथा थोड्या वेळा-पूर्वीच परत आला होता. इतरांच्या कथा ऐकत तो स्वस्थपणे बसून होता. इतरांचं बोलून झाल्यावर जी शांतता पसरली तिचा भेद करीत तो म्हणाला, 'अविनाशराव, तुमची संस्कृती आणि परंपरा आणि मूल्य यांच्या नावाने मी शौचाला जाऊन आलो. आता मला अगदी ऋणमुक्त झाल्यागत वाटतंय. आता तुमची सर्वांची दुःखंही नाहीशी होतील.'

इतर दोघेजण हसले. अविनाशला पुन्हा अग्निकुंडात फेकल्यागत झालं. तो त्या चौथ्यावर चांगलाच चिडला. पण काही करावंसं त्याला वाटेना. एक दिवसाची संगतसोबत. कशाला भांडण करा ?

बराच वेळ कुणी बोललं नाही. चौथ्या-खेरीज उरलेले तिघे आपापल्या दुःखांच्या ओझ्यांना गोंजारीत बसले. चौथा त्यांच्या-कडे नुसताच बघत राहिला.

कुणीच बोलत नाहीसं बघून चौथा म्हणाला, 'तुमच्या दुःखांवर उपाय तुम्हाला सापडले का ? नसतील तर माझ्याकडे आहेत.'

'काय ?'

'बाहेर चला. सांगतो. आपणाला बोअर झालंय. बाहेर जाऊन काहीतरी घेऊ. चांगल्याशा हॉटेलात जाऊ. तुमच्यापैकी ड्रिंक कितीजण घेतात ?'

दोघांनी हात वर केले. अविनाश घेत नव्हता. 'ए भटजी, दारू पी. चल. मी दाखवतो. इथं कुठं कुठं मिळते मला माहीताय्. चला. साल्यानो बाँबेत आल्यासारखं हे तरी करा. पाच दहा रुपयाचा प्रश्न.'

'मद्यपान ?' अविनाश.

'मद्यपान ? च्यायला ही काय संस्कृत पाठशाला आहे ? ड्रिंक म्हण. नाहीतर सरळ दारू म्हण दारू. तिथं तुम्हाला उपाय सांगतो. असलेली नोकरी टिकवणं. बढती. पगारवाढ. वरची पोस्ट. सर्वांवर एकच उपाय. मला सापडलाय्.'

आवेगानं बोलणारा चौथा मध्येच बोलायचा थांबला. मग म्हणाला,

'ऐकायचंय् तुम्हाला तो उपाय ? पण मला तो सांगितल्यानंतर ड्रिंक हवे. नाहीतर मी बेभान होईन. चला आपण जाऊया.'

पण अविनाशची व इतर दोघांचीही तयारी नव्हती. मग चौथ्याचाही उत्साह थोडा कमी झाला.

'उपाय सांग.'

'हा. . .याची बायको आजारी आहे. याला तो उपाय उपयोगाचा नाही. भट-जीला चालेल. तुझी बायको कशी आहे ? धष्टपुष्ट आणि गोरीगोमटी ? मग चालेल. तुझी रे ! बरी असेल बहुतेक. असं करा. आत्ता आज इंटरव्ह्यू घेणाऱ्या साहेबांच्या घरी जा. त्यांना सांगा आमची बायको एकेक रात्र तुमच्याकडे पाठवतो—तावड-तोब अपॉइंटमेंट—' तिघांनीही चौथ्याच्या अंगावर झडप घेतली. अविनाशने त्याचं नरडंच धरलं. मघापासूनचा अविनाशचा कोंडलेला राग उफाळून आला.

'भडव्या वाटेल ते भकतोस——'

'मादरचोद ठार मारीन—'

'वाट्टेल ते सांगायला शरम नाही वाटत—'

अविनाशनं त्याचं नरडं पकडलं होतं ते सोडलं आणि त्याचे केस मुठीत धरले. त्याला केसांना धरून गदगदा हलवलं. मग जास्तीत जास्त कठोर असा प्रश्न विचारला,

'तू तुझ्या बायकोला का पाठवीत नाही ?'

'आय् हॅव् डन इट्. डन इट्. लाँग बॅक् . . पूर्वीच केलंय्. आय् हॅड टु. सध्या आहे ती नोकरी सुटायला आली. साहेबांना घरी भेटलो. ही सजेस्टेड द वे अँड आय् फॉलोड इट्—'

त्याचे केस पकडणारे अविनाशचे हात अगदी लुळे पडले. तो मागे सरला आणि आपल्या खुर्चीवर बसला.

चौथा उठून उभा राहिला. 'गुड बाय फ्रेंडस्. गुड बाय.' आणि तो रुमझुमत निघून गेला.

बाहेर रात्र बरीच झाली होती. असंख्यात भगभगीत दिवे शहरभर सगळीकडे टचटचले होते. • • •

## श्रीराम कामत

. . . तसे पाहिले तर श्री. श्रीराम कामत हे मधल्या पिढीतलेच लेखक. . पण त्यांच्या लेखनावर कुणाही ज्येष्ठ साहित्यिकाच्या लेखनशैलीची छाप नाही... त्यांची शैली ही त्यांची स्वतःचीच आहे... 'लघुकथे'ने गुणवत्तेचे शिखर गाठले असे जाणते म्हणत त्या काळात श्री. कामत यांनी उत्तमोत्तम कथा लिहील्या... 'दीपावली'तून प्रसिद्ध झालेली 'भस्माचा डोंगर' या कादंबरीबद्दल भल्याभल्यांनी प्रशंसोद्गार काढले होते.. मुंबईतील आजच्या अश्रद्ध तरुण पिढीच्या काळातील जीवनाचे परखड चित्र रंगविणारी . . .

# एक प्रक्षोभक कादंबरी



'आम्ही उद्या मेल्यावर खुशाल म्हणा–बरं झालं! एक नालायक संपादक आटोपला! आम्हीसुद्धा अखेर माणूसच होतो तर, बिल्कुल फालतू! . . . .'

दोन ओळींचा तो अग्रलेख. पहिल्या पानावर ती ठळक बातमी–मी कपाळावर हात मारला.

[ २ ]

तात्याराव विजयकर, जुन्या पिढीतील एक ज्येष्ठ नि जाणते पत्रकार. म्हणूनच की काय खारला स्मशानात त्यांचा देह जळत होता तेव्हा जेमतेम पाचपंचवीस डोकी दिसत होती.

दोन पत्रकार. ह्यांच्या त्या परिषदेचा नियम आहे. कोणी पत्रकार मेला की जातीनं उपस्थित राहून मृताला हार घालावा.

चार नातलग.

बाकी तात्यारावांच्या 'जनमता'चा भावडा नोकरवर्ग.

तात्यारावांचे चिरंजीव बापाच्या देहाला अग्नी द्यायला वरो-वर ठरल्या वेळेवर हजर झाले. सचिवालयात बड्या अधिकारावर असतात हे. कामाच्या गर्दीत त्यांना इतकी सवड काढता आली हेच खूप होतं.

भाषणं झाली नाहीत. कोणाची तयारीच नव्हती. छापून येण्याची सुद्धा नक्की खात्री नव्हतीच म्हणा!

आयुष्यात या माणसानं कधी गर्दी गोळा केली नाही. आज हा मेला. तरी ब्रीद राखलं. टाकलं नाही.

[ ३ ]

मग साडेसहाच्या सुमारास आम्ही स्मशानातून सरळ गिर-गावला कचेरीत परतलो.

वृत्तसंपादक जोशी वाट पहातच होता. बसल्या जागेवरून तो कोकलला, "भांडारकर, अरे म्हणायचं काय तुम्हांला?"

ह्याचं बोलणंच पंचमात. नेहमी लेकाचा घाईला आलेला.

मी उत्तर दिलं नाही. जरूर नव्हती.

"च्यायला, न्यूज एडिटर म्हणजे ओझ्याचं गाढव. कामाचा राब आणि माथ्याला ताप. . ."

मी गप्पच.

"अरे खास अंक काढायचाय म्हणतात." जोशी असा मुद्यावर आला.

तसं तोंड उघडणं भागच होतं, "कोण म्हणतात?"

"साहेब. म्हणजे फॉर्मर साहेबांचे चिरंजीव."

"हूं!" मी तरी अधिक काय बोलणार!

"नाथ पालेकर मेसेज देऊन गेला. अरे आपल्याकडेच होता हा पालेकर. आठवत असेल तुला. तुझ्याआधी ही 'मुंबईची वारी' तोच करायचा. टॉप, झक्कास! काय भाषा, काय मुद्दे, काय ओघ–सगळंच कसं झक्क साधायचं बेटयाला. नाथानं हे सदर खूप पॉप्युलर केलं होतं. . ."




"आणि म्हणून तात्यारावांनी ह्याला हाकलला."

"साहेबांना काळजी पडली रे जनमताचा सेलविल वाढला तर काय घ्या !" टाळीचं वाक्य फेकून वृत्तसंपादकानं चार मिनार शिलगावली. "खरं म्हणजे सेल वाढलाच होता. दोन हजारांचा एकदम बावीसशे. ही पत्रं येत नाथाला. पोरीबाळींचीच अधिक. आणि फोन सुद्धा. साला लकी चॅप !"

आजतरी नाथा पालेकराच्या खाजगी आयुष्याबद्दल मला उत्साह नव्हता. जोशीला मी विचारलं, "बाबारे, तुझा हा खास अंक कधी निघायचाय ?"

"माझा नाही बाबा ! मी आहे अजून. आणि गेलो तरी खास अंक कोण काढणार आमचा ? तात्यारावांचा खास अंक. तारीख ठरायचीय. उद्या आता कार्यालयाला रजाच आहे. तेव्हा परवा बघू." जोशी म्हणाला.

"बघणार कशात ? पंचांगात ?"

"तुला काय करायचंय ? एक लेख तयार ठेव तात्यांवर."

मी गडबडलो, "आपण ? नाही रे बाबा ! ती लायकी नाही आपली."

"बाकी देशी आणि विलायती मंडळींवर लेखणी घासत बसतोस तेव्हा––तुझ्या तात्यारावांची लायकी काय त्यांच्यापेक्षा जास्त आहे ?" जोश्यातला वृत्तसंपादक उसळला, "भांचोद, फुकट लाडवून ठेवलाय––"

[ ४ ]

सात, नाही आठ वर्षांपूर्वी. एक दिवस. मुक्काम रत्नागिरी. रांगणेकर मास्तराला मेन्टल हॉस्पिटलमध्ये दाखल केलं आणि मी बाहेर पडलो होतो.

खरं म्हणजे मला पाडायचा होता याचा मुडदा. बदला घेणार होतो मी. आईच्या मरणाचा. भांडारकरांच्या घराण्याला लागलेला डाग ह्या म्हाताऱ्याच्या रक्तानं पुसून टाकणार होतो. . .वगैरे.

कारण ह्याच्या गुलजार रूपावर आमच्या मातोश्री आषक झाल्या. चाळिशीची विधवा बाई, मालवणची म्युनिसिपल कौन्सिलर. तर हिला दिवस गेले. डॉ. घोटसकर नात्यातला. म्हणून गर्भपाताला तयार झाला. ऑपरेशनच्या टेबलावरच आईनं प्राण सोडला.





अनुक्रमणिका

'मदर सिरियस. स्टार्ट इमिजिएटली." मला तार गेली झेव्हियर कॉलेजच्या होस्टेलमध्ये. दुसऱ्या दिवशी संध्याकाळी घरी पोचतो तर आईच्या अस्थींचा तांब्या हातात ठेवून डॉ. घोटसकर बोलले, "सॉरी रवी ! काही करू शकलो नाही मी. आय फेल्ड. साधी केस–अॅपेन्डिसायटिसची. . . !

होय ! खरी गोष्ट या लोकांनी माझ्यापासून लपवून ठेवली. त्यांच्या मते खऱ्याखोटयाला आता अर्थ नव्हता, महत्त्व नव्हतं. पण आमच्या मालवणात असल्या गोष्टी लपत नाहीत. थोवाडं दाबलीत तरी भानगडी दुसऱ्या हजार वाटांनी फुटतात. मिटत नाहीत. चारच दिवसात काय कळायचं ते मला कळलं. आणि या रांगणेकर मास्तराच्या तपासाला मी लागलो.

विशीत रक्त नुसतं उसळतं. मग बाकी विचार रहात नाही.

उभा रत्नागिरी जिल्हा पालथा घातला. तेव्हा मिठबावच्या शाळेत या मास्तराचा पत्ता लागला.

शाळेच्या फाटकावर तीन दिवस दवा धरून होतो. पण हा दिसलाच नाही. तेव्हा चौथ्या दिवशी पोरांकडे चौकशी केली. कळलं, रांगणेकर सरांचं डोकं फिरलंय. 'माय डिअर डिअर डार्लिंग' करीत कागदाचे तुकडे जमवीत हा गावातून भटकतोय.

अखाच सापडला. रस्त्यावरील कागदाचे कपटे खिशात भरताना. एका बोळात.

त्याचा तो अवतार बघून डोळ्यांवर विश्वासच बसेना माझा. माणूस पिंजून पिंजून चिंध्या झाला होता. मूळचा गोरा, गरगरीत हंसरा चेहरा पार खप्पड झाला होता. कुजक्या आंब्यासारखा काळवंडला होता. ह्याच्या अंगावर मांस नव्हतंच. नुसती हाडं. आणि चामड्या लोंबत होत्या. दाढी नि केस किती दिवसांची वाढली होती देव जाणे ! झाली होती शुभ्र पांढरी. खोल डोळ्यात फटफटीत बुबुळं गरागरा फिरत होती.

मी पुरता जमीनदोस्त. कोसळलोच.

"सर, मला ओळखलंत ?" उचंबळून मी विचारलं.



"आं !" म्हातारा दचकला, गर्कन वळला. एखाद्या भारलेल्या नागासारखा डोलत माझ्याकडे टकमक बघत राहिला. "तू– तूच ती ? आय नो यू विल कम. . . . यू हॅव्ह टु कम डार्लिंग डिअर, फॉर आय लव्ह यू विथ ऑल माय हार्ट, विथ ऑल माय माइन्ड, विथ ऑल माय सोल." . . . .

कप्पाळ ! मला नाही, माझ्यातील माझ्या आईला ह्यानं ओळखलं होतं. आणि त्याच्यातील उरलंसुरलं चैतन्य चाळवलं होतं. भावनांचे आटलेले झरे पुन्हा फुटू लागले होते.

पण अंतर्मनाची ही उलथापालथ रांगणेकर मास्तराला सहन झाली नाही. तितकी ताकद त्या दुबळ्या देहात राहिली नव्हती. थरथरत तो खाली बसला. हातपाय पसरले. तिथं भररस्त्यावरच डोकं टाकलं. डोळे अश्रूंत मिटत होते. ओठ पुटपुटत होते, "लेट मी लाय व्हाइल यू आर विथ मी डिअर." . . . .

मिठबावच्या रस्त्यात रांगणेकरला असा उघड्यावर मरू देणं मला बरं वाटेना. रत्नागिरीला वेड्यांच्या इस्पितळात याची व्यवस्था करण्याचं मी ठरविलं.

रत्नागिरीच्या मेन्टलच्या बाहेर पडलो आणि रस्त्यावरच घोटाळलो, अडखळलो.

उभ्या दुनियेत माझं कोणी राहिलं नव्हतं. मीही कोणाचा उरलो नव्हतो.

यापुढं––

माझा मी. एकटा. एकाकी. . . .

## [ ५ ]

. . . .मागं गाडीचे ब्रेक करकचून लागले. मी फूटपाथवर उडी टाकली. त्वेषानं ओरडलो, "लोकांचे प्राण घ्या लेको ! एक हाच उद्योग तुमचा."

"आयडिया केली जरा" दात विचकत ड्रायव्हर बोलला, "अहो हॉर्न तरी किती वडवायचा."

"तू होय डेव्हिड !" मी याला ओळखलं.

"मग कोण वाटला साहेब !" तात्यारावांचा हा मल्याळी ड्रायव्हर मराठी बाकी छान बोलायचा.

"तुझा तो डेव्हिल !"

डेव्हिड ऐसपैस हसला. "चला आता राव. नाहीतर शिंगावर उचलीन."

"अरे होय की ! पण कुठं ?" मी विचारलं.

"खारला मिरावाईनी बोलावलंय." त्यानं सांगितलं, "भजनं सुरू झालीत घरी. इलेव्हन डेज."

पुढचं दार उघडून गाडीत त्याच्या शेजारी बसत मी म्हटलं, "भजनात मला गोडी नाही."

डेव्हिडनं गाडी चालू केली. ती केनेडी ब्रिजवरून घेऊन वेग वाढवला.

अनुक्रमणिका







मग तो बोलला, "देवावर जरा विश्वास ठेवावा साहेब."

"हो का?" डेव्हिडशी वाद घालण्यात अर्थ नव्हता. तात्यारावांचा देवावर विश्वास नव्हता म्हणून त्यानं हा विषय काढला असावा.

"माणूस मग जीववीव नाही द्यायचा." तो पुटपुटला.

"हूं!" मी उसासा टाकला.

"यूसी, जी चीज देवानं दिली आहे ती खलास करणं पाप आहे. देव मानतो त्यालाच हे कळतं."

डेव्हिड स्वतःशीच विचार करीत शीळ घालू लागला.

मी म्हटलं, "तात्याराव माणसाला देव मानीत."

त्याच्या धर्माज्ञेप्रमाणं ही ब्लास्फमी होती, पाखंड होतं. डेव्हिड खवळला नसता तरच आश्चर्य. "माय गॉड! फालतू माणूस भांचोद! त्याला देव मानत! माय वॉस वॉज मॅड!"

खारला ज्याला लिंकिंग रोड म्हणतात त्या रस्त्यावर तात्यारावांचा बंगला होता. जुन्या काळचा. वाडवडिलांनी बांधलेला.

दिवाणखान्यात भजन चालू होतं--

तूं माझा यजमान, रामा, तू माझा यजमान . . .

माझ्याकडे लक्ष गेलं आणि मिरा पुढं व्हरांड्यात आली.

बिल्कुल वेगळीच दिसत होती. अंगावर शुभ्र पातळ. लांबसडक केस पाठीवर मोकळे सोडलेले. ओला, पारोसा चेहरा, दुःखात चिप्प भिजलेला.

व्हरांड्यातील निळ्या अंधुक उजेडात पाहूनही हिला मी ओळखलं नाही.

"या!" तिचा हा आवाजसुद्धा मला ओळखता आला नाही. भलताच खोल, जड होता.

बाजूच्या दगडी खांबासारखाच मी ताठ उभा होतो.

"भांडारकर–" मिराचा हा खरा आवाज. माझ्या परिचयाचा.

"आं! तुम्ही होय?"

तिची मान खाली गेली. दोन्ही हातानी तिनं तोंड झाकून घेतलं.

काय बोलावं मला कळेना.

नाही बुवा! कोणाचं सांत्वन वगैरे करण्याचं तंत्र आपल्याला जमलं नव्हतं. तो प्रकारच भयंकर वाटायचा--खोटा, नाटकी.

मिरानंच तोंड उघडलं. म्हटलं, "वर तात्यांच्या स्टडीमध्ये बसता जरा. मी आलेच."

या घरात माझ्या खऱ्या परिचयाची फक्त ही एकच जागा होती.

दुसऱ्या मजल्यावर. जिन्याला लागून. सहा–बाय–सहाची इवलीशी खोली.

तात्याराव म्हणत, "अरे, मोठी खोली करायचीय काय? सहा–बाय–तीनचा देह. प्लस तितकीच जागा इन्टिलिजन्सला. बास! माणसाचा अभ्यास त्याच्यापेक्षा मोठा असून चालायचं नाही बाबा."

## बहुसंख्यांकांची चटणी

[ राजकीय दिवाळें वाजण्यापूर्वी ]

**साहित्य :– जनतेच्या नाकास झोंबणाऱ्या मिरच्या; समतावादाचा पाटा–वरवंटा; अल्पसंख्यांकांच्या 'एकच प्याल्या'तील पाणी.**

**कृती :– बहुजन समाजाच्या नाकास झोंबणाऱ्या मिरच्यांचे बारीक बारीक तुकडे अहिंसेची धार असणाऱ्या सुरीने करावे. ते पाटयावर घेऊन त्यावर समतेचा वरवंटा फिरवावा. मधून मधून अल्पसंख्यांकांच्या 'एकच प्याल्या'तील पाण्याचा शिडकावा करावा व पुन्हा हळूवार वरवंटा चालवावा. एखाद्या सरकारी योजनेचे खोबरे झालेले असल्यास तेही चटणीत मिसळावे. कुटुंबनियोजनाचे खोबरे मिळाल्यास फारच उत्तम.**

**पाच–पंचवीस वर्षात बहुसंख्यांकांची बारीक चटणी होऊन जाते.**

अभ्यासिकेचं दार आतून बंद होतं.

मी कडी वाजवली.

चेतननं–तात्यारावांच्या चीरंजीवानं दार उघडलं.

तरी शंभरवेळा आमची ओळख झाली असेल. पण मी दिसलो की प्रत्येक वेळेला याचा चेहरा असा कोराकरीत व्हायचा.

"मी रविंद्र भांडारकर." आज तरी माझी मलाच ओळख द्यावी लागली.

"आय नो यू मिस्टर. यू आर हिज चेला. करेक्ट?" स्वारीची जीभ अडखळत होती. झोक जात होते. "कम इन्!"

आत टेबलावर दारूची बाटली होती. व्हाइट हॉर्स–उघडी, अर्धी. बाजूला ग्लास. ते मात्र रिकामं.

"बसा की!" चेतननं टेबलाशी असलेली एकुलती एक खुर्ची पुढं केली. आपण टेबलाला टेकून उभा राहिला. "यू ड्रिन्क?"

"नो. थॅन्क्स्!"

"गुड! माफ करा. आज नॉर्मल नाहीय मी." त्यानं ग्लासात दारू ओतली. ग्लास तोंडाला लावलं. "तुम्हाला मी कशासाठी बोलावलं होतं--"

"तुम्ही?" मी मध्येच विचारलं.

तात्यारावांच्या सुपुत्राच्या भुवया वाकड्या झाल्या. बडे सरकारी अधिकारी. बोलण्यात व्यत्यय झालेला त्यांना खपला नाही'



अनुक्रमणिका

"अलाव मी टू स्पीक सर."

मला सुद्धा असलं वोलणं ऐकून घेण्याची सवय नव्हती. तोंड गोरंमोरं झालं. कानशिलं उडू लागली.

चेतनला माझ्याकडे लक्ष देण्याचं कारण नव्हतं. मुलाखतीला एखादा मंत्री वोलतो तशा थाटात तो सांगू लागला, "अहो वर्तमान-पत्राचा मालक म्हणजे एखाद्या राजापेक्षाही याला अधिक सत्ता. एक साधी गोष्ट ही. आमच्या तात्यांना अखेरपर्यंत कळली नाही. तुमच्या त्या टिळक-आगरकरांच्या काळातच हे वावरत राहिले. आजसुद्धा. स्वार्थनिरपेक्ष वृत्ती, समाजकार्य, उपदेशानं जग सुधारण्याची स्वप्नं--फ्रस्ट्रेशन येणारच. ते इन्व्हिटेवल होतं, अपरिहार्य होतं. कारण काळ वदललाय, समाज वदललाय, परिस्थिती वदललीय. सगळं हे कसं डायनॅमिक आहे. स्टॅटिक राहिलंय फक्त तुमचं जनमत. हत्ती हा. खड्ड्यात पडलेला, चिखलात रुतलेला. तो मेलेला वघायला लागू नये म्हणून त्यांनी आत्महत्या केली. व्रेनॅड्रिलच्या गोळ्या खाल्ल्या. . . . ."

साहेव जरा थांवले. पिण्यासाठी.

पर्सनॅलिटी वाकी झक्क होती. उंचपुरा वांधा. तरी पाच-आठ असेल. निमगोरा, नितळ वर्ण. रुंद कपाळ. केस मागं हटू लागले होते. नाक जरा मोठं होतं. आणि डोळे वारीक. तोंड वोक्यासारखं; वाटोळं, गरगरीत. विलासी जीवनाची आणि अधिकाराच्या मिराशीची सगळी लक्षणं आणि विरुदं याच्या चेहऱ्यावर होती.

"यू टेल मी भांडारकर, गेल्या दहा वर्षांत या मुंवईत कितीक घडामोडी झाल्या. कितीक चळवळी उसळल्या. मी मी म्हणणारे कितीक ची ची करीत गेले. नव्या जाणीवेनं नि निष्ठेनं झपाटलेले कितीक नाव नि निशाण मिरवीत पुढं आले. सांगा! पण तुम्ही काय सांगणार? तात्यांनी तुम्हाला हे कधी सांगितलं नाही, शिकवलंही नाही. तात्या आयडियालीस्ट होते. आपल्याच स्वप्नात धुंद, वेहोश. रिॲलिटी त्यांना कधी समजलीच नाही. ट्रॅजिडी नाही ही. इन्कॉम्पिटन्स–नायालकी आहे." लेकानं वापाचा उद्धार असा चालवला होता.



तो अधिक ऐकणं मला तरी शक्य नव्हतं.

"तुम्ही हेच वोलणार असाल तर मी निघतो." ताडकन् मी खुर्चीवरचा उठलो.

चेतनचा चेहरा वघण्यासारखा झाला. डोळे आणिकच वारीक झाले. त्यात सुरीची थंड धार होती. त्याहूनही थंड स्वरात तो म्हणाला, "याचा परिणाम, मला वाटतं, यू नो."

मी म्हटलं, "मला पर्वा नाही."

तोंडाला ग्लास लावून शांतपणं तो एक एक घोट घेऊ लागला.

जिन्यातच मिरा भेटली. "सॉरी हं! जरा वेळ झाला मला. चला!"

"वेळ नाहीय मला." मी रागातच होतो.

तिच्या डोळ्यात टच्च पाणी आलं. नाकपुड्या नि ओठ थरथरू लागले.

"मला वाटलंच. तुम्हांला सहन नाही होणार. पण चूक माझी नाहीय."

"चूक माझी. मी यायला नको होतं." मी वोललो.

"ही भजनं... भय्यानं ठरवला हा प्रोग्रॅम. त्याचा तो लाला महाराज, त्यानं सांगितलंय म्हणे. अकरा दिवस नामसंकीर्तन नि भजन चालू ठेवा. वाराव्या दिवशी स्वतः महाराजच घराची शान्ती करायला येणार आहेत. तात्यांच्या आत्महत्त्येनं या घराला वाधा झालीय. आम्ही सगळीच शापित झालोयत.... ज्या गोष्टींची तात्यांना चीड होती, तात्त्विक विरोध होता, सात्विक संताप होता, त्याच चालवल्यायत आम्ही. भय्या म्हणतो..."

मिरा वोलता वोलता थांवली.

तिचं वाक्य मी पुरं केलं, "तात्या नालायक आहेत. तुमच्या भय्याच्याच तोंडून ऐकलंय मी. पुढं ऐकवेना म्हणून उठून आलो."

"कधी? कुठं भेटला हा तुम्हाला?" तिनं डोळे पुशीत विचारलं.

"वर. तात्यांच्या स्टडीमध्ये. तुमच्या भय्याला मला हे सुनवायचं होतं म्हणून तर वर पाठवलंत तुम्ही मला." मी धडाधड घाव घालीत सुटलो.

"मी? गळ्याशपथ, मला माहीतसुद्धा नव्हतं तो तात्यांच्या स्टडीमध्ये आहे." मिरानं सांगितलं, "मला तर वाटत होतं त्या वाजूला आज तरी तो फिरकणार नाही. आपल्याला निवान्त वोलता यईल."

मी खुलासा केला, "नॉर्मल नाहीय तो आज. पीत वसलाय."

"छी! आणि खाली कोणाला कळलं तर?" तिला भीती पडली.

"त्याचा तो महाराज समर्थ आहे!"

मिराच्या खोलीत दिवा नव्हता. आणि तिचं लक्ष कुठं होतं कुणास ठाऊक? हिला काही स्विच झटकन सापडत नव्हता.

तरीही काळोखातच ती वोलत होती, "भांडारकर, तुमच्याशी



अनुक्रमणिका

मला खूप बोलायचंय. सगळे सगळ गैरसमज दूर करायचेत. आणि हो मी अगदी नॉर्मल आहे हं. भय्यासारखी नशेत नाही."

तिचा आवाज कोरडा होता. सपाट, सरळ रेषेत. खोलीतल्या काळोखाशीच जशी ती बोलत होती. किंवा एकान्तात कुठच्यातरी नाटकाची तालीम करीत होती. का मनाला सलणाऱ्या आठवणींच्या निवडुंगात कुठंतरी मरुन पडलेलं कबूतर सापडलं होतं आणि त्याची पिसं निवडण्यात तर ती गुंतली नव्हती ?

काळोखाच्या दारात मी उभा होतो. झोपेतून नुकताच जाग आल्यासारखा.

आणि दिवा लागला. खोलीत लख्ख प्रकाश झाला.

मिरानं माझ्या हातात एक लखोटा ठेवला. सांगितलं, "तात्यांचं पत्र. तुम्हाला."

"मला ?"

"एक मलाही होतं. दोन्ही इथं टेबलावर सांपडली. सकाळी उठले तेव्हा. तात्यांनीच ठेवली असतील. रात्री किती वाजता कोण जाणे !" मिरानं दीर्घ निःश्वास टाकला.

मी विचारलं, "काय लिहिलंय ?"

"पूर्ण विचार करूनच त्यांनी हा निर्णय घेतला होता." तिनं सांगितलं. "तुमचं पत्र वाचा आधी. मग बोलू. . . ."

मी लिफाफा फोडला. वाचू लागलो. . . .

बेटा,

खात्री आहे, तू तरी मला दोष देणार नाहीस.

पत्रकाराचं आयुष्य मेणवत्तीसारखं आहे. स्वतः जळून जगाला प्रकाश देणं हे त्याचं जीवनकार्य. निदान मी तरी तसं समजतो. वात संपली की नुसतं मेण उजेड देऊ शकत नाही. तत्त्वशून्य पत्रकारदेखील असाच. सत्व गेलं, हेतू नुरला की मग त्याच्या जगण्याला अर्थ नाही. त्यानं मरणंच योग्य. होय, आत्महत्त्या पाप वाटत नाही मला. पाप वाटतं निःसत्व, करंटेपणानं जगण्यात.

मी हरलो, पराभूत झालो. ठीक झालं ! माझा मगदूरच तितका होता. पत्रकाराला वज्राहून कठीण व्हावं लागतं. मी तर क्षुल्लक मातीचा माणूस. पोटच्या पोरावर वार करायला हात उचलला नाही. रक्ताची ओढ पाय मागं खेचू लागली. माझ्यातला पत्रकार सत्व गमावून बसला. तो तत्वच्युत झाला. तेव्हा मी मरणंच योग्य होतं.

And so I take my exit. मला खेद नाही. खन्त नाही. नाही, भ्रान्तसुद्धा नाही. मी शान्त आहे बेटा--अगदी शान्त आहे.

मला वाटतं, फक्त तूच हे समजू शकशील.

आणि माझा विश्वास आहे, जेथे मी पडलो तेथे तू उभा रहाशील. धुळीत पडलेला माझा क्रूस खांद्यावर घेऊन पुढं जाशील. दाखवून देशील जगाला की तात्याराव विजयकरांचा 'जनमत' भ्रष्ट झालेला नाही, कधी होणारही नाही. दुनियेतली कोणतीच शक्ती—सत्ता वा संपदा—त्याचं थोबाडं बंद करू शकत नाही. तो खरं तेच बोलणार, सत्य तेच लिहिणार.

बेटा, आताच तर तुझी खरी कसोटी आहे. तू वज्राचा घडला आहेस का मातीचा ते सिद्ध होणार आहे. परिस्थिती आव्हान ठोकून समोर उभी आहे. जा. सामोरा जा तिला !

तुला ठाऊक आहेच भांडारकर, सध्या एका मुक्या नि बहिऱ्या मुलीच्या नृत्याच्या कार्यक्रमाचं या मुंबईनं वेड घेतलं आहे. आपल्या खार सोशल क्लबनं पुढाकार घेतला नसता तर कदाचित या लोकांना इथं कोणी विचारलंही नसतं. दर्यापूरचा अण्णा रेड्डीकर आमचा जुना स्नेही. माणूस सच्चा गांधीवादी. तुझ्या ते परिचयाचे आहेतच म्हणा. मला वाटतं या अण्णानंच शब्द टाकला म्हणून तुला मी 'जन-मता'त ओढला. आयुष्यात हे एकच डिसिजन बरोबर घेतलं बघ. तर म्हणत होतो काय. . .हा अण्णा रेड्डीकर तीन महिन्यांपूर्वी असाच एकदिवस माझ्याकडे आला. बरोबर मुक्या पोरीच्या नाचाचा कार्यक्रम. समाजकार्य म्हणाला. मेला तरी हे समाजकार्य तो कधी टाकणार नाही. या मुलीच्या मेंदूवर अमेरिकेत का कुठं ऑपरेशन करायचं आहे म्हणाला. त्यानिमित्त हे जाहीर कार्यक्रम करून तो पैसा गोळा करीत होता. योजना स्तुत्य वाटली मला. आमच्या ह्या खारच्या क्लबला बोललो मी. पुढं तुलाच अधिक माहीत. या कार्यक्रमांना





अनुक्रमणिका

मुंबईत जी ही अफाट लोकप्रियता मिळाली तिचं श्रेय या पोरीच्या गुणांइतकं किंवा अधिकच तुझ्या मेहनतीला आहे. अण्णा रेड्डीकरानंच मला हे सांगितलं. तुझ्यामागं तुझे सहकारी वाह्यातपणानं नाही नाही ते वडवडत असत. अरे आमच्या मिशनंसुद्धा विचारलं होतं मला, "तात्या, तुमचा तो शहाणा भांडारकर त्या मुलीशी लग्न करणाराय म्हणे." मी सांगितलं होतं, "अग मिरा, म्हणूनच तो शहाणा. वायकोची पीटपीट ऐकावी लागणार नाही त्याला."

असो ! मुद्यावर येतो.

काल नाथ पालेकर माझ्याकडे आला. चलाख, पण महाभयंकर माणूस आहे. पक्का करीअरीस्ट. मग त्यासाठी वाटेल ते करील. अशा लोकांपासून शहाण्यानं शक्य तितकं दूर रहावं. ह्या पालेकराला मी वरोवर ओळखला होता. म्हणून तर ही पीडा लांव तिकडे सचिवालयात प्रसिद्धीखात्याकडे लावून दिली. कोणा मंत्र्याचा खाजगी सेक्रेटरी आहे म्हणून सांगतो. असेलसुद्धा. . . . तर काल संध्याकाळी स्वारी खाडखाड वूट वाजवीत रुवावात माझ्या केवीनमध्ये आली. झोकून आला होता की काय देव जाणे ! सिगरेटचा धूर सोडीत उर्मटपणं माझ्या टेवलाशी येऊन हा उभा राहिला. वोलला, "न्यूज ऑफ धि अिअर, तात्याराव. "मुद्दामच उपहासानं मी विचारलं, "तुझ्या त्या मंत्र्याच्या पाड्याला तिळविळं झालं का काय रे ?" पण हा विल्कुल फुल फॉर्मात होता. वेटा मोठ्यानं हसून म्हणाला, "या वातम्या दुसऱ्या पेपरांनी छापाव्या. 'जनमता'ला फक्त सोशल न्यूज हवी असते. मग तो कोणी वाचला नाही तरी चालेल ! तात्याराव, ही सोशल न्यूज कशी काय वाटते--सुप्रसिद्ध मुक्या नर्तिकेवर बलात्कार. वेहोशीतही थडायड वोलू लागली. दर्यापूरच्या अण्णाजी रेड्डीकराची वदमाशगिरी." मला रहावलं नाही. हात उगारून मी त्याच्या अंगावर आलो. "हलकट माणसा, जातोस का मुस्कटात हवी ?" पालेकर जागचा हालला नाही. तसाच उभा राहिला. सिगरेटची राख वोटानं त्यानं टेवलावर झाडली. मग सावकाश वोलला, "मुद्दाम आलो न्यूज घेऊन. म्हटलं आधी तुम्हाला सांगावी. हलकट मी नाही तात्याराव. मुक्या पोरीवर बलात्कार करणारा माणूस हलकट, पाजी वगैरे. आणि हा तुमच्या चांगल्याच परिचयाचा आहे. नाव सांगू ?" मी त्याला डिवचलं, "भांडारकर असेल !" तो नुसताच हसत सुटला. पंढरपूरच्या विठ्ठलासारखा कमरेवर हात घेऊन. मग त्यानं सांगितलं, "भांडारकर ? हट् ! तो तर साला वावळट नंवर एक. हा आहे माझा दोस्त आणि वरं का तुमचा चिरंजीव–चेतन विजयकर, आय. ए. एस. हाः हाः हाः"

ते सत्य होतं. विकट, विदारक, नग्न. पालेकरचा चेहेराच सांगत होता. अधिक पुराव्याची गरज नव्हती.

त्यानं तंवी दिली आहे, "जनमतावर माझी भक्ती. म्हणून तुम्हाला प्रथम वातमी देतोय. परवाच्या अंकात यायला हवी. नाहीतर वाकीच्या पेपरांना सांगावी लागेल. इतकी महत्त्वाची वातमी दडपून टाकणं मोठाच गुन्हा होईल."

यू हॅव्ह टु क्लिअर अप धिस मेस वॉय . . . .

पत्र पूर्ण वाचायलाही मी थांवलो नाही. घडी करून ते खिशात टाकलं.

मिराला म्हटलं, "क्षमा करा ! जायलाच हवं मला."

"पण--पण पत्र . . . . ." तिलाही सरळ विचारण्याचा धीर झाला नाही.

"आज नका विचारू ! नीट सांगता येणार नाही मला." मी सांगितलं.

आणि वाहेर पडलो.

दिवाणखान्यात चालू असलेले भजन वाहेर रस्त्यावर ऐकू येत होतं--

" जेथे जातो तेथे तू माझा सांगाती . . . . . .
चालविशी हाती धरूनिया . . . ." . . . .

[६]

तुकारामाचा हा अभंग अण्णा रेड्डीकरांचा भारी आवडता. हा एक आणि दुसरा 'मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास.'

हे आपल्या आयुष्याचं सार आहे असं ते गहीवरून सांगत. यात प्रौढी नसायची, फुशारकी नसायची. चेहरा कोवळ्या उन्हानं सोन्यात निथळणाऱ्या आम्रवृक्षासारखा मनस्वी प्रसन्न दिसायचा.

रोज रामप्रहरी आपल्या पहाडी आवाजात हे दोन अभंग आळवून अण्णा गात वसले की आश्रमाला आपोआप जाग यायची.

शरीरातील माणसाला उठवण्याचं विलक्षण सामर्थ्य त्या आवाजात होतं. अनुभवाशिवाय पटणार नाही कोणाला.

मला अनुभव होता.

दोन वर्षं माझ्यातील या माणसाची वाट लावण्याच्या उद्योगात मी दंग होतो. जसा हा एकच वैरी आता उरला होता. शहाणा असता तर निमूट वसता. पण हा अति शहाणा. नसत्या विचारांनी डोकं खायचा. नको त्या आठवणींनी मन अस्वस्थ करायचा. परोपरीनं समजावलं की, 'वावारे, आपण एकाकी--एकटे आहोत. आपल्या आयुष्यात आता फक्त हा चालू वर्तमानकाळ. भूत आणि भविष्याचं झेंगट तुटलं.' व्यर्थ ! हा आणिकच पिसाळला. मलाच गिळायला वघू लागला.

मी म्हटलं, "मर लेका !"

मी काय केलं. शर्टाची लंगोटीपुरती चिंधी फाडली. वाकी कपड्यांची होळी पेटवली. कमरेला लंगोटी. अंगाला राख.

कटकट मिटली.

निजेला कुठंही धोंडा मिळे. भुकेला कोणीही कोंडा टाकी. पायाखाली मळलेल्या वाटाना तोटा नव्हता.

माझी भटकन्ती चालली होती.

आता प्रश्न नव्हते. उत्तरं नव्हती. कोठून आलो माहीत नव्हतं. कुठं चाललो ठाऊक नव्हतं. वाट फुटेल तिकडे जायचो. पाय थकले की थांवायचो. एकण

अनुक्रमणिका

बेफाम, बेबंद, बेछुट ! भय नव्हतं, शंका नव्हती, फिकीर नव्हती. माझ्यातील माणसाच्या नाकात भली वेसण पडली होती. लेकाचा चालचाल चालत होता. उरीपोटी धापा टाकत पडत होता.

मग असाच एक दिवस.

वाटेतील ओढयाच्या खळखळत्या पाण्यात देहभान हरवून मी बसलो होतो.

मागून प्रश्न आला, "पाण्यात काय बघतोस बेटा ?"

मी मागं पाहिलं.

चांगला उंच, धिप्पाड पुरुष माझ्याकडे कौतुकानं बघत उभा होता. वय पन्नाशीच्या पुढं. चेहरा राकट, चौरस. डोळयांना चांदीच्या काडयांचा चष्मा. खादीचं खमीस, धोतर नि टोपी. खाकेला भक्कम धोपटी.

मी हसून हात उडवले, "ओढयाचं पाणी. नुसतं वहातंय. कुठं ठाऊक नाही."

"काळजी नको करूस. पाण्याला ठाऊक असतं आपण कुठं चाललोय." म्हातारा बोलला, "समुद्राकडे. माणूस पण तिकडेच जायचा."

या वाक्याची मला गंमत वाटली. मी चेष्टेनं म्हटलं, "म्हणूनच समुद्राचं पाणी खारट असावं ! माणसाच्या डोळया-तल्या पाण्यानं झालंय."

मला वाटलं होतं हा किंचित् गांग्री भडकेल. निमूट आपल्या वाटेला लागेल.





अनुक्रमणिका

पण नाही. ओढ्याच्या पाण्यासारखंच एक खळखळतं हास्य उठवित त्यानं माझ्या शेजारी आसन ठोकलं. तो म्हणाला, "मला काय वाटतं सांगू ?"

त्याच्या खोल, खर्जातल्या आवाजानं मी मात्र जरा हललो. "काय?"

'तुझ्या डोळ्यातील पाण्याला वाट मिळती ना बेटा, तर या ओढ्यासारखंच ते खळखळत धावलं असतं.'

'डोळ्यात पाणी यायला माणसाला दुःख व्हावं लागतं.' मी उसळून बोललो, "दुसऱ्याबद्दल नाहीच, पण माझ्या-बद्दलही मला वाईट वाटेनासे झालंय."

'खोटं.'

'मी कशाला खोटं बोलू ?' मी निकरावर येऊन विचारलं.

त्यानं दोनच शब्दांत मला लोळवलं, "फसवण्यासाठी. स्वतःलाच."

मला आवर नाही राहिला, 'माझा मलाच फसवतोय ना ? मग तुमचं काय जातं हो ?'

'माझं काय जातं ?' त्याचा आवाज चढला.

तो उठला. खाडकन त्यानं माझ्या मुस्कटात ठेवून दिली.

माझं डोकं झिणझिणलं. डोळ्यापुढं सूर्याची पिलं गोळा झाली.

क्षणभरच—




आणि त्वेषानं मी हाताच्या मुठी वळवल्या.

पण हा पुढ्यातच उभा होता. तयारीत. त्याला तसा बघून माझ्या मुठी सैल पडल्या. मान खाली गेली.

तशी त्यानं माझी गचांडी धरली. म्हटलं, 'लाथ बसली तर कुत्रंसुद्धा वस्कन चावा घेतं रे! तरणाबांड जवान तू. शेपूट घालतोस ? ये, पुढं ये !'

मी नकारार्थी मान हालवली.

तो अधिकच चवताळला, 'नालायक, नादान––'

उद्वेगानं त्यानं मला दूर लोटून दिलं, 'आईवडिलांना काळिमा आहेस, कलंक आहेस.'

आणि मला रडू कोसळलं. लाजलज्जा विसरून मी रडू लागलो. कधी नाही तो ओक्साबोक्शी रडत सुटलो.

'रडू नकोस बेटा !'

होय ! हेही शब्द त्या दांडगट माणसाच्या तोंडातूनच निघत होते. माझ्या पाठीवरून त्याचा मायेचा हात फिरत होता.

'मला तितकंच करता येतंय !' मी हुंदके देत म्हटलं, 'मरायचंही धैर्य नाही माझ्यात.'

'मरायला काय झालं ?' त्यानं उसावून विचारलं.

'मरायचंय, मला मरायचंय ! जगायची ही सक्ती माझ्यावर का म्हणून ? कशासाठी ? कोणासाठी ?'

त्यानं उत्तर दिलं नाही. उलट प्रश्न केला, 'कोणीच नाही होय तुला ?'

'नाही. मी सुद्धा माझा नाही राहिलोय ?' मी जाब केला.

'बाबारे, ज्याल्या कोणी नाही त्याला भगवन्त आहे.' गांधीजींचा तो सच्चा चेला बोलला, 'त्याच्यावर श्रद्धा ठेव. खात्री बाळग. आता उठ. माझ्याबरोबर चल.'

'कुठं ?' मी विचारलं.

'त्याला प्रश्न करू नयेत. कारण उत्तर द्यायला आपल्या-सारखा तो बेकार नाही. जगन्नाथ तो, जगन्नियंता. उभ्या विश्वाचा प्रपंच संभाळायचा असतो त्याला.'

आणि तिथंच ओढ्याच्या काठावर, वहात्या पाण्याच्या खळखळ तालात म्हाताऱ्याला जिवाशिवाचा सूर सांपडला. त्याचा आवाज लागला––

जेथे जातो तेथे तूं माझा सांगाती ......

असे हे अण्णाजी रेड्डीकर.

यांच्या आश्रमात मी तीन वर्षं होतो.

ही वर्षं कशी भुर्कन उडाली होती ! चिमण्यांसारखी. बघता बघता केव्हा गेली कळलंच नाही.

सांगायला दर्यापूर. खुद्द शहरापासून अण्णाजी रेड्डीकरांचा हा आश्रम चांगला तीस पस्तीस मैल आत भर डोंगरातील आदिवासी वस्तीमध्ये होता. सरळ रस्ता नव्हताच. माणसाला दोन पायांवरच मदार टाकावी लागे.

अनुक्रमणिका








हे दोन पाय आणि हात समर्थ असतील तरच इथं निभाव होता.

पहिल्याच दिवशी मला हे समजलं. दुसऱ्या कोणी नाही-- या रैनानं शिकवलं.

अण्णाजींची ही पाळलेली लेक. कुठं रानात सापडली त्यांना. एकटीच. वासरासारखी चरत होती म्हणे. हातपाय जमिनीला टेकून आणि मान पुढं नि पुढं लांबवीत. अण्णाजींना बघवेना. भडभडून आलं. त्यांनी हिला म्हटलं, 'मी खायला देतो. आश्रमात चल.' तर ही धूम पळत सुटली. म्हाताऱ्यानं तिला पकडलं. तेव्हा हिनं जंगली प्राण्यासारखा प्रतिकार केला. ओरबाडली, चावली-काय नि काय! आवरता आवरत नव्हती. चांगल्या मुसक्या बांधून त्यांनी रैनाला आश्रमात आणलं. वरी माणसाळेपर्यंत कोंडून ठेवली. ठार मुकी नि बहिरी. पण म्हणून पोरीनं काही कधी त्रास दिला नव्हता! दोन वर्षांनंतर आताच कुठं पोरटी नीट माणसात येत होती.

आम्ही आलो त्या दिवशी काय झालं? कळलं मात्र आणि लगबग धावत बाहेर आली. कुत्र्यासारख्या उड्या मारीत ती अण्णाजींना बिलगली. मिठ्या मारीत सुटली. हुंगफुंगू लागली. ते बरे आहेत अशी खात्री करून घेतली नि मग ती सावचित्त त्यांच्या पायाशी बसून राहिली. डोळे सताड उघडे. दृष्टी फक्त अण्णाजींकडेच.

म्हणजे मोठीच गंमत होती. मी हंसून म्हटलं 'हा कुत्रा बरा मिळालाय्!'

रैना कानांनी बहिरी खरी. पण डोळ्यांनी हिला बोललेलंही ऐकू येत होतं की काय देव जाणे! माझ्या तोंडून वाक्य गेलं मात्र आणि फुटाण्यासारखी ती उडाली. सरळ माझ्या अंगाला झोंबली. तोंड उघडं, जीभ बाहेर, वसवसलेली. डोळ्यात चीड, त्वेष-मी हात धरले. तशी रैना लाथा झाडू लागली. शिव्याही दिल्या असत्या. पण ही मुकी.

अण्णाजींनी हाताला धरून हिला बाजूला केली. जरा कौतुकानंच म्हटलं, 'ये बये, अग भाऊ आहे हा तुझा.'

तिला हेसुद्धा बरोबर समजलं. कारण हिच्या डोळ्यात दोन चंद्र उगवले. दृष्टी तेजात थबथबली. पापण्या लवलवू लागल्या. चेहरा उमाळ्यानं फुलला. ती खुदकन हसली. फुलासारखी तनमन उघडून. अल्लद माझ्या पाठीशी आली. फक्त बहीणच भावाला अशी बिलगते.

सगळेच हसले. अण्णाजी तर कितीतरी मोठ्याने हात उडवीत ते बोलले, "अग हट बाजूला! तुला काळुंद्रीला हा गोरा भाऊ नाही शोभत."

रैनाला आपल्या भावाचं काय कौतुक झालं होतं? आजुबाजूची सारी झाडंझुडपं धुंडाळून हरतऱ्हेची फुलं ही गोळा करायची. त्या माळा माझ्या माथ्याला नि दंडाला बांधायची. डोंगरात भटकून नाना प्रकारची फळं ओटीत घालून आणायची नि मला खाऊ

घालायची. एकदा तर पोरटीनं काय केलं? रानातील झाडावरचं मधाचं पोळंच तोडून आणलं. मधमाशा अंगाला सगळीकडे डसल्या होत्या. पण तिला पत्ताच नव्हता. मधाचं पोळं माझ्या पुढ्यात टाकलं आणि ती पावन झाली. माझ्याकडे बघत असुख हसली. दोन्ही हातांनी आता अंग चोळत उसासत बसली.

अण्णाजी ओरडले, "नशीब पोरी म्हणून डोळे राहिले. माझ्या डसल्या तर तेही आणखी घालवून मोकळी झाली असतीस."

आश्रमातील इतर आदिवासी पोरं हिला खूप चिडवीत, "हिला मुक्कीला गोराच भाऊ मिळणार!"

रैना त्यांच्यावर जाम रागवायची. हाताला लागेल ते उचलून हाणायची. केस ओढत नि डोळे चोळत बसायची. कारण हिच्याच मनात कुठं तरी टोचत असावं.

हजारो वर्षं जगाच्या मागं असलेल्या या आदिवासी लोकांच्या सेवेसाठी आण्णाजींनी हा आश्रम काढला होता. गांधीजींच्या पायावर हात ठेवून शपथ घेतली होती म्हणे. आज दोन तपं लोटली. सगळीकडे सगळं होत्याचं नव्हतं झालं होतं. एक अण्णाजी मात्र गांधीजींचे ते पाय विसरले नव्हते. ती शपथही विसरले नव्हते.

**'आका ऽऽऽश्वाणी' : बातमीपत्र!**



**... काल पंतप्रधानांच्या निवासस्थानासमोर ५००० जनसंघीयांच्या लहानशा गटाने केलेल्या निदर्शनांबद्दल पंतप्रधानांनी ५० लोकांच्या प्रचंड सभेत बोलतांना निषेध केला, त्या म्हणाल्या...**

आश्रमात आदिवासींची एक शाळा होती. तरी चाळीस पोरं शिकत होती. नुसतं पुस्तकीच शिक्षण नाही. कामधंद्याचंही शिक्षण मिळे या शाळेत. "माझ्या शाळेत शिक्षण घेऊन माझी किती मुलं बाहेर पडली असतील?" अण्णाजींचं हे आवडतं गणित होतं. कधी उत्तर सांगत नसत. सांगण्यासारखंही नसेल. कारण वरीचशी पोरं मध्यंत्र कंटाळून पळ काढीत. अखेरपर्यंत टिकणारी थोडीच.

कारण जंगलची पाखरं ही. घरदाराचंही बंधन त्यांना नव्हतं. पावसापुरतं एखादं खोपट उभं करीत. थंडी आली की तेच मोडून शेकोटी पेटवीत. कसे जगत? त्यांचं त्यांनाच ठाऊक! विचारलं तर नुसतेच हसत. त्यातल्या त्यात एकच उद्योग ही लोकं करीत. शिकार. पशू पक्षी मारीत, चोरीमारी करीत. शिकार बरी झाली तो दिवस ह्यांची दिवाळी. नाहीतर वर्षभर एकादशी. कंदमुळं खात. पालापाचोळा भकत. उघड्या देहाची त्यांना लाज नव्हती. त्यांच्या घराला आभाळाचं छप्पर होतं. चांदण्याच्या नवलाख पणत्या होता.

अण्णाजीच एक दिवस आदिवासींच्या उठावाची बातमी घेऊन आले.

कुठं बाहेर गेले होते ते दुपारलाच धापा टाकीत आले होते. आपल्या खोलीत गांधींच्या फोटोसमोर जाऊन उभे राहिले. जड अंतःकरणाने म्हणाले, "होय बापूजी, कसोटीचा क्षण आलाय!"

आजुबाजूच्या गावात आदिवासींनी दंगली, लुटालूट नि जाळपोळी चालू केल्या असून ठिकठिकाणी पोलीसांच्या लॉऱ्या बंदोबस्तासाठी रवाना झाल्या आहेत असं त्यांनीच मला सांगितलं.

त्यांना वाईट वाटलं होतं. उद्विग्न मनानं ते म्हणाले, "रवी, आपल्यावर विश्वास नाही दिसत या लोकांचा."

"तुम्ही तर स्वतःला त्यांच्यासाठी वाहून घतलंयत."

"खरं. पण त्यांचं प्रेम मिळविता नाही आलं मला. त्यांना मी परकाच वाटतो."

आल्यापावलानंच मग पायात वहाणा चढवून ते डोंगरात निघाले. बरोबर येतो म्हणून सांगितलं तर हात उडवून माझ्या एकदम अंगावर उसळले.

रात्र झाली तरी यांचा कुठं पत्ताच नव्हता. आश्रमात सगळ्यांना काळजी पडली. एक एक आदिवासी पोर ह्यांना शोधायला डोंगराकडे धावू लागला. अण्णाजींना घेऊन परत मात्र कोणीच येत नव्हता. आम्ही आपले कासावीस होऊन वाट बघत बसलो होतो.

मशाली पेटवून आरडाओरडा करीत जेवणाच्या वेळेला ही मंडळी आश्रमात परतली.

अण्णाजी आधी धावले गांधींच्या फोटोकडे. या फोटोशीच वाद घालीत बसले, "आता बोला बापूजी! असं नुसतं हसून भागायचं नाही. माझ्या परिस्थितीत तुम्ही काय केलं असतं?

कोणाची बाजू घेतली असती ? माझ्या आदिवासींची का त्या सरकारची ? अहो, दुष्काळ पडलाय रानात. उपाशी मरतायत ह्यांची पोरंढोरं, आयाबहिणी, हे स्वतः ! पोटासाठी जगावर उठलेयत हे ! त्यांच्यासाठी सरकार काहीच करीत नाही म्हणून भडकलयत. आणि सरकार त्यांच्या पोटाला देण्याऐवजी जीवावरच उठलंय ! कळलं का हसताहात ! तुमचं हे हसणंच भारी बोलकं आहे बापूजी. होय ! तुम्ही स्वतंत्र केलंत आम्हाला. आमची जबाबदारी आता आम्हीच घ्यायला हवी ! काय ते निर्णय आमचे आम्हीच घ्यायला हवेत ! खरं आहे बापूजी, तुमचं म्हणणं खरं आहे."

अण्णाजींनी हे असं चालवलं होतं.

त्यांना मी साद घातली. विचारलं, "काय झालं अण्णा ?"

"काही झालं नाही बेटा ! आदिवासींची काही चूक नाही. चूक आपली आहे. उद्यापासून शान्तिपथक सुरू करूया. दुसरं नाहीच, निदान या दंगलीत मरणाऱ्या नि जखमी होणाऱ्या लोकांची तरी घडेल ती सेवा करूया !" त्यांनी वैतागानं म्हटलं.

आणि आश्रमात पडलेल्या 'फर्स्ट एड'च्या पेटया घेऊन आदिवासींची पोरं डोंगरातून फिरू लागली. अण्णाजी रेड्डीकरांचे हे शान्तिपथक आजुबाजूच्या गावांतून दंगलीच्या आणि पोलिसांच्या अत्याचाराच्या बातम्या कानावर आल्या की धावपळ करू लागलं. घायाळ लोकांच्या जखमा बांधू लागलं. कामी आलेल्या माणसांना उचलून घरी पोचवू लागलं. कोणी मरत असला तर त्याच्या तोंडात अन्तकाळी पाणी घालू लागलं. ही पोरं तहान नाही, भूक नाही, उन्हातान्हातून वणवण फिरू लागली. प्रसंगी पोलिसांचा प्रसाद मिळायचा. तो मुकाट खात. उघडया डोळ्यांनी आपल्याच लोकांची होत असलेली ही कत्तल बघत.

मग चार दिवसांनी आमच्याच गावावर आदिवासींचा हल्ला झाला. उजाडलं नाही तोच समोरचा डोंगर गजबजू लागला. भाले नि तिरकामठे घेऊन चारी बाजूंनी गावाच्या दिशेनं लोकं उतरू लागली. तसे पोलिसांनी मोर्चे बांधले. बंदुका सरसावून तळ ठोकले. म्हणता म्हणता धुमश्चक्री सुरू झाली निकराची. मारण्यासाठी, मरण्यासाठी.

वर माथ्यावर कावळी नि गिधाडं घिरटया घालू लागली. तूर्त त्यांची चैन चालू होती. त्यांच्या 'कॅऽकॅऽऽ' कर्कश ओरडण्यानं गाव नि आजुबाजूचं रान उठू लागलं. लोकांनाच ती जशी आवाहन करीत होती, "या, लेको या ! भराभर, झटपट या ! एकमेकांना मारा किंवा मरा ! आमची भूक भागत नाही." कावळ्या–गिधाडांना घाई झाली होती. नाही तरी देवाच्या दयेने त्यांचेच दिवस आले होते.

आणि जणू काही त्यांचं हे आवाहन मानूनच माणसं त्वेषानं एकमेकांवर तुटून पडत होती. बंदुका नि तिरकामठ, संगिनी नि भाले. अखेर हातघाईला हाती लागेल ते चाकू, कुऱ्हाडी,

★ ★ ★ ★



★ ★ ★ ★

काठ्या नि दगड ! लोकं लढत होती, झगडत होती. मारत होती, मरत होती. शांत पडत फक्त मुडदे. जखमी माणसं कण्हत, विव्हळत.

दुपारपर्यंत ही वावटळ चाललीच होती. गावात दुकानं दोनच. आदिवासींनी ती साफ केली. आगी लावून दिल्या. चार-पांच शेतकऱ्यांच्याही घरात लूटमार करून दाणागोटा पळवला. मग आले तसेच धूमधाम उडवीत जंगलचे हे राजे परत फिरले.

मागं मुडद्यांवर कावळीगिधाडी चरू लागली. जखमी जर्जरांना पोलीस संगिनींनी भोसकू लागले.

आता अण्णाजींचे शान्तिपथक पुढं झालं. जिवावर उदार होऊन वावरू लागलं.

पोलिसांशी अण्णाजी तंटूताणू लागले, "अरे जिवन्त आहेत ते. त्यांना भोसकून का ठार मारता ? नरकात जाल !"

पोलिसांना नरकाची पर्वा नव्हती. हुकूम महत्त्वाचा. त्यांचीही लोकं मरत होती. तोही सूड होताच.

"म्हाताऱ्या, गप्प बसतोस का तुझीही वाट लावू ?" पोलीस सार्जंन्ट त्यांच्यावर ओरडला.

अण्णाजींनी देवाला आळवलं, "नारायणा, ह्यांना सद्‌गती दे ! दोष त्यांचा नाही. आमचा. आम्हांला मात्र कधीच क्षमा करू नकोस."

कॅमेरानं मी फोटो घेत होतो. तर सार्जन्टचं माझ्याकडे लक्ष गेलं. तो माझा कॅमेरा हिसकू लागला. कोणाच्या परवानगीनं फोटो घेतोस म्हणून विचारू लागला. तुरुंगाची तंबी देऊ लागला.

मी सांगितलं, "दंगलीचे फोटो घ्यायला बंदी घातलीय सरकारनं ? हुकूम दाखवा. आणि समजा असली तरी मी ती मोडणार. तुम्ही हे जे काय चालवलं आहे ते वेशीवर मांडणं मी माझं कर्तव्य मानतो. तुरुंगाचं भय कोणाला घालता ? हिंमत असेल तर हात लावून बघा नुसता ! तुम्हालाच नाही, तुमच्या सरकारलाही जड जाईल !"

असा उगाच आवाज चढवला. पण बरोबर काम झालं. पोलीस सार्जन्ट बडबडत बाजूला निघून गेला. हाताखालच्या पोलिसांना ह्यानं काय सांगितलं असेल ते असो ! पण दंगलीत जखमी झालेल्यांची त्यांनी जी लांडगेतोड चालवली होती ती मात्र थांबली.

पोलीसपार्टी दुसरीकडे निघून गेली तशी आजूबाजूला झाडाझुडुपात दबा धरून बसलेली आदिवासी बायकापोरं उघडे ऊर बडवीत पुढं धावली. ह्यांच्या कमरेलासुद्धा पुरेसं वस्त्र नव्हतं. सगळीच माणसं त्यांची. प्रेत दिसलं की धाय मोकलून ही रडत बसत. जखमा बांधण्यासाठी कमरेचं एकुलतं एक फडकं फाडत. शान्तीपथकाची पोरं मलमपट्टी वगैरे कामात मदत करीत होती.

तर माझ्या कॅमेऱ्याला हे चांगलं काम मिळालं होतं. दुसरीकडे कुठं लक्ष द्यायलाही सवड नव्हतो.

अशात रैनानं माझा हात ओढला. तिचा चेहरा अतीव तृप्तीनं नुसता सुखावला होता. अंगावर परकर नि पोलकं. तिचं पातळ कोणीतरी फेडून घेतलं होतं.

"अग, पातळ कुठंय तुझं ?" मी ओरडलो.

तिनं समोर बोट दाखवलं.

एक आदिवासी तरुण अखेरचे क्षण मोजत होता. अण्णाजींच्या आश्रमातून शिकून बाहेर पडलेला असावा. कारण अण्णाजींच्या मांडीवर त्याचं डोकं होतं. बाजूला एक म्हातारी त्याच्या तोंडावरच्या माशा हाकत बसली होती. आई असावी. लेकाच्या तोंडाशी तोंड नेऊन पुढील जन्मीसुद्धा आपल्याच पोटी जन्म घेण्याची त्याला आण घालीत होती. बाजूला दोन वहिणी भावाच्या छातीला बांधलेल्या फडक्यासाठी झगडत होत्या. कदाचित एकजण त्या तरुणाची प्रेयसीही असेल. आणि त्या फडक्यासाठी त्या एकमेकावर तुटून पडत होत्या ते रैनाच्या पातळाचं होतं.

मला वाटतं मृत्यू ह्या लोकांच्या खूप परिचयाचा होता. लांबच्या प्रवासाला निघालेल्या माणसाला निरोप देताना आपल्याला जितकं वाईट वाटतं, तितकंच घरातला कोणी मरू लागला की ह्यांना वाटायचं. अधिक नाही.

काही वेळानं त्या तरुणाचा प्राण गेला. अण्णाजींनी नाडी पाहिली. आणि ते पुटपुटले, "नारायणा, तुझी इच्छा !"

म्हातारी आई आणि दोन्ही वहिणी आता आक्रोश करू लागल्या. तोही ह्यांच्यात एक पद्धत होती.

या उठावावरचे माझे दोन लेख अण्णाजी रेड्डीकरांनी मुंबईच्या 'जनमता'च्या संपादकांकडे पाठवले. बरोबरच डझनभर फोटो.

ते प्रसिद्ध झाले. आणि मग मुंबईहून निरनिराळ्या वर्तमानपत्रांच्या खास प्रतिनिधींनी अण्णाजींचं हे गांव गाठलं. खुद्द 'जनमतां'चे संपादक तात्याराव विजयकरच या मंडळीला घेऊन आले.

तात्यारावांनी तर माझं भलतंच कौतुक केलं. पाठीवरून हात फिरवून म्हटलं, "वेस्ट ! एकदम ए वन ! असा तटस्थ निर्विकार रिपोर्ट तू लिहिला असशील हे पटतच नाही. वयानं नसलास तरी मनानं म्हातारा झालायस बेटा तू !"

तात्याराव माझं कौतुक करायलाच आले होते. दुसऱ्या दिवशी ते मुंबईला परतले.

बाकीचे पत्रकार मात्र मला शिव्या देऊ लागले, "यू बूट ! या साल्या मराठी पत्रकारानं आम्हालासुद्धा टोपी घातली."

मी म्हणायचो, "मी पत्रकार नाही."

ते म्हणत, "बच्चा, आमची जात आम्ही ओळखतो."

या पत्रकारांना बघून अण्णाजी रेड्डीकरांची तबियत एकदम खूष ! आश्रमातच त्यांनी ह्यांची व्यवस्था केली. त्यांना घेऊन आदिवासींच्या वस्तीत आता ते अधिक मोकळेपणानं भटकू लागले.

अनुक्रमणिका







पुढं काय करायचं, हा प्रश्न त्यांना मुळी उरलाच नव्हता. पत्रकारांना काही सांगायला नकोच. सुतानं सरळ स्वर्गाला जाणारी जात ही. दोनच दिवसात उठावाच्या बातमीनं उभा देश त्यांनी दणाणून टाकला.

मला मात्र फुकट ताप होत होता. ह्या रैनाची काळजी पडली होती. जिवाला नसली तरी बाकी हिला खूप धोका संभवत होता.

आता चौदा वर्षांच्या या पोरीमध्ये असं काय खास होतं मला तरी कळत नव्हतं. माणसासारखं माणूस. आश्रमात राहिल्यानं आणि अण्णाजींच्या लाडामुळं म्हणा ती जरा जादा होती इतकंच. म्हणजे काय? नको तिकडे धावेल. उगाच हसेल, लचकेल, मुरकेल. एखाद्याला खोटंच काही नाही ते वाटावं. तशात ही मुकी. स्वतः बोलू शकत नव्हती. दुसरं कोणी बोललं तर ऐकू शकत नव्हती. म्हणून गैरसमज होण्याची शक्यता होती.

'फरी प्रेस'चा कोण तो अय्यर पहिल्याच दिवशी तिला बघून मिटक्या मारू लागला. "अयोयो! व्हाट अ ब्युटी!"

ह्याला मी बजावलं, "हॅन्डस् ऑफ हर! माझी ती बहीण आहे."

"इम्पॉसिबल! तू गोरा. ही माझ्यासारखी डार्क." अय्यरनं शंका घेतली.

माझी ती मानलेली बहीण असल्याचं सांगून अय्यरचा आवाज मी बंद केला.

"ओ, आय सी!" तो पुटपुटला, "ओळख तरी करून दे."

"कशी देऊ? ती मुकी आहे." मी म्हटलं.

त्याचं समाधान झालं की नाही कुणाला ठाऊक! पण हा मद्रासी आयुष्यात प्रथमच दुसऱ्याबद्दल हळहळला होता.

दोष ह्यांचा नव्हता. रैनामध्येच तसं काहीतरी असलं पाहिजे. हिला पाहिलं की प्रत्येकाच्याच डोळ्यात ठिणगी उडे. त्याच्या दृष्टीची पाखरं थिजून स्थिरावत. मग हा आपलं वय, दर्जा, संस्कार . . . सगळं सगळं विसरून एखाद्या जनावरासारखा हिच्यामागं गोंडा घोळू लागे. . . आश्रमात आलेला एकएक पत्रकार असा तिच्यासाठी पाघळू लागला. ती मुकी आहे हे कळताच मात्र तो वाकडं तोंड करी. म्हणे, "हिच्यावर चांगलं लक्ष ठेवायला हवं. कोण कधी फसवील सांगता येणार नाही. माणसाला पशू करण्याची जादू तिच्यात आहे."

आमच्या आश्रमावरच आदिवासींनी एक रात्र हल्ला केला. पाचपंधराच होते. फाटकावरून ओरडले, "आश्रम लुटायला नाही आलो अण्णा."

अण्णाजी बोलले, "तोही लुटा...मचाच आहे."

"छा:! बाकी काही सांगा. आमची पोरं फक्त वापस द्या." त्यांनी सांगितलं.

"आं!"

"बरीच पोरं कामी आली दंगलीत. तेव्हा अडचण आहे."

अण्णाजींनी डोळे मिटले, "जा घेऊन. पण येतील त्यांनाच हो!"

## शिक्षणाचे धिरडे

[राजकीय दिवाळे वाजण्यापूर्वी]

**साहित्य :– विद्यापीठ; चरखा छाप रीफाईण्ड तेल. बुद्धिवादी डोक्यातील कांदा :**

**कृती :– जे मिळेल ते विद्यापीठ घ्यावे. आंबटपणासाठी एखाद्या राजकारणी आंबटशौकीनाच्या हस्ते ते भिजवावे. अगदी सरसरीत झाले की त्यात वरील साहित्यात दाखवलेला कांदा ठेचून घालावा. लक्षात आल्यास कणभर तिखट-मीठ टाकावे. नंतर तापल्या तव्यावर रीफाईण्ड तेल चोळून, धिरडी तयार करावीत.**

**अशी खरपूस धिरडी पचवून बेकारीचाही खरपूस समाचार घेण्याची पात्रता, अंगी आल्याचा आवेश चढतो.**

ते आश्रमात शिरले नाहीत तोच मागोमाग पोलिसांची ट्रक आली. ह्यांना कसा पत्ता लागला देवास ठाऊक!

अण्णाजींनी लाजभीड सोडून मोठ्यानं बोंब ठोकली, "पोलीस, पळा. पळा––"

आश्रमात एकच गोंधळ. पळापळ. काळोखात पोलिसांची धावपळ. बेछुट गोळीबार.

आदिवासी कुठच्या कुठं गडप झाले. पोलीस हात चोळीत परत फिरले.

त्यांचा सार्जंट अण्णाजींवर गुरगुरला, "तुमच्यामळं ह्यांचा पुढारी निसटला. आता तुम्हालाच गोळी घालतो."

"खुशाल! माझा त्रास तरी वाचेल. तुमच्यावर खटला भरण्याचा." अण्णाजी म्हणाले.

रैनानं हाताला धरून स्वयंपाकघरात मला ओढत नेलं. अण्णाजी होतेच.

वर माळ्याकडे बोट दाखवून ते हसून म्हणाले, "आमच्या ह्या लेकीचा पराक्रम कळला?"

"कसला पराक्रम?"

"एका आदिवासीला आश्रय दिलाय गाढवीनं. पायातून गोळी गेलीय ह्याच्या. बाहेर न्यायची सोय नव्हती. तेव्हा मीच केलं ऑपरेशन. वस्तऱ्यानं. बेचाळीसच्या चळवळीतलं ट्रेनिंग उपयोगी आलं. पण हा माणूससुद्धा पक्का बेडर हो. काय वेदना झाल्या असतील देव जाणे! पण ह्यानं हूं की चूं केलं नाही. . ." अण्णाजीनी सांगितलं.

**माळ्यावर चढून या माणसाला मी पाहिलं.**

**[पान १२६ वर पहा]**

अनुक्रमणिका

वासवदत्ता स्वप्नसुंदरी प्रत्यक्षच की झाली
वत्सनृपाची भावमंदिर या भासे मति मोहरली

भासकृत

**स्वप्न वासवदत्ता**

दीपावली
'७०

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका




रणजित देसाई

रीगल सिनेमागृहाच्या द्वाराशी जमलेल्या गर्दीतून वाट काढीत मी कसावसा बाहेर आलो. उन्हाळ्याचे दिवस. सिनेमागृहातून बाहेर येताच मुंबईचा उकाडा परत जाणवू लागला. साडेसहाच्या खेळासाठी गर्दी करून उभ्या असलेल्या मेळाव्याकडे मी पहात होतो. जेम्स बाँडचा तो सिनेमा मला मोठा भयानक वाटला होता. त्या अर्धनग्न तरुणी, ते मादक प्रणय, धाडसी जेम्स, विमाने, हेलिकॉप्टर, मशिनगन्स, मारामारी, टॉरपेडो. काय नाही? या जेम्स बाँडला येवढ्या अर्धनग्न तरुणी मिळतात तरी कुठून? सारा मसाला ठासून भरला होता. काय घडतं याचा विचार करायलाही उसंत मिळत नव्हती. एकामागोमाग जीव घेणाऱ्या घटना घडत होत्या. असले सिनेमे लोक कसे पहातात!

माझी नजर परत त्या गर्दीकडे वळली. त्या गर्दीत बहुतेक कॉलेज तरुण–तरुणींचा भरणा होता. नाना रंगाचे कपडे केलेले ते तरुण–तरुणी. त्यांच्या चेहऱ्यावरचा उसळणारा आनंद. हा सिनेमा त्यांच्याकरिता होता. त्यांच्या वयाला आणि मनाला साजेल असा. जीवनातला तो टप्पा ओलांडल्याचं प्रथमच जाणवलं.

मी सिनेमागृहाच्या बाहेर आलो. घड्याळ पाहिलं. सव्वासहा वाजून गेले होते. रस्त्यावरून टॅक्सी फिरत होत्या. वाटलं एखादी थांबवावी. परत घड्याळाकडे लक्ष गेलं. नऊ वाजताची मित्राची अपॉइंटमेंट होती. साडेआठची लोकल गाठून गेलं तर चालण्याजोगे होते. दोन तासांचा अवधी होता. टॅक्सीचा विचार मी मनातून काढून टाकला.

मी रस्त्याकडे पाहिलं. समोर म्युझियमची इमारत दिसत होती. मधल्या चौकातल्या वर्तुळाला वळसा घालून धावणाऱ्या गाड्या दिसत होत्या. वर्दळ खूप कमी झाली होती. गाड्या चुकवत ते वर्तुळ ओलांडलं. फूटपाथवर जाऊन उभा राहिलो. सिनेमागृहावरची पोष्टर्स नजरेत भरत होती. सिनेमा आवडला नाही तरी नांव आवडले होते. त्याचमुळे काळ्या बाजारने तिकीट घेऊन मॅटिनीला गेलो होतो. सिनेमाचं नाव होतं You Never Live Twice. खरंच! माणसाला परत जगता



अनुक्रमणिका

आलं तर केवढा बदल त्याच्यात घडेल !

मी सिगरेट पेटवली. तिचा आस्वाद घेत मी समोर पहात होतो. बस-स्टॉपवरची गर्दी कमी झाली होती. बस-स्टॉपवर येऊन उभी राहिलेली बस आपले ओझे वाढवून खणखणत निघून गेली. तरीही त्या स्टॉप-वर दोन तीन व्यक्ती उभ्या होत्या. त्यांच्या मुक्कामाची बस अजून यायची होती. ते तेथेच उभे होते. प्रतिक्षा म्हणतात ती तीच असावी.

म्युझियमचे प्रवेशद्वार उघडे होते. तिथले चणेवाले, पाणीपुरी, भेळवाले केव्हाच उठून गेले होते. कागदाचे बोळे विस्कटले होते. साळुंक्या–कावळे ती जमीन शोधत होते. एक वाऱ्याची लाट सळसळत गेली. रस्त्याच्या कडेच्या केशिया वृक्षांची पिवळी फुले खाली ओघळली. जमिनीवर पडलेले कागदाचे बोळे अकारण फरफटले गेले.

जेंव्हा जहांगीर आर्ट गॅलरीसमोर मी गेलो तेव्हा अंधार पडू लागला होता. गॅलरीच्या दाराशी तुरळक माणसे होती. कुणा नव्या कलावंताच्या प्रदर्शनाचा उद्-घाटन दिवस होता. वेळ भरपूर होता. न-कळत मी पायऱ्या चढून गेलो. मुंबईत असू-नही कैक वर्षांनी मी त्या गॅलरीत पाऊल ठेवीत होतो. आत गर्दी नव्हती. डाव्या बाजूच्या गॅलरीकडे मी वळलो. हॉलच्या प्रवेशद्वाराशी एक टेबल, दोनतीन खुर्च्या ठेवल्या होत्या. त्यावर एक तरुण, दोन तरुणी बसल्या होत्या. त्यातल्या एका मुलीने बेलबॉटम परिधान केली होती. त्यावर तांबड्या भडक रंगाची गोंडेदार बंडी घातली होती. ओठांना लिपस्टिक लावली होती. तिच्या पाठीपर्यंत आलेले केस खांद्यावर, पाठीवर विस्कटले होते. नजरेतला स्वप्नाळू भाव ओळखून येत होता.

मी हॉलमध्ये प्रवेश करताच त्या टेबलाजवळच्या तरुणाने एक पत्रिका हाती दिली. मी त्या पत्रिकेवरचं कलावंताचं नाव वाचलं. ए. अरुणा. मी त्या मुलीकडे परत नजर वळविली. ती माझ्याकडे पहात होती.

"Excuse me ! Are you the artist ?"

**...'स्वामी' कादंबरीने श्री. रणजित देसाई यांना लोकप्रियतेच्या शिखरावर नेऊन बसविले... दिल्लीच्या साहित्य अकादमीने त्यांच्या साहित्याचा पारितोषिक देऊन बहुमान केला... ते स्थान ते अद्यापि कायम राखून आहेत... संगीतविषयक त्यांच्या काही कथा रसिकांच्या स्मरणात कायमच्या राहिल्या आहेत... त्यांची ही एक आगळी कथा....**

ती मुलगी हसली. मानेने तिनं होकार दिला. हॉलकडे बोट दाखविलं.

मी हसलो. आणि माझं लक्ष हॉलमधल्या चित्रांच्याकडे वळलं. त्या प्रकाशित हॉल-मध्ये पंचवीस तीस लहानमोठी तैलचित्रे लावली होती. नवकलेचा आविष्कार तेथे घडला होता. भडक रंगाच्या पट्ट्यांनी, वर्तुळांनी, त्रिकोण चौकोनांनी त्या चौकटी चितारल्या होत्या. काही चित्रे बरी वाटत होती. बरीच समजत नव्हती. पहायलाही नकोशी वाटणारी काही चित्रे त्यात होती. अचानक त्या चित्रावर माझं लक्ष खिळलं.

तांबडे पिवळे पट्टे एकमेकात मिसळ-लेले ते एक चित्र होतं. त्या चित्राची उग्रता जाणवत होती. पण त्या रंगाची ठेवण, ते प्रवाह लक्ष वेधून घेत होते. सारी चित्रे पाहून माझं लक्ष परत त्या चित्रावर खिळलं. उभा राहूनही कंटाळा आला होता. त्या चित्राच्या समोरच्या खुर्चीवर मी बसलो. लक्ष त्या चित्रावर खिळलं होतं. तसं मला चित्रकलेतलं काही कळत नाही. माणसांची, निसर्गाची, पहाताच समजणारी चित्रे मला आवडतात. पण त्या चित्रानं लक्ष का वेधून घ्यावं हे कळत नव्हतं. मी उठलो. त्या चित्रा-खाली घातलेला आकडा पाहिला. नंबर १७. मी खिशातली पत्रिका काढली.

सतरा क्रमांकाच्या पुढे लिहलं होतं.

Rap`.

बलात्कार !

आश्चर्यचकित होऊन मी परत त्या चित्राकडे पाहू लागलो. ते जाड तांबडे पिवळे पट्टे, एकमेकात मिसळलेले चित्राला दिलेली अर्धवट काळी किनार. तेच चित्र कां आव-डावं ? ते चित्र समजलं नाही. कळलं नाही त्याचं नाव बलात्कार कां असावं ?

ही नवचित्रकला अगदीच भंकस नसावी !

त्याच विचारात मी चालू लागलो. प्रवेशद्वाराशी ती चित्रकर्ती तशीच बसून होती. ती स्वप्नाळू नजर तशीच होती. तिचं लक्ष माझ्याकडे गेलंही. तिला त्या चित्राबद्दल विचारावं असं वाटलंही; पण त्या नजरेतील गूढतेने तो धीर दिला नाही. मी त्या हॉलमधून बाहेर आलो. प्रवेशदारातल्या आतल्या बाजूला एक तरुणी भिंतीला पाठ लावून उभी होती. तिच्या सामोरा एक तरुण उभा होता. त्याचा डावा हात भिंतीला टेकला होता. तो त्या तरुणीशी काहीतरी बोलत होता. दोघांचेही चेहरे दिसत नव्हते. अर्थहीन शब्द आणि गुदमरलेलं हसणं ऐकू येत होतं. तो अंधुक कोपरा. त्यात उभ्या असलेल्या, न ओळखता येणाऱ्या दोन आकृती. तुटल्या ताऱ्यासारखे मध्येच नाहीसे होणारे ते अस्पष्ट शब्द. चांदण्यासारखं. ते हसणं फिकट निळ्या रंगाने माखलेल्या चौकटी-वर दोन तांबड्या रंगातल्या आकृती ऐकमेकात मिसळलेल्या आणि त्यांच्या एकांताला जगापासून वेगळं करणारं ते उल्केचं वर्तुळ. असं चित्र आलं तर ! बरं दिसेल ?

भलतंच काहीतरी मनात येत होतं. मी तो विचार झटकला आणि आर्ट-गॅलरीच्या बाहेर आलो.

रात्र उतरत होती. रस्त्यावरचे दिवे लागले होते. रहदारी जवळ जवळ थांबली होती. माझं लक्ष काळा घोडा चौकाकडे गेलं. स्वारासकट काळा घोडा नाहीसा झाला होता. फक्त चौथरा उरला होता. जगा-तल्या बहुतेक स्मारकांची हीच गत होते. बदलत्या राज्यसत्तेबरोबर काही पुतळे हलवले जातात किंवा काही काळाच्या ओघात चौथऱ्यातच मिसळून जातात.

त्या विचाराने मला हसू आलं.

चौक ओलांडून मी चालू लागलो. दिवसा अत्यंत गजबजलेला तो कोपरा अगदी मोकळा होता. कोपऱ्याच्या राजशाही हॉटेलसमोरचे पानाचे ठेले तेवढे चालू होते.

फ्लोराफाऊंटनच्या जवळ मी आलो. हुतात्मा स्मारक, तो कारंजा वघत तेथे रेंगाळत होतो. घडाळ्यात पाहिलं तर साडेसातही झाले नव्हते. पुष्कळ वेळ काढायचा होता. या मुंवईत काम नसता वेळ काढणं भारी कठीण. हवेतला उकाडाही जाणवत होता. एखादी थंड वीर मिळाली असती तर खूप मजा आली असती. वीरच्या आठवणीवरोवर मला माथूरची आठवण झाली. तिथल्या चोरटया पवमध्ये तो मला घेऊन गेला होता. तो पव तेथेच कोठेतरी होता..क्रॉसलेनमध्ये. मी थोडं आठवण्याचा प्रयत्न केला आणि चालू लागलो. पत्ता वरोवर सापडल्याचा आनंद झाला. त्या छोटया खोलीत तीन टेवले मांडली होती. सारी भरली होती. तिथल्या माणसाने एक घडीची खुर्ची उघडली आणि दोन टेवलामध्ये दाटीवाटीने मांडली.

"एक थंडा वीअर."

"जी ! वीर संपली. व्हिस्की देऊ ?"

"हां ! एक पेग."

"छोटा ?"

"नही वडा."

"सोडा."

"थोडा."

त्या गर्दीमुळे तेथे बसावेसे वाटत नव्हते. हाती आलेलं पेय गडवडीने संपवून दहा रुपयाची नोट टेबलावर ठेवून मी उठलो. त्या वेटरने आनंदाने केलेला सलामसुद्धा वघायला मी थांवलो नाही.

मी रस्त्यावर आलो. सामोरून एक पोलीस येत होता. मी नजर खाली वळवली. दोन पावले टाकली तोच मागून आवाज आला.

"मिस्टर !"

मी थांवलो. पण वळलो नाही. करकरणारी पावले माझ्यासमोर आली. मी पाहिलं. पोलिसाच्या नजरेत स्वप्न तरळत होतं.

पवकडे वोट दाखवत मी म्हणालो, "त्या तिथं !"

"कायकू ?"

"दारू प्यायला."

माझ्या उत्तराने तो चकीत झाला. क्षणात सावरून तो म्हणाला.

"कायदा मालूम है ?"

"कुणाला ? मला की तुम्हाला ?"

माझ्या प्रश्नाने त्याचा गोंधळ वाढला. संताप उसळला.




अच्छा डियर्स, मला आता जायला पाहिजे. आठ वाजता 'देश कुठं चाललाय'वर माझं 'राष्ट्रीय स्पीच' आहे...!

"चलो गेटपर. . . ."

"मी एकटाच की तेही. . ." पवकडे मी वोट दाखविले.

"चलो."

"हप्ता मिळतो ? कितीचा ?"

पोलिस थिजला. त्याला माझा अंदाज येत नव्हता. त्याला मराठी येऊ लागलं.

"साहेव, तुमच्यासारखी फार थोडी माणसं येतात इथं. नजर ठेवावी लागते."

"ठीक !"

मी चालू लागलो. विजयाचं हासू येत होतं पण मन वेचैन वनलं. मी थांवलो. पोलिस धिम्या पावलांनी जात होता.

"हवालदारऽ"

पोलिस वळला. मी खिशातून पाकिट काढलं. पोलिस जवळ आला होता. त्याच्या हातात पाच रुपयाची नोट ठेवली. अपेक्षिलेलं समाधान त्याच्या चेहऱ्यावर उमटलं.

"थँक्स !" मी म्हणालो. वळलो. कानावर शब्द आले.

"सलाम साहेव !"

मी मुख्य रस्त्यावर आलो. रस्त्यावरच्या हॉटेलसमोर एक फेरीवाला स्टॉल मांडून उभा होता.

दिवसा या केरळच्या माणसांनी व्हीटीपासून कुलाब्यापर्यंत वाजार मांडलेला दिसे. हवी ती परदेशी वस्तू मिळविण्याचं तेच ठिकाण. माझं लक्ष त्या स्टॉलकडे गेलं. उचललेल्या पावलावरोवर डोळे मारणाऱ्या पोरींची चित्रे त्यावर होती. मी अद्याप न पाहिलेलं असं त्यात एक चित्र होतं. मी जवळ जाऊन ते चित्र पहात होतो.

"जी साव !"

चित्राकडे वोट दाखवीत मी विचारलं, "क्या किमत ?"

"छे रुपया."

मी हसलो. साला मला वाहेरचा समजत होता. मी वळणार तोच त्याने विचारले.

"क्या दोगे साव ?"

"तीन !"

त्याने नकारार्थी मान हलवली.

अनुक्रमणिका

दुसऱ्या चित्राकडे बोट दाखवत तो म्हणाला,

"ये थ्री रूपीज् का है !"

"मुझे वही चाहिये !"

"फाईव्ह रूपीज ! लेंगे ? नया माल है बाबूजी."

मी नकारार्थी मान हलवली. हसून म्हणालो.

"महिन्याने तेही तीन रुपयाला मिळेल."

तो केरळाईट तेवढ्याच मिस्कीलपणे हसला.

"हां बाबूजी ! लेकिन महिनेके बाद."

मी सिगरेट पेटवून चालू लागलो. दगडी कमानीची रांग सामोरी दिसत होती. मी त्यातून जात होतो. रस्त्यावरचा प्रकाश कमानीतून आत फरशीवर पडला होता. माझं लक्ष हसण्याकडे गेलं. मला ओलांडून एक तरुण तरुणी पुढं गेली. तरुणीने लाल फ्लेरेड स्कर्ट घातला होता. तिची नाजूक आकृती पावलागणिक वळणे घेत होती. त्या दोघांचे हात एकमेकात गुंतले होते. खांद्याना खांदे भिडत होते. माझी जिज्ञासा जागृत झाली. मी गडबडीने पावले उच-लली. त्यांच्यामागून मी चालत होतो. माझं लक्ष त्या गुंतलेल्या हाताकडे खिळलं होतं. त्या नाजूक हातावर केवढा दाब पडत असेल ? त्याचा प्रतिसाद काय येत असेल ?

हँडलूम हाऊसच्या मोकळ्या जागेत आले असता ते युगुल थांबले. मी पाहिलं. तो तेथे एक म्हातारा उघडलेल्या छत्री-मध्ये रूमाल टाकून बसला होता. नाना रंगाचे पुरुषी रूमाल.

त्या तरुणाने विचारलं. "रूमाल घ्यायचे ?"

तरुणी "घे ना !"

"तू निवड."

ती तरुणी ओणवी होऊन रूमाल पहात होती. ओणवे झाल्यामुळे तिचा ब्लाऊज वर सरकला होता. स्कर्ट आणि ब्लाऊझ यांच्यामध्ये थोडे अंतर निर्माण झाले. त्यावर तिच्या मणक्यांची रेषा उमटली होती. त्या मोकळ्या जागेवर त्या तरुणाचा हात विसावला. त्याच वेळी ती तरुणी उभी राहिली. दोन रूमाल तिने निवडले होते. तरुणाने तिच्याकडे पाहिलं. गंभीर चेहरा करीत त्यानं विचारलं.

"दोन पुरे होतील ?"

थक्क झालेली ती तरुणी उसळली.

"You rascal pay the bill."

तो तरुण हसला. पुढे होऊन तो पैसे देत होता. त्या तरुणीच्या चेहऱ्यावरही वेगळे हासू उमटले होते. त्या तरुणाने पैसे दिले. ते युगुल पुन्हा हातात हात घालून चालू लागले. अचानक त्यांच्यातले माझे कुतुहल संपले. अंतर सरू न देता त्यांच्या मागे जावे असे वाटत नव्हते. ती दोघं समोरच्या कमानीतून नाहीशी झाली. मी संथ पावले

टाकीत जात होतो.

कमानीतून जात असता दोन आखणे सोडून गॅसबत्ती पेटवून बसलेल्या पुस्तकवाल्याकडे माझं लक्ष वळलं. इंग्रजी पुस्तके ओळीनं मांडली होती. उत्तान चित्रांनी रेखलेली पुस्तकांची वेष्टने पहात होतो. वरची चित्रे आणि आतला मजकूर यांची संगती असेलच असं वाटतं नव्हतं. अलिकडे सगळ्याच पुस्तकांची चित्रे तशी असतात. एकदोन पुस्तके ओळखता आली. त्यात हॉलोवेचं 'नाईन होल्स ऑफ जेड', मारकस व्हॅन हिलरचे 'रेप', ऑरगसी ही पुस्तके दिसत होती. हेन्री मिलरचं सेक्ससही टिपता आलं. पुस्तकांवरून फिरणारी नजर पुस्तकवाला हेरीत होता. ते जाणवत होतं. पुस्तकवाल्याने एक पुस्तक उचललं आणि हाती. दिलं. मी शीर्षक पाहिलं. 'लव्ह मशीन.'

"एकदम हॉट आहे साहेब !"

"साला बनवतो !"

काहीही न बोलता ते पुस्तक त्याच्या हातात देऊन मी चालू लागलो. समोर व्ही. टी.च्या चौकातला उजेड दिसत होता. चालता चालता माझं लक्ष डाव्या हाताच्या पलिकडच्या फुटपाथवर उभ्या राहिलेल्या आकृतीकडे गेलं. माझी पावले थबकली. रस्ता आणि फुटपाथ यांच्या मध्ये राहिलेल्या रेलींगला टेकून एक स्त्री उभी होती. मी कमान ओलांडून फुटपाथवर गेलो. आमच्या दोघांमध्ये रस्ता होता. त्या डांबरी रस्त्यावर चट्टे पडले होते. रस्ता मोकळा होता. एक दुमजली बस आपल्या वजनाखाली रस्ता चेपीत निघून गेली. ही स्त्री तेथेच उभी होती. एकटी.

मी सिगरेट पेटवली आणि रस्ता ओलांडला. त्या स्त्रीपासून थोड्या अंतरावर उभा राहिलो. ती स्त्री फारशी वयस्क नव्हती. बांधा ठीक दिसत होता. रंग सावळाच दिसत होता. जेव्हा माझी नजर तिच्याकडे जात होती तेव्हा ती रस्त्याकडे पाही. पण माझी नजर वळताच ती माझ्याकडे पहात होती हे मला जाणवत होतं. कोणीतरी शीळ घालीत आमच्या मागून निघून गेलं. त्या स्त्रीने गेलेल्या माणसाकडे वळून हसताना मी पाहिलं. ती शीळ विरली. आणि परत शांतता पसरली.

मी खाकरलो. पण प्रतिसाद आला नाही. एकदोन वेळ तसा प्रयत्न करूनही काही साधलं नाही. मी सिगरेट पायाखाली विझवली. आणि वळलो. एकदम माझी पावले जागच्या जागी थांबली. खाकरण्याचा आवाज मी स्पष्टपणे ऐकला होता. मी तसाच उभा राहिलो. परत तो आवाज आला. अपेक्षापूर्तीचं हास्य माझ्या ओठावर उमटलं. खुशीत येऊन मी दुसरी सिगरेट पेटविली. सावकाश वळलो. तिच्याजवळ जाऊन उभा राहिलो. मीच बोलणं सुरू केलं.

"एकटी आहेस ?"

"हो !"

"येणार ?"

"चला."

"काय घेणार ?"

"मी त्यातली नाही. द्याल ते."

आलेलं हसू दाबत मी फासा टाकला.

"जवळपास एखादं हॉटेल आहे ? ज्यात खोली आहे असं ?"

"आहे ना !"

फासा बरोबर पडला होता. हॉटेलात जायची इच्छा नव्हती. मी म्हणालो,

"हॉटेलात जाण्याआधी जरा फिरूया."

ह्या होकारानं बरं वाटलं. मी जवळ गेलो. तिनं हसून पाहिलं. मी तिचा हात हाती घेतला. तिच्याबरोबर मी चालू लागलो. कॅपिटलसमोर आम्ही आलो. मी विचारलं,

"इकडे कुठं ?"

"आझाद मैदान आहे ना ! तिथं निवांत असतो."

माझं लक्ष व्हीटी स्टेशनवरच्या घड्याळाकडे गेलं. आठला दहा मिनिटे उरली होती. अजूनही वेळ होता.

तिच्या बोटावरची माझी पकड मी दाबली. मला ते युगुल आठवलं. पण हाती धरलेल्या हातात उष्णता नव्हती. तो स्पर्श गार लागत होता. दवाने भिजलेल्या पानाला स्पर्श करावा तसा.

चालताना खांद्याला खांदा घासत होता. तिच्या मांड्यांना माझ्या हाताचा स्पर्श होत होता. प्रत्येक पावलाला अंतर कमी होत होतं. टाटाचा पुतळा ओलांडून आम्ही झाडीत शिरलो. आझाद मैदान दिसत होते. मी हात सोडवून घेतला आणि माझा हात तिच्या कमरेवर स्थिरावला. थोड्याशा ओढीनं सुद्धा ते अंग शरीराला भिडलं. पावले अडखळली. मी तिच्याकडे पाहिलं. नाजुक हसण्याची साथ मात्र आली नाही. तशाच अवस्थेत आझाद मैदानावर आम्ही पावले टाकली. त्या हिरवळीवर जरा अंतरावर एक जोडपे मिठीत बद्ध झाले होते. आमची चाहूल लागताच त्यांनी वळून पाहिलं. आम्हा दोघांना निरखून ते परत मिठीत बद्ध झाले. समान शीले . . . म्हणतात ते हेच काय ? परत चार पावले टाकली. मन अधीर बनले होते. एकदम तिला मिठीत घेतली. चुंबनासाठी तिचा चेहरा उंचावणार तोच पावलाचा आवाज झाला. तिच्या खांद्यावरून माझी नजर सामोरी गेली. दोन तीन व्यक्ती भरभर येत होत्या. मी मिठीतून दूर झालो. तोच ते नजीक आले. एकाचा आवाज उठला.

"क्या चला है ?"

दुसरा पुढे झाला. त्याने त्या स्त्रीच्या एक मुस्काटात टेवून दिली. फटाकडी वाजली.

"साली दुसरेके साथ भागती है!"

मला त्या शीळेचा अर्थ समजला होता. ही तरुणी माझी नजर टाळीत होती. तीच मला आझाद मैदानावर घेऊन आली होती. सारा मामला स्पष्ट झाला होता. यईल त्या प्रसंगाला तोंड देणं आवश्यक होतं.

"जंटलमन दिखाई देता है × × ×" दुसरा नजिक येत म्हणाला.

काय बोलावं याचा मी विचार करीत होतो. ते बद्ध झालेलं युगुल केव्हाच नाहीसं झालं होतं. ती स्त्री तशीच उभी होती. कोणीतरी माझा कोट पकडल्याच जाणवलं.

"हड्डी तोड डालेंगे साले की."

त्या स्पर्शाने मी भानावर आलो. एका झटक्यात हात झटकत मी म्हणालो.

"छुवो मत ! मारामारी करायची असेल तर माझी तयारी आहे."

मी एक पाऊल मागे सरून वाट बघत होतो. माझ्या नव्या पवित्र्याने क्षणभर गोंधळले. माझं लक्ष रस्त्याकडे गेलं. रस्ता तसा दूर नव्हता. ओरडलं तर कोणीही धावून येण्यासारखं होतं. त्यातला म्होरक्या पुढे झाला.

"साला रूवाब दिखाता है। चलो पोलीस स्टेशनपर. चलोऽऽ"

मी शांतपणे म्हणालो.

"ठीक ! चलो स्टेशनपर..."

मी पाऊल उचललं. माझ्या अनपेक्षित उत्तरानं ते मांवावले. त्यांचा उडालेला गोंधळ मला कळत होता. माझ्या पावलागणिक त्यांचं अंतर कमी होत होतं. सारी गंमत हरवली जाणार होती. तशीच चार पावले टाकली असती तर वेटे मागच्या मागे पसार झाले असते.

"पोलिस स्टेशनवर नेऊन काय मिळणार ? माझी बदनामी होईल पण तुमचा काय फायदा ? त्यापेक्षा इथंच हे प्रकरण मिटवलं तर..."

त्यांनी हे अपेक्षिलं नव्हतं. त्यांचं आश्चर्य वाढलं होतं. त्या म्होरक्याला वळ चढलं.

"अरे छोड ! मिटानेकी वात करता है ! सुव्वर का बच्चा !!"

दुसरा मध्ये पडला "लाला, जाने दो ना ! बेचारा जंटलमन दिखता है ! !

"साहेब, फिकीर करू नका. मिटवून टाकू. गल्ती कुणाच्या हातून होत नाही ?" मी विचार केला.

"हे पहा ! मी तुम्हां तिघांना दहा दहा रुपये देईन. आणि बाईला वीस."

परत तो म्होरक्या उसळला.

"सालेकी घडी ले ! पचास तो भिकारी कमाते है"

मी शांतपणे म्हणालो.

"घड्याळ माझं आहे माझंच राहील. हे ठरत नसेल तर म्हणाल ते करू. पोलिस स्टेशन किंवा मारामारी."

परत थोडी वचवच झाली. मध्यस्थी झाली. पन्नास रुपयाचा सौदा ठरला. मी पाकीटातून पन्नास रुपये काढले. पाकीट खिशात ठेवून पैसे पुढे केले. पैशावर झपड घातली गेली–आणि दुसऱ्या क्षणी ती बाई आणि तिघे पसार झाले.

मी सावकाश वळलो. मैदान सोडून परत रस्त्यावर आलो. कॅपिटॉल सिनेमासमोर चणेवाला वसला होता. स्टेशनच्या घड्याळात सव्वा आठ झाले होते. मी चण्याचा पुडा विकत घेतला. आणि एक एक चणा तोंडात टाकीत स्टशनच्या दिशन चालू लागलो.

● ● ●










अनुक्रमणिका



# शृंगारातील ऋतुचक्र

**आनंद साधले**

**संसारेऽस्मिन्नसारे परिणतितरले द्वे गती पंडितानां**
**तत्वज्ञानामृताम्भःप्लवलुलितधियां यातु कालः कदाचित्**
**नो चेन्मुग्धांगनानां स्तनजघनघनाभोगसंसर्गिणीनां**
**स्थूलोपस्थस्थलीषु स्थगितकरतलस्पर्शलोलोद्यमानाम् ॥**

हा श्लोक भर्तृहरीच्या शृंगारशतकातील आहे. शृंगारशतकात शोभून दिसावा असा तो शृंगाराने थवथवलेलाही आहे. अत्यंत रसाळ अशी सुंदर सुंदर भाष्ये याच्यावर भर्तृहरीच्या टीकाकारांनी केलेली आहेत.

हा श्लोक भर्तृहरीचा असो अथवा नसो. पण तो ज्या कोणाचा असेल त्याने साहित्यप्रांतातील एका नेहमी उपस्थित होणाऱ्या प्रश्नाचे










मांठे चपखल उत्तर दिलेले आहे. हा प्रश्न नित्यनूतन म्हणजेच सनातन आहे. तो प्रत्यक्ष भर्तृहरीच्या संबंधातही कुणी विचारतात. वामन पंडितांच्या बाबतीत तर तोच सर्वांत मोठा वादग्रस्त प्रश्न. आणि गमतीची गोष्ट अशी की या श्रेष्ठ कविवरांची पादत्राणे सांभाळण्याचीही ज्याची पात्रता नाही अशा माझ्यासारख्या क्षुद्र माणसाच्या बाबतीतही तोच प्रश्न.

ज्या भर्तृहरीने शृंगाराचा कटु शब्दात धिक्कार करणारी नीती आणि वैराग्य ही शतके लिहिली तोच भर्तृहरी शृंगारशतक कसे लिहील असे स्वरुप हा प्रश्न भर्तृहरीबाबत घेतो. यथार्थदीपिका लिहून भगवद्‌गीतेवर तात्विक प्रकाश पाडणारा जो वामन तोच राधाकृष्णावरील महाचावट काव्ये कशी लिहील हे कूट तर फारच दुर्घट होते. जो मीही महाभारतावर 'जय नावाचा इतिहास' लिहितो तोच मी 'गीतगोविंदा'चे भाषांतर करतो यावद्दल्ही नाराजी व्यक्त करणे कोणाला आवश्यक वाटते. सुदैवाने या नाराजीचे रूपांतर पुढे-मागे वाङ्मयीन कूटात होणे आजच्या युगात शक्य नसले (?) तरीही या नाराजीचे मूळ स्वरुप वरील कूटांसारखेच आहे. या कूटांच्या दोन्ही बाजूने जे पुरावे, प्रतिपुरावे आहेत त्यांच्या तौलनिक सबलतेचा विचार इथे कर्तव्य नाही. उपरोक्त श्लोकाने या व असल्या कूटांवर मूले कुठारः असा एक घाव घातलेला आहे एवढेच इथे लक्षणीय आहे.

या श्लोकाचा श्लोककर्ता (थोडक्यात) सांगत आहे की या जगात पंडितांना करण्याजोग्या फक्त दोनच गोष्टी आहेत. एकतर तत्वज्ञानाच्या सागरात डुंबत बसावे नाहीतर सौंदर्याने मुसमुसलेल्या पुष्ट सुंदरीच्या कमरेमागून खाली आलिंगन देऊन स्पर्शसौख्यात डुंबावे. या दोन गोष्टी सोडल्या तर इतर सारे व्यर्थ आहे.

हे उत्तर कोणीही दिलेले असो. केवळ शृंगाररसामुळेच नीतीशास्त्रज्ञ भर्तृहरीला शृंगारशतक न लिहिण्याची काहीही आवश्यकता नाही एवढे खरे. टीकाकार मंडळीची ही खोड मोठी विलक्षण आहे. अमरुशतक हे शृंगारपरिप्लुत काव्य शंकराचार्यांनी लिहिले हा प्रवादही ते प्रसृत करतात. मग शांकरभाष्य लिहिणाऱ्या तत्वज्ञाने हा शृंगार करावा याचे आश्चर्यही तेच प्रकट करतात. नंतर परकायाप्रवेशाच्या भारूड कथा रचून त्या शंकांना उत्तरेही ते देतात. ते काही असे म्हणत नाहीत की शंकराचार्यांनी शांकरभाष्य लिहिले असले म्हणूनच काही त्यांनी अमरुशतक लिहू नये असे होत नाही; त्यांना ते लिहावेसे वाटले तर लिहिण्याचा संपूर्ण अधिकार त्यांना आहे.

असो ! हा प्रश्न सहज ओघाने आला. परंपरा 'शृंगारशतक' भर्तृहरीने लिहिले आहे असेच मानते. चिकित्सक ही गोष्ट नाकारतात असे नव्हे ! ते फक्त शंका उपस्थित करतात. भर्तृहरीच होता की नव्हता इथपर्यंतही या शंका जात असल्याने इथे त्यांचा एवढाच विचार पुरे आहे.

भर्तृहरीच्या एकूण काव्याचे स्वरुप उपदेशक अशा चमकदार मुक्तकांचे असल्याने पारंपरिक शिक्षणपद्धतीतील काव्याभ्यासात त्याला कालिदास–भारवी यांची अग्रप्रतिष्ठा मिळालेली आहे.

**.... 'जय नावाचा इतिहास ही लेखमाला 'दीपावली'-तूनच गाजली नि श्री. आनंद साधले या नावाने विचारवंतांना जणू एक धक्काच दिला...सांस्कृतिक विषयांवरील दिवाळी अंकातील त्यांचे ललितरम्य लेख हे 'दीपावली'चे नेहमीचे आकर्षण ठरले आहेत... शृंगार संयमितपणे कसा हाताळावा त्याचे प्रस्तुत लेख म्हणजे एक उदाहरणच...**

महाराष्ट्रातील तीस वर्षापूर्वीच्या शिक्षित पिढीतही भर्तृहरी घरोघर वाचला जात असे. मराठीच्या अभ्यासात वामनपंडिताने केलेल्या भर्तृहरीच्या भाषांतरातील वेचे अपरिहार्यपणे असत. 'प्रयत्ने वाळूचे कण रगडिता तेलहि गळे' अथवा ''विपत्काली धैर्य प्रभुपदि सहिष्णुत्व वरवे'. अशा श्लोकातून भर्तृहरी तोंडपाठ असे. कॉलेजमधेही पहिल्या दोन वर्षात भर्तृहरीची पाळी आलटून पालटून लागत असे. आता मराठीतून वामनाची व अभ्यासातून संस्कृतची उचलबांगडी होत आहे. त्यामुळे आजच्या पिढीला भर्तृहरी हा सिनेमाचा नायक म्हणूनच काय तो परिचित आहे.

भर्तृहरीचा जो परिचय पूर्वीच्या पिढीला सहजी होत असे तोही त्याच्या 'नीती' आणि 'वैराग्य' याच दोन शतकांचा होत असे. शृंगारशतक तिथेही बहिष्कृत होते. विद्यापीठीय अभ्यासात शृंगारशतकावर बहिष्कार घालण्याचे काहीही कारण नव्हते. जिथे 'रत्नावली'सारखी क्षुद्र शृंगाराने कामुकलेली दीड दमडीची नाटके खुशाल शिकवली जात, अथवा जातात, तिथे त्यांच्या तुलनेने गंगाजलासारखे असणारे शृंगारशतक शिकविण्यास प्रत्यवाय असण्याचे कारण नव्हते. बहुधा त्याच्या नावातील शृंगारालाच लोक टरकत असत असे वाटते.

आशय आणि रचना या दृष्टीने तुलनेसाठी शृंगारशतक हे अमरुशतकाच्या अधिकात अधिक जवळ जाऊ शकते. पण त्यात साम्य आहे त्यापेक्षा फरक अधिक आहे. शृंगारशतकच असल्याने त्यातील श्लोकाश्लोकातून, पुष्ट वजनदार टोकेरी स्तन आणि भरीव मोठाले नितंब अमरुशतकाप्रमाणेच भरलेले आहेत. पण एकदा त्यांच्या भाराचे ओझ सहन केल्यावर पुढे त्यांना भिण्याचे कारण उरत नाही—हा भार सांभाळून अमरु आणि भर्तृहरीकडे पाहिले तर असे दिसते की अमरूचा पुष्कळ शृंगार हा प्रत्यक्ष उपभोगात्मक, प्रत्यक्ष अनुभूतिविश्लेषक असा आहे तर भर्तृहरीचा शृंगार बराचसा विचारात्मक, चिंतनात्मक आहे. अमरूचा नायक आवेगाने चुंबन घेताना दिसतो. भर्तृहरीचा नायक 'थंडी वाजत आहे. चुंबन मिळाल्यास बरे' असा विचार करताना दिसतो. अमरूचा शृंगार हा आस्वादाने झोकून घेणारा अनिर्बंध शृंगार आहे. भर्तृहरीच्या शृंगारातून विफलता आणि वैराग्य याचाही प्रवाह वाहताना दिसतो. रमणीच्या नितंबाना मारलेली मिठी आता सोडावी आणि तपाचरणासाठी पर्वताच्या नितंबावर चढून जावे असा विचार शृंगारशतकात सहज डोकावतो.

## " यौवनं वा वनं वा ? "

रमणीचे तारुण्य की तपाचे अरण्य  हा विचार शृंगारशतकात कधीही संपूर्ण नजरेआड होत नाही. ज्या प्रियेच्या वदनकमलात अधरमकरंद भरलेला होता तेच हे तिचे थोवाड ती उर्मी गेल्यावर विषासारखे दु:खकारक दिसत आहे असे विधान करण्याची शुद्धी भर्तृहरीला शृंगारशतक लिहितानाही राहते. शृंगार हा सुखद असला तरी ते सर्वस्व नव्हे; कधीतरी त्याच्या बाहेर पडले पाहिजे, अशी स्पष्ट विचारधारा या शृंगारातून वाहताना दिसते. प्रीतीच्या अनुभूतीचे जे सर्वांगसुंदर वैभवशाली दर्शन अमरूत होते तसे ते भर्तृहरीत होत नाही. भर्तृहरीची नायिका अखेर उरते ती 'जो टाळा-वयाचा प्रयत्न केला पाहिजे असा एक मोह' या स्वरूपात उरते. अमरूमधे विचारही काव्याचे रूप घेतो, भर्तृहरीमधे काव्याचेही विचारात रूपांतर होते  असे हे नाते आहे. हे विधान स्पष्ट होण्यासाठी दोघांच्याही नुसत्या नांद्या पाहिल्या तरी पुरे आहे. या दोन्ही नांद्यांमधे स्तन, नितंब, अधर, अमृत, आलिंगन, ब्रह्मा, विष्णू, शिव असलाच मसाला आहे. पण याच मसाल्याचे रसायन करताना अमरू म्हणतो 'मला बाई द्या. हे देव काय चाटायचे आहेत ?' तर भर्तृहरी म्हणतो, 'या देवांनाही बाईने घरगडी बनविले. हाय हाय ! या बाईला हात जोडून नमस्कार.' अमरूची उन्मादक ईर्षा आणि भर्तृहरीची सूचक विरक्ती यांचे तौलनिक स्वरुप याने स्पष्ट व्हावे.

भर्तृहरीचे शृंगारशतक जैन मुनींच्या वाचनाचा व अभ्यासाचा भाग होऊ शकते ही गोष्टही त्यातील शृंगाराच्या स्वरूपावर प्रकाश टाकते. भर्तृहरीवरील सर्वात जुनी उपलब्ध संस्कृत टीका ही धन-सारगणी या जैन मुनीचीच आहे व ती पाचशे वर्षांपूर्वीची आहे. व्यंग्यार्थाची ओढाताण करून शृंगारपंथीय लोक जसा नसेल तिथेही मलता शृंगारिक अर्थ काढतात तसाच विरक्तिपंथीय जैनही तशाच ओढातांणीने नसेल तिथे मलती विरक्ती शोधतात. ज्याला शृंगार-पंथी माणूस 'अभिसार' असे रसाळ नाव देईल त्याला विरक्त माणूस 'व्यभिचार' म्हणेल. जिला शृंगारी माणूस 'अनुरक्ता' म्हणेल तिला विरक्त 'कुलटा' म्हणेल. परंतु या ओढाताणीतूनही रसज्ञाला रस-सौंदर्य दिसावयास अडचण पडणार नाही.



आधारस्तंभाखाली मनुष्यहानी वगैरे झाल्याची काही बातमी नाही ना !

शृंगारशतकातील साऱ्याच रससौंदर्याला न्याय देणे इथे शक्य होणार नाही. पण त्यात जो ऋतुचक्राचे वर्णन करणारा विभाग आहे, त्याचाच काही अंश 'दीपावली'च्या वाचकाना भर्तृहरीचा परिचय होण्यासाठी देतो.

### वसंताला अग्रक्रम

या ऋतुचक्राच्या आरंभी मधुमास वसंत फुलतो. वासंतिक अमृत सृष्टीत भरून उरते. सारे स्थिरचर या अमृतात न्हाऊन निघते; या अमृतावर पोसते; बहरते; वस्तू वस्तूत सुप्त असणारी सौंदर्ये बहरतात; फुलतात. साऱ्यांच्याच गुणांचा उदय होतो. वारे नुसता सुखस्पर्श आणीत नाहीत तर परिमलही आणतात. वृक्ष नुसताच वेष करीत नाहीत, तर सणावारीचा नवा झुळझुळीत वेष करतात. कोकिलांना गोड कंठ फुटतो. तो साद ऐकून ऐकून कामिनीची उत्कंठा वाढते.

कोकिलांचे हे गीत. वासंतिक सौंदर्याचा हा सुगंध. सारे कसे अमृतासारखे. चांदण्यासारखे. केवळ आनंद, केवळ सुख, असे त्याचे स्वरुप. पण कामिनींचे जे प्रियजन त्यांच्यापासून दूर स्वत:च्या व्यव-सायात असतात त्यांना हेच अमृत विषासारखे होते. त्यांना 'ती' आठवते—कशातही लक्ष लागत नाही. विरह असह्य होतो.

तिच्या जवळ असावयास हवे असे त्यांना वाटते. कुशीत नसले, तरी जवळपास. मागेपुढे. निदान दृष्टी पडेल, असे. किंवा कदाचित कुशीतही. विलासात. विलास ! कधी न संपणारे; संपू नयेसे वाट-णारे. प्रसंगी शरीर थकेलही; पण वासना काही थकणार नाही. आपण लतामंडपात असू; लता फुललेल्या असतील, फुले हसत अस-तील; चांदणे असेल; कदाचित आपण कुणा कवीचे रसाळ काव्य गात असू; त्यांच्याशी गुजगोष्टी करीत असू; असे त्यांना वाटते.

अशा विचारात ते तळमळतात. त्यांचे लक्ष लागत नाही. समोर आंब्याची डहाळी असते. तिच्यावर मंजिरी फुललेली असते. तिच्यातून मध गळत असतो. कोकिळ तो मध पिऊन तृप्त झालेला असतो. आळसलेला असतो. तरीही त्या मंजिरीकडे उत्कंठतेने पहा-तच असतो. अशीच मंजिरी तिथेही असेल. घरी. मागीलदारच्या उपवनात. तिच्याकडेही कुणी कोकिळा अशीच पहात असेल. कदा-चित या कोकिळाची प्रिया. ती असो नसो. आपली प्रिया तरी तिथेच असणार. अगदी व्याकूळ, वेडीखुळी होऊन, जीव डोळ्यात आणून, अशीच त्या मंजिरीकडे पहात असणार. चंदनाच्या सुगंधाने भारलेले हे वारे तिथेही वहात असणार. हा वास चंदनाचा की उंडिणीचा ? कसलाही असो पण हा अगदी वेडा वास आहे वेडा ! हा तिथेही असाच वहात असणार. तिलाही वेडेखुळे करीत असणार. असा सुगंध धुंदा-वत असता 'ती तिथे आणि मी इथे' हे असे किती वेळ चालावयाचे ?

यावेळी कसे जवळजवळ हवे. मिठीत. कुशीत. तोच तर या वाऱ्याच्या सुगंधाचा उपयोग. किती म्हणून कुशीत निजले तरी पुरेसे वाटू नये. श्रम होऊ नयेत.

अखेर असह्यता अनावर होते. आंब्याच्या सुगंधी केसरकणांनी दिशादिशा कोंदून जातात. अगदी धुंद होऊन पडतात. वेडा कोकीळ तृप्तीत शांतावतो. फारच मद्य पिऊन झिंगलेले भुंगे स्वतःचेच वजन न तोलून टपटपा खाली पडू लागतात. आस्वादाची उत्कंठा अनावरते. तो घरी धावतो. मिठीत. कुशीत. आनंद रंगतो. वसंत फुलतो. मद्य उसंडतो. मिठी असतेच. तिची. उत्कंठितेची नव्हे. तृप्तेची. तिचे वदन चंद्रासारखे फुललेले असते. दवात भिजलेल्या फुलासारखे ते दिसत असते. तो दव असतो प्रीतीच्या श्रमांचा. सुंदर तसा मधुर. मधुर तसा सुगंधी. पिऊन पिऊन घ्यावा असे वाटविणारा. सुगंधासाठी भिरभिरणारा, हावरा वारा, तो पिऊन टाकतही असतो.

असा वसंत जातो. मग ग्रीष्म येतो. येऊद्या. जे प्रणयी असतात त्यांना सारेच ऋतु सारखे. आनंदाचे. प्रणय म्हणजेच आनंद. ग्रीष्माचाही वसंत व्हावा हीच त्याची किमया. उष्मा वाढू लागतो. तो साहेना होतो. मग सुंदर कारंजी सुरू होतात. त्यांच्या तुषारांनी प्रणयभूमि कशी थंड होते. चांदणे असते. फुले असतात. मालतीलता तर भरभरून फुलतात. वारा झुळुकतो. तो एरवी पडलेला असल्याने प्रत्येक झुळूक कशी आनंदाने शहारे आणणारी असते. रात्री मोकळ्या गच्चीवर कसे प्रसन्न, उघडे, थंड वाटते. सारे विश्व हाच रंगमंच होतो. 'ति'चा स्पर्श हा सुखदच असतो. आता तर तो अधिकच सुखद होतो. कारण सुगंधी चंदनाच्या दाट लेपाने तो अगदी सुखशीतल झालेला असतो.

सौधावर चंद्रकिरण तर न्हाऊच घालतात. वाऱ्याचे सुख काय असते याचा अनुभव पंख्याच्या वाऱ्यामुळे मिळत असतो. तिथे गुंफलेले सुगंधी फुलाचे हार उशीभोवती पडलेले असतात. ते आनंदाची फुंकर घालतच असतात. उपवनात कळ्या उमलत असतात. तेथील तलावाला चुंबून येणारा वारा या फुलांशी चावटपणा करून येताना त्यांचे पराग लुटून येतो, त्यांचाही वर्षाव होतच असतो. याच दिवसांसाठी राखून ठेवलेल्या मद्याची सुरई उघडी झालेली असते. कसे स्वच्छ, सुंदर, मोकळे शुभ्रशुभ्र वाटते. तिची वस्त्रेही पांढरी, पातळ असतात. तीही तिला खुपत असतात. 'किती उकडते गडे' असे ती म्हणत असते. आधी उत्तरीय, मग काचोळी, मग चोळी अशी ती हळूहळू एकएक वस्त्र कमी करीत असते.

तिची गोरी कांती उघडी होते आणि चांदणेच की बरसते. आसमंत अधिकच शुभ्रतेत न्हातो. चंद्र अधिकच विमल होतो. तो सशासारखा काळा, इवला भाग. तीच तर चंद्राची शोभा. तिचे वदन तोही चंद्रच. आणि तो कुंतलकलाप. तो तो ससा. आणि हा चंदनाचा ओला सुरभित स्पर्श ! अहा ! जीवन हाच जणू फुलाचा हार. अनुभव हाच जणू सुगंध.

**वर्षा कालातील वर्षाव**

या सुगंधातच ग्रीष्म जातो. वर्षाकाल डोकावतो. येऊद्या. जो वर्षाकाल येतानाच जुईच्या वेलीला गुदगुल्या करून फुलवित येतो तोही सुगंधितच असावयाचा. ऋतूऋतूंना त्यांची फुले. त्यांचे सुगंध. त्यांची सुखे. बरसात तर आणखीनच अधिक खुली असते. येते तीच मोठ्या उन्मादात येते. निळ्याकाळ्या ढगांचे स्तन उघडे करीत. त्यांना फुगवून उभारीत. प्रणयीजनांना हे स्तन बुंदीचा पर्वकाल न आणतील तरच नवल.

आकाशाचाच मोठाला स्तन होतो. स्तन्य पिण्यासाठी भूमीतून कोवळी तृणे वर आसुसतात. कुडे फुलतात. कदंब फुलतात. त्यांचा सुगंध चोरणारे वारे तिच्या पदरात शिरत असतात. पदर धुमटा-

सारखा सुगंधाने भरत असतात. वागेवागेच्या कुंपणावर मोर येऊन बसतात. उन्मादाने पिसारा फुलवून प्रियेला हाकारतात. ती हाक उत्कंठा ढवळून काढते.

ही इथे वीज चमकते. विलासाने ढगांना चुंबून जाते. ही इथे केतकी फुलते. गंध नुसता ओतते. विजेच्या विभ्रमाने माजाला आलेले ढग खोडांसारखे डरकाळत उधळत असतात. मोर अधिकच हाका घालतात. अधिकच नाचू लागतात. मग वासनाही केतकीसारखी ओतू येते. दूर रहाणे अगदी कठीण जाते. अगदी कठीण जाते.

ढग अधिकच दाटतात. अंधार, अंधार होतो. अगदी सुईही आत जाऊ नये असा. गडगडाट होत असतो. गारा पडू लागतात. पाऊस कोसळतो. धाराधारांनी. अगदी दाट. सुई न जाईल असा दाट. खटयाळ वीज ढगात नाचत सोन्याचा प्रणय खेळते. त्या प्रणयाचा आनंदच जलधारांनी पिळला जातो.

या धारा ! मुसळासारख्या. नद्यांना पूर येतो. नाले तुंबतात. दारात पाणी साचते. पायही बाहेर निघत नाही. त्यामुळे 'तो' बाहेर जाऊच शकत नाही. घरीच राहतो. नाइलाजाने. आयताच. संततधारेने असह्य थंडावा आलेला असतो. जरा वारा आला की कशी शिरशिरी येते. किती सुंदर निमित्त असते. ती ते साधते. 'काय ही गडे थंडी' म्हणत ती जवळ येते. जवळ. मिठीत. कुशीत. आणि मग मरल्या वर्षाऋतूत प्रणयाचा वसंत फुलतो. विजमेघांच्या वसंतासारखा. धुंद. अनावर. बेभान.

आणि मग येतो शरद ऋतू. ओहो ! शरद म्हणजे सौंदर्य. शरद म्हणजेच आनंद. शरद म्हणजेच पर्वकाल. कसे मोकळे मोकळे वाटते. बंधने गळल्यासारखी वाटतात. आनंद किती घ्यावा, कसा घ्यावा याची हावच सुटते. अधीऱ्या उतावीळीने समाधीची आवर्तने होतात. पावसाळ्यात पारख्या झालेल्या गच्चीचा एकांत मोहरतो. रात्र अर्धी संपते त्याच्या आतच जीवन अनेकवार पुरे जगले गेले असते. तिला तर अगदी पुरे, पुरे; असे होते. तृप्तीच्या असह्य आनंदात ती विकल पसरलेली असते. तिचे हातपाय अगदी सैल सुटलेले असतात.

पूर्वरात्रीच्या आनंदात मद्याचीही कितीतरी आवर्तने झालेली असतात. आता तृप्तीच्या गुंगीत असता असताच अचानक जाग येते. शांतविणारा शीण तर असतोच. पण मद्यामुळे सोस पडल्याची जाणीव होते. तो ती जाणीव तिला सांगतो. ती पडल्या पडल्या वळून उशाशी असलेली झारी उचलते आणि त्याच्या निजल्या निजल्या उघडलेल्या तोंडात धारेधारेने पाणी सोडते. शरद ऋतूचे ते पाणी तर आधीच स्वच्छ असते. पण आता त्याच्या पडणाऱ्या थेंबाथेंबात चांदणे मिसळून ते अधिकच स्वच्छ दिसते. त्या धारेत दिसणारी तिची प्रीती पाहून तो पुन्हा मोहाने वेडा होतो आणि वळून तिच्या भोवती हाताचा वेढा घालतो.

मग शरदातून हेमंत फुलतो. शरदातील तृणसंपत्तीवर पोसलेल्या गोधनाच्या ओटचा ओथंबतात. दूध, दही, तूप यांची चंगळ होते. प्रेमिकांचे अवसान पुष्टावते. गालावर उठलेल्या ओष्ठरंगाच्या लाल खुणा पुसावयासही वेळ पुरत नाही. वस्त्राप्रमाणेच त्याही निःसंकोच मिरविण्याकडे वृत्ती होते. शारीरिक पुष्टीतून प्रीतीच्या आस्वादाचे चित्रविचित्र प्रकार शोधावयाची प्रेरणा होते. धंदीलाही धुंदावण्यासाठी केशरकस्तुरीचे लेप करून घ्यावयाची वासना जोरावते. 'ती'ही पुष्ट झाली असतेच. तिचा स्पर्श तर सदाचाच सुखकर. पण मिठी अगदी गाढ गाढ भरली असे वाटवणारा हा पुष्ट हेमंती स्पर्श काही आगळाच. जसे स्तन भरलेले तशाच मांड्याही. आणि ओठ सुद्धा कसे ? काबुली द्राक्षांसारखे रसाने टपोरलेले. मग तो रस पिण्यासाठी ओठाला ओठ भिडत असतात. सारखे सारखे भिडत असतात. जमलेल्या विड्याची अदलाबदल ओठातून ओठात होते आणि मुखात तो विडा असतानाच कधीतरी गाढ झोप लागते.

मग येतो शिशिरऋतू. हा तर अगदीच वेडा. क्षणोक्षणीच 'ति'ला 'त्या'ची आठवण आणणारा. तो नावडता असला तरी त्याला मिठीत ओढावयाची स्फूर्ति देणारा. तो तर आवडताच. मग काय विचारावे. गार गार वारा येतो. गालांना हुळहुळी आणतो. वाटते इथेच त्याने चुंबावे. थंडीमुळे तोंडातून सीत्कार येतात. वाटते हे त्याच्या मिठीतल्या असह्य तृप्तीतून यावे. वाऱ्याने पदर उडतो. थंडगार स्पर्श स्तनाना सोसला नाही की रोमांचाचे काटे फुलतात. वाटते, हे काटे त्याच्या हातांनी मुडपले जावे. निलाजरा वारा कटिवस्त्राच्या घोळात घुसतो. नको तिथे स्पर्शतो. मांड्या थरथरतात. अंगअंग काटयाने फुलते. अगदी वेडे वेडे होऊन जाते.

थंडीची मस्ती वाऱ्यावर वाढतच असते. मेला वारा केसातून बोटे फिरवितो. हातांनी डोळे झाकतो. बळाने पदर खेचतो. सगळीकडे फुंकर मारून गुदगुल्या करीत असतो. ओठाला झोंबत असतो. त्यांच्यावरील चाव्यांच्या खुणा दुखवीत असतो. सारखे सारखे सीत्कार टाकवीत असतो. जे जे 'त्या'ने करावे ते ते हा करीत असतो. मेला ! अगदीच नवऱ्यासारखा वागत असतो.

आणि 'तो' ? तोही असाच उत्कंठित होत असतो. तो असतो तिथेही प्रियंगूच्या फुलांना बहर आलेला असतो. कुंदाचा बहर धुंद सुगंध पसरत असतो. त्याने सैरभैर झालेले भृंगे नाचत असतात. थंडीला न जुमानता विकसलेले मंदार वृक्ष त्यांच्या बहराचे हार वाऱ्याच्या लहरींवर झुलवीत उभे असतात. फुले हे तर मदनबाणच. वृत्तींना वेड लावणे हेच त्याचे काम. तेही सहन करणे एखादे वेळी जमेल. पण खरोखर सहन होत नाही ती म्हणजे वाऱ्यातील थंडी. उबेचा उतारा आठवत असतो तो या थंडीच्या स्पर्शास्पर्शागणिक. ती थंडीही अगदी इरेलाच पेटते. जो वसंत साऱ्या ऋतूत फुलला तो आपणातूनही फुलायला हवा अशा ईर्ष्येला ती पेटते. वारा तिला साथ देतो. तो हिमालयासारखा झोंबतो. चावतो. अगदी असह्यच होते तेव्हा तिच्याकडे धाव घेतली जाते. तीही वाट पहात असतेच. आणि मग कंठात मिठी पडते. त्या चुंबनासाठी. त्या रोमांचमर्दनासाठी. आणि. . . .त्या सीत्कारासाठीही.

मग वसंत फुलतो. शिशिरातला. शिशिरातून जन्मलेलाही-ऋतुचक्र पुन्हा आरंभते--

● ● ●

[ या लेखासाठी निर्णयसागरी पाठ वापरलेला आहे. पाठाचा उपयोग भाषांतरासाठी केलेला नसून स्वतंत्र टीकेसाठी केलेला आहे. यात भाषांतर असे बिलकूल नाही. भर्तृहरीच्या काव्याची कल्पना यावी यासाठी स्वतंत्र रचनेच्या दृष्टीने ही एकसंध टीका आहे. यावरून फक्त कल्पना यावी. हाच भर्तृहरी असे वाटू नये. ]

अनुक्रमणिका

# सतत ५२ वर्षे

## आपल्या सेवेंत !




**मे. एच्. साळवे, कदम आणि कं.**
**निपाणी (जि. बेळगांव)**





अनुक्रमणिका

[ पान ३५ वरून–**सालो कुत्तेकी .....** ]

"पण तुझ्या काकानं बूट का खावा ?"

"तुमचं चप्पल मिळालं नाही म्हणून !

"चेष्टा नको !"

"डॉक्टर म्हणाले, कुत्रा शिकारी आहे. असल्या गोष्टी खायचाच–शिकार मिळेपर्यंत !"

आपली शिकार होईल या भीतीनं वामजी एकदम मागं सरकले.

पण तो चाचा नसून ती चाची आहे याचा मी वामजीना पत्ता लावू दिला नाही. का कोण जाणे, त्यात मला उगाचच कमीपणा वाटू लागला !

दुसरे दिवशी ऑफिसमधून आलो. चाची अंगणात स्वस्थ झोपली होती. पण बाहेर वामजी माझी वाट बघत उभे होते.

ते म्हणाले, "छगन, गुड न्यूज !"

मलाही थोडा आनंद झाला.

मी म्हटलं, "काय झालं ?"

"तुझ्या काकानं सेक्स बदललं ! नाऊ युवर काका इज् काकी !"

माझ्या छातीत धस्स झालं ! सालं हे वामजीना कसं कळलं ?

मी वामजीकडे संशयी नजरेनं पाहिलं.

"छगन. . ." वामजींचा आवाज एकदम खाजगी झाला.

मी म्हटलं, "काय ?"

"तुझी काकी वाईट चालीची होती का रे ?"

मी पुनः दचकलो ! काकी वाईट चालीची होती ते वामजीना कसं कळलं ?

"का ?"

"आज हिनं अंगणात मोजून दहा कुत्रे जमवले !"

मी शरमलो ! साला कुठला मुका प्राणी ! पण मला माझ्या घराण्याची अब्रू गेल्याचं दुःख झालं !

"माझ्या खोलीत येऊन बघ–"

खोलीत ? . . . मी पुनः दचकलो . . . खोलीत काय केलं ?

"काय ?"

"मी किती दगड जमवून ठेवलेत ते बघ–"

"का ?"

"दिवसभर एकेक दगड मारून कुत्र्यांना हाकलत होतो. आता माझे बावखे दुखायला लागलेत. दहा दहा दगड मारले तरी एकेक कुत्रा आवरत नव्हता. एवढंही करून तिनं शेवटी शेण खायचं ते खाल्लंच ! अखेरीस आपल्या डोळ्यासमोर राजरोस हे झेंगट नको म्हणून खोलीचा दरवाजा बंद करून घेतला. हे सालं आहे काय ? शी: ! आता झोपलीय ! थोड्या वेळानं उठेल आणि तुला राम राम करील ! "

मी लाजलो. शरमिंधा झालो आणि वामजींचे पाय धरून म्हटलं, "वामजी, काहीही करा ! पण हे लफडं कुणाच्या तरी गळ्यात बांधा !"

सुदैवानं वामजीनी एक गिऱ्हाईक आणलं. त्याचं मी नाव विसरलो. पण त्याला आपण तूर्त रामजी म्हणू.

रामजीनं चाचीची पाहाणी केली आणि जनावर नंबरी असल्याचं मत दिलं.

मी म्हटलं, "जनावर शिकारी आहे."

रामजी म्हणाला, "ते जाऊ द्या! आपण कुठं कुत्र्यासाठी शिकार करायला जाणार! कुत्र्यानं आपल्यालाच खाल्लं नाही म्हणजे झालं!"

शिकारीचा गुण वाद होताच मी म्हटलं, "आम्हाला दमडीचीही अपेक्षा नाही. ती प्रेमळ आहे. आणि म्हणून ती तुमच्यासारख्या चांगल्या घरी पडावी एवढीच आमची इच्छा!"

दमडीची सुद्धा अपेक्षा नाही म्हणताच वामजी वळल्यासारखा दिसला. म्हणून मी घाईघाईनं आणखी गुणवर्णन केलं.

"ती अशीतशी नाही. ती बोलते... राम राम म्हणते.. नमस्कार करते.."

"काय वाट्टेल ते करते..." असं म्हणत वामजी दगड मारल्याचा आविर्भाव करीत राहिले.

त्याचा रामजीवर काय परिणाम झाला कोण जाणे! पण तो विथरला.

तो म्हणाला, "जनावर हुशार आहे. शहाणं आहे. पण मालकापेक्षा अधिक शहाणं जनावरही उपयोगाचं नाही!"

"मग?" मी हुशार जनावराकडे पाहावं तसं रामजीकडे पाहिलं.

रामजी म्हणाला, "मी तुम्हाला एक युक्ती सांगतो. तुम्ही एक पंधरा रुपये खर्च करा! काय?"

"का?"

"वर्तमानपत्रात एक जाहिरात द्या! बोलणारी, राम राम म्हणणारी, नमस्कार करणारी कुत्री विकायची आहे म्हणून! बघा... पाच पाचशे द्यायला हौशी लोक तयार होतील ...!"

स्वतःची सुटका करून घेण्यासाठी रामजीनं ही कल्पना लढवली असली तरी मला ती आवडली. पाच पाचशे रुपये सोडा. पण मोज्यांचा जोड, बुटांचा जोड, टॅक्सीचे सहा रुपये, चुनावालाचे वीस रुपये, आणि कुणी कॉंग्रेसवाला आला तर त्याच्या टोपीचे आठ आणे एवढं सुटलं तरी खूप झालं! – एवढाच विचार मनात आला आणि मी जाहिरात दिली.

दुसरे दिवशी सकाळी वर्तमानपत्रात जाहिरात आली मात्र आणि एक लांब मिशीवाला इसम माझ्या घरी आला. त्याच्याबरोबर एक पोलीसही होता. तो इसम आला आणि पोलीस कमिशनरासारखा अंगणात उभा राहिला. त्याच्या एका हातात वर्तमानपत्र होतं आणि दुसऱ्या हातानं तो आपल्या झुपकेदार लांब मिशा उचलत होता. सहा फूट उंचीचा इसम. निमुळती विजार. रंगीबेरंगी खमीस. कमरेला वीतभर रुंदीचा पट्टा. आपल्या छातीचं रुंद तकट आणि भरीव गर्दन फुगवून तो उभा राहिला. हा इसम एकटाच आला असता तरी मी भ्यालोच असतो. तशात त्याच्याबरोबर पोलीस. म्हणून अधिक भ्यालो.

"झालं काय?" असं मी सुकलेल्या तोंडानं विचारलं.

"ही जाहिरात तुम्ही दिली?" मिशीवाला दगड फोडल्यासारखा बोलला.

"होय!"

"कुठं आहे कुत्री?"

मी तिला खोलीतनं घेऊन आलो.

"निम्मी... निम्मी..!" तो एकदम ओरडला.

आणि तिनं एकदम त्याच्या अंगावर झडप घेऊन त्याच्या तोंडाचे मुके घ्यायला सुरवात केली. मला काहीच समजेना. हे सालं आहे काय? एक वेळचा काका, दुसऱ्या वेळची काकी! वामजींचे शंभर दगड झेलून दहा वेवारशी कुत्र्यांशी लगट करणारी ही छिनाल कुत्री... चक्क या मिशीवाल्याच्या तोंडाचे मुके घेते... सालं हे आहे काय?"

"तुम्हाला शरम नाही वाटत?" तो एकदम माझ्या अंगावर ओरडला.

"झालं काय?"

"झालं काय म्हणून विचारायला तुम्हाला शरम नाही वाटत?"

"का?"








का म्हणून विचारायला तुम्हाला शरम नाही वाटत? . . . असं तो विचारील असं वाटलं होतं. पण तो म्हणाला, "दुसऱ्याची कुत्री पळवून ती स्वतःच्या घरात लपवून ठेवायला तुम्हाला शरम नाही वाटत?"

त्याच्या त्या चमत्कारिक प्रश्नामुळे मला कुत्र्याच्या जातीत जन्माला आल्यासारखं वाटलं, आणि मागनं शेपूट खाली घातल्यासारखा मी म्हणालो,

"बाबा रे! ती आपणहून आली. . . !"

"चूप! ती आपणहून येईल कशी!"

"का?"

"खानदानी कुत्री! या भिकार घरात येईल कशी?"

"आली खरी! आली आणि हसली!"

"चूप! भिकारड्याशी ती हसेल कशी?"

"बोलली सुद्धा. . राम. . . राम. . . !"

"चूप! तुमच्याशी बोलेल कशी?"

आता ती हसली, बोलली नसती तर मी तरी तिला का ठेवली असती? मी काही कुत्रा नाही की, कुत्र्यावर प्रेम करणारा माणूस नाही.

तेवढ्यात तो मिशीवाला त्या कुत्रीला थोपटीत म्हणाला, "उगी–उगी! या चोरानं काय केलं तुला?"

आणि मी खरोखरच तिला काही केलं असं भासवीत ती रडल्यासारखा कुंः कुंः कुं असा आवाज काढू लागली आणि त्याच्या अंगाला अधिकच बिलगू लागली. सालं अक्करमाशी जनावर!

तेवढ्यात सुदैवानं बामजींना जोर चढला. ते संतापून ओरडले, "इथं कुणी ओरडायचं काम नाय! सालं ढोरगं कुत्रं! दारावर आलं. . . आम्ही दगडांनी ठेचून मारलं नाही हे नशीब समजा!"

बामजींचा दगड बरोबर बसला. मिशीवाल्याच्या मिशा खाली उतरल्या.

तो थंडपणे पोलिसाकडे वळला आणि म्हणाला, "हवालदार! पंचनामा करा. माझ्या सर्कशीतली कुत्री या हलकट माणसानं पळवून नेली. घरात डांबून ठेवली. चोरीची फिर्याद!"

साला हवालदारही सर्कशीतल्या कुत्र्यासारखा! त्यानं डायरी आणि पेन काढलं आणि म्हणाला, "बोला. . . !"

"काय की फिर्याद? क्या समजताय तुम? हम कमिशनरके पास जाएंगे!" बामजींनी हिंदीतून गोळ्या झाडून शिकार करायचा प्रयत्न केला.

पण हवालदार दबला नाही. तो म्हणाला, "प्रकरण तर चोरीचंच आहे, राव! पण मिटवून टाका."

"कसली चोरी? ती माझ्या दारावर आली!" मी शेपूट वर करून बोललो.

"मंगळसूत्रासारखा पट्टा तिच्या गळ्यात हाय, राव!"

"त्याला मी काय करणार?"

"पट्टा आहे म्हणजे तिचा मालक आहे! दुसऱ्याचा माल!"

"म्हणजे काय?" माझ्या गळ्यात पट्टा पडू नये म्हणून मी धडपडलो.

"तिला तुम्ही चौकीवर हजर करायला हवी होती!"

"कुणाच्याही गळ्यात कोणीही पट्टा बांधेल!" हे मी काहीतरीच बडबडतोय हे माझ्या लक्षात आलं.

"म्हणूनच आम्ही आमच्या कमरेला पट्टा बांधलाय, राव!" असं म्हणून हवालदारानं आपल्या कमरेचा पट्टा सुद्धा हालवून नीट केला.

"अरे पण. . ."

"प्रकरण चोरीचंच!" असं म्हणून हवालदारानं माझ्या गळ्याला पट्टा आवळलाच.

शेवटी मी दोन पायात शेपूट दामटलं आणि तडजोडीवर आलो. मिशीवाल्याला शंभर रुपये (तरी तो एकशेएकचा आकडा सांगून त्याची देणगी करायला बघतच होता!) आणि हवालदाराला वीस रुपये! एकूण एकशे वीस रुपयांचा हुंडा देऊन मी तिला मिशीवाल्याच्या हवाली केली!

ते पैसे कुठून आणि कसे जमा केले हे मी आता तुम्हाला सांगत बसत नाही. त्याला बामजी साक्षीदार आहेत.

पण एक सांगतो–

त्या दिवसापासून रस्त्यावर कुठं कुत्रं सालं दृष्टीला पडलं की माझी छाती धडधडते! देणेकऱ्याला चुकवावं तसं मी कुत्र्याला चुकवतो. अक्षरशः तोंड लपवून धूम ठोकतो! मग तो कुत्रा असो, नाही तर कुत्री असो! चोरून सुद्धा बघत नाही. तो. . . ती. . किंवा ते काय असेल ते हसेल म्हणून!

आणखी एक–

माझी वर्षाची रजा भाद्रपदात घेतो आणि ज्या प्रदेशात भाद्रपदात पाऊस पडत नाही तिथं पळ काढतो. ती झेंगटं नजरेला पडायला नकोत म्हणून!

खोटं वाटत असेल तर या बामजींना विचारा!

● ● ●





अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

अनुक्रमणिका



प्रा. सदानन्द रेगे

खांद्यावरील कॅमेरे नि इतर सामानांचं कीट कसंबसं पेलीत अनिरुद्ध बर्फ तुडवीत पुढे पुढे चालला होता. गार वारं अंगाला अक्षरशः झोंबत होतं. नजर किलकिली करूनच चालावं लागत होतं. बर्फ. . बर्फ. . .बर्फाखेरीज या विलक्षण जगात दुसरं काही नव्हतं. नुसतं बर्फ नि त्यांचं भस्म अंगांगी फासून उभे असलेले प्रचंड पहाड. शांततेचाही काही विचित्र आवाज असतो. आकाशाच्या पोटातून ओंकाराचा कल्लोळ उठावा तसा; पण तोही या पांढऱ्याफटफटीत दुनियेत नव्हता. गेले दोन महिने अनिरुद्धाला आपल्याबरोबरचे साथीदार नि हे बर्फ याशिवाय दुसऱ्या कशाकशाची संगत लाभू शकली नव्हती. सकाळी स्लीपिंग बॅगमधून बाहेर पडायचं. तोंड वगैरे धुवायचा प्रश्नच नसे. डॉक्टरसाहेबांनी एव्हाना चहा केलेला असलाच तर तो प्यायचा नि निघायचं. बर्फ तुडवीत. चालता चालता जेवढा प्रदेश डोळ्याच्या ओंजळीत येईल तेवढा बारकाईनं टिपून घ्यायचा नि वेळ झाली की हात हलवीत कँपावर परतायचं. गेले दोन महिने हे असं चाललं होतं.

आजुबाजूला होता फक्त हिमालय. पृथ्वीचाच नव्हे तर उभ्या सूर्यमंडळाचाही आकार मोजायचा मेरुदंड. ताठ उभा राहून सरळ आकाशात घुसलेला. इथल्या आकाशाचा रंगही कसा विषप्राशन केलेल्या नीळकंठासारखा होता. असा निळा अनिरुद्धानं यापूर्वी कुठं पाहिलाच नव्हता. क्षणभर त्याच्या मनात आलं, कॅमेऱ्यानं हे सारं टिपून घ्यावं. लाईट सेटींग, फोकल लेंग्थ, कलर फिल्टर्स. . कितीतरी नेहमीच्या वापरातले शब्द त्याच्या मनात झटकन् येऊन गेले. पण लगेच त्यांनी विचार बदलला. या पहाडांच्या कुशीत उठल्यासुटल्या कॅमेरा खुपसायची त्याला लाज वाटली. तसंच काही फोटो काढण्यासारखं भव्य, अद्भुत आढळल्याशिवाय इथं कॅमेरा क्लिक् करायचा म्हणजे अपर्णेचं तपस्थान असलेल्या या गिरीमालांचा अपमान केल्यासारखं होईल याची जाणीव त्याला झाली.

वीस हजार फूट उंचीवर एक्सपिडीशन आली नि तिथंच थबकली. उजवीकडे अक्षरशः तळ नसलेली गूढगहन दरी पसरलेली. वामकुक्षी करणाऱ्या राक्षशिणीसारखी. तिच्या अंगावर खेळत होत्या कड्या-सुळक्यांच्या अणकुचीदार सावल्या. वीस हजार फूट म्हणजे प्रचंड खूपच मजल होती; पण अजूनही वर नजर केली तर पर्वतमाथे दिसत होते.

वरच्या अंगाला पुढे गेलेले शेर्पा पोर्टर्सही थबकून उभे राहिले होते. डॉक्टरसाहेब काय ठरवतात ते त्यांना पहायचं होतं. आता त्यांच्यानंही पाठीवरचं ओझं

...'चंद्र सावली कोरतो' ही प्रा. सदानंद रेगे यांची कथा बऱ्याच वर्षांपूर्वी 'दीपावली'तूनच प्रसिद्ध झाली होती ...ती अद्यापि अनेकांच्या स्मरणात आहे...श्री. रेगे यांच्या कथांचा विषय नेहमीच वेगळा असतो...वातावरणही वेगळेच असते...आणि म्हणूनच त्यांच्या लेखनातून वाचकांना एक वेगळाच आनंद लाभत असतो...तशाच प्रकारची ही आणखी एक कथा...

पेलवत नव्हतं. डॉक्टरसाहेब गाईड्सबरोबर काही बातचीत करीत होते. बोलताना त्यांच्या तोंडातून वाफा निघत होत्या.

त्यांच्या हातवाऱ्यांवरून वाटत होतं की डॉक्टरसाहेबांना आणखी पुढं जाण्यात काही हशील वाटत नव्हतं. त्यांना मागे परतायचं होतं. ते पथकाचे नेते होते. ते देतील तो हुकूम सर्वांना मानायलाच हवा होता. अनिरुद्धालाही याची जाणीव होतीच. पथकाचा करार दोन महिन्यांचा होता अन् तो वाढविण्यासारखं अजपर्यंत तरी काही घडलं नव्हतं. दोन महिने. . एवढ्या अवधीत करायचं असं पथकानं ठेवलं नव्हतं. बर्फ. . बर्फ. . . नुसतं बर्फ तुडवीत पथकातले लोक कडेकपारी, दऱ्याखोरी पार करीत चालत होते. हिमवादळांना तोंड देत होते. हिमकडयांशी लपंडाव खेळत होते. केवळ एकाच ध्यासासाठी. . पण कशासाठी हा ध्यास? कशासाठी हा हव्यास?

सारे शोधात निघाले होते तिथल्या बर्फात उमटलेली हिममानवाची पावलं पहायला. त्याच्या अस्तित्वाची कुठं कसली खूण दिसते का याचा शोध त्यांना घ्यावयाचा होता. पण अजून तरी काहीच यश हाती लागलं नव्हतं.

दोन महिने. . फुकट. . फुकट गेलेले दोन महिने. . . नुसतं डोचकं फिरल्यागत वैराण भटकणं . . निरर्थक. . . वांझोटं.

नाकारण्यात अर्थ नव्हता. ही एक्सपिडीशन फुकट गेली होती. इतक्या मूर्खपणाच्या कामासाठी हिमालयात कुणी पाऊलच ठेवलं नसेल. चार–पाच महिन्यांपूर्वी एका इंग्रजी दैनिकाच्या संपादकाकडून अनिरुद्धाला बोलावणं आलं. संपादकानं त्याला एक फोटो दाखवला. पुसटसा. त्या फोटोतही डोळे किलकिले करूनच पहावं लागत होतं. एका ग्लायडर विमानातून तो घेण्यात आला होता. मोटर नसलेल्या. एकवीस हजार फूट उंचीवर. त्या फोटोत माणसांसारखं काही दिसत होतं. पण या माणसांच्या अंगावर कपडे नव्हते. मुळीसुद्धा नव्हते. हिमालयात एवढ्या उंचीवर माणसं नागडीउघडी जगू शकतील?

संपादक अनिरुद्धाला सांगत होता : होय, ग्लायडरच. वैमानिकानं स्वतः तयार केलेलं ग्लायडर. या ग्लायडरमधून त्याला एव्हरेस्टभोवती घिरट्या घालायच्या होत्या. पणं जमलं नाही. परतताना त्याला एका बर्फाच्या कड्यापाशी कसली तरी हालचाल जाणवली. त्यानं दुर्बिणीतून खाली पाहिलं. प्रश्नच नव्हता.. माणसंच .. चक्क माणसं .. एकवीस हजार फूटावर.. अंगावर चिंधुकही नसलेली. पटकन् त्यानं आपल्या कॅमेऱ्यानं छायाचित्रं घेतली. अन् त्यातलं फक्त एकच डेव्हलप होऊ शकलं.

अनिरुद्धाची काही खात्री पटेना. त्याला वाटलं हा चक्क बनवाबनवीचा प्रकार आहे. त्यानं तसं संपादकाला बोलूनही दाखवलं.

संपादक म्हणाला : आम्ही आवश्यक ती चौकशी केलीय्. हा फोटो त्यानं ग्लायडरमधून एकवीस हजार फूट उंचीवर घेतल्याची आम्ही शहानिशा करून घेतलीय्. पण हा फोटो छापण्यासारखा नाही. काही दिसणार नाही त्यात हा प्रसिद्ध केला तर. आम्हाला जवळची छायाचित्रं हवेयत. स्पष्ट. तू घ्यायला तयार आहेस? पडतील तेवढे पैसे देऊ. शिवाय तुझं नावही. . .

अनिरुद्ध क्षणभर भांबावल्यासारखा झाला. म्हणाला, म्हणजे या कामासाठी मला पहिल्यांदा माऊंट एव्हरेस्टवर चढायला हवं.

'अंहं . . . माऊंट एव्हरेस्ट नव्हे. गौरीशंकर. एव्हरेस्टच्या जवळच तेवीस हजार फूट उंचीवर असलेलं शिखर. खरं तर गौरीशंकरही नव्हे ! तिथल्याच ग्रूपमधलं एक छोटसं शिखर. तुमच्यासारख्या गिर्यारोहकाला हे काही कठीण नाही.'

अनिरुद्ध डोळे किलकिले करून नुसतं ऐकत होता.

'जिथं त्यानं ती माणसं पाहिली ते ठिकाण नक्की कुठं आहे हे त्या वैमानिकाला सांगता आलं नाही. पण त्यानं आपल्या परीनं तिथल्या परिसराचे नकाशे करून दिले. ते आम्ही इंग्लंड-ऑस्ट्रेलियाला पाठवून दिले. त्यांचं उत्तर आले : हे नकाशे बरेचसे जमणारे आहेत. आजवर एवढे लोक या प्रदेशात गेले, पण इथं मात्र अद्याप कुणी गेलेलं नाही . . . '

अनिरुद्ध एकीकडे ऐकत होता, एकीकडे निर्णय घ्यायचा प्रयत्न करीत होता.

'या प्रदेशात मन्सून यायला चार-पाच महिन्यांचा अवधी आहे. दोन एक महिने आपल्याला तयारी करायला लागतील. दोन महिने तुला हिमालयात मनमुराद फिरता येईल. इथनं आम्ही तुला काठमांडूला सोडू विमानानं. वेळोवेळी तुमच्या वाटेवर अन्नाची रसदही विमानानं सोडली जाईल. . . . '

'पण मी एकटा कसा जाऊ ?'

'एकटयानं नव्हे ! डॉ. कोठारे तुमच्याबरोबर येतील लीडर म्हणून.'

'डॉ. कोठारे ? हे कोण ?'

'इथल्याच एका कॉलेजात प्राणीशास्त्राचे प्रोफेसर आहेत. या फोटोत दिसतात ती माणसं आहेत का आणखी कुणी आहेत, ठाऊक नाही. पण ती कोणत्या ना कोणत्या जातीची प्राणीमात्रं तरी नक्कीच आहेत. म्हणूनच ही निवड. मात्र तुम्हा सर्वांना हे सारं गुप्त ठेवावं लागेल. तू फक्त तिथं जायचं नि कॅमेरा क्लिक् करून यायचं. . . '










## सीमेचा खिमा

( राजकीय दिवाळा वाजण्यापूर्वी )

**साहित्य :– सीमाभागातील गरीब बकरा; आगीत ओतण्याचे 'शांतगोंडा' छाप तेल; चरखा छाप मसाला; होयबा इंडस्ट्रीजचा लवंग अर्क.**

**कृती :– सीमाभागातील गरीब बकरा पकडून अहिंसा मार्गाने त्याला 'साफ' करावे. नंतर शाब्दिक छळ करून त्याचा पुरा कीस पाडावा. त्याला नंतर 'शांतगोंडा' तेलाची फोडणी देऊन हा लगदा बरीच वर्षे भिजत ठेवावा. अगदी वास यायला लागला की मुंबईतील 'होयबा' इंडस्ट्रीजचा लवंग अर्क दोन थेंब सोडावा. हा सर्व गोळा 'चरखा' छाप मसाला पेरून, वरचेवर परतवण्यास (दिल्ली ते मुंबई–दिल्ली ते म्हैसूर असे) विसरू नये. चमचमीतपणासाठी आगीत ओतण्याचे तेल वापरण्याची खबरदारी घ्यावी.**

**कैक वर्षे कष्ट घतल्यानंतर, सीमेचा झालेला असा खिमा पाहून त्याच्या खमंगपणाची नीट कल्पना यते !**

' तुम्हाला काय वाटतं ? ही माणसं आहेत ?'

' माणसं नसली तरी माणसांसारखीच दिसणारी ही अस्वलं असतील किंवा गोरीला माकडंही असतील. पण तेच तर पहायचंय्. तिथं जाऊन बघितल्याशिवाय कसं समजणार ?'

दोन महिने . . . फुकट . . . फुकट गेलेले दोन महिने . . .

नमची बझारच्या रस्त्यावर नेपाळी लोक भेटत. तेही आपापसात हिममानवा-संबंधी बोलत. कुणी म्हणत, माझ्या आजो-बांनी पाहिलंय्. कुणी म्हणत, चक्क तो माणसासारखा दिसतो नि माणसासारखाच दोन पायांवर उभा रहातो. काहींना संशय वाटे. ते म्हणत, तो यती आहे. राक्षस आहे. रात्री कान देऊन ऐकलं तर गौरीशंकराच्या दिशेनं ढोल पिटलेले ऐकू येतात. कुणीतरी यात असल्यासारखं वाटतं. पण सगळ्यात खात्रीचा पुरावा होता म्हणजे बुद्धधर्माचा. भिख्खूंनी बंधन घालून दिलं होतं. हिमालयात कुणाच्याही जिवाला कधी दगाफटका होता नये. हिमालयात अन् जिवाला दगाफटका ? अनिरुद्धाला काहीच कळेना क्षणभर.

नुसत्या माकडकथा . . . पुराणं . . . फुकट गेलेले दोन महिने . . .

पायथ्याचा पठाराचा भाग . . . भंवतालची हिरवीगार झाडी . . . धो धो वहाणारा पाऊस . . . घनदाट अरण्यं . . . . . . तुफान ऊन . . . अन् मग एकदम अदृश्य झालेला भंवतालचा हिरवा रंग . . . आता राज्य होतं नुसतं खड-कांचं . . . पहाडांचं . . . घोंगावणाऱ्या वाऱ्याचं . . . अजून उंच . . . उंच चढणं काही संपत नव्हतं. . . . आता नजर टाकावी तिथं वर्फाचंच तेवढं भस्म दिसत होतं. . . . अन् . . . वर . . . आणखी वर . . . आणखी वर . . . होतं ते शिखर . . . ते फोटोतलं शिखर . . . जिथं दिसू नये ती हालचाल दिसली होती त्या माथेफिरू वैमानिकाला . . . स्वतःच तयार केलेलं ग्लायडर घेऊन इथं कशासाठी आला होता तो पागल ? . . .

अन् या दोन महिन्यात अनिरुद्धाला डॉक्टरसाहेबांचाही इतका वीट आला होता की कधी कधी त्यांना एखाद्या कड्यावरून गुपचूप ढकलून द्यायचा विचारही त्याच्या मनात डोकावून जाई. हा माणूस ताडमाड वाढला होता पण रसिकता औषधापुरतीही नव्हती या प्राणीशास्त्राच्या प्रोफेसरापाशी. सदान्‌कदा त्याच्या फॉर्मल्डिहाईडचा. अन् सगळ्या गोष्टी फक्त दोन वर्गातच बसवायचं त्यांना ठाऊक होतं. व्हर्टीब्रेट. इन्व्हर्टिब्रेट.

त्या धारदार कड्यावर उभं राहून त्यानं आपल्या बर्फानं माखलेल्या गॉगल्स-मधून अनिरुद्धानं पाहिलं तेव्हा डॉक्टर-साहेब गाईडसशी हुज्जत घालीत असल्याचं त्याला दिसलं. किंचित् वरच्या बाजूकडे बोट दाखवून त्यांनी शेर्पांना तंबू ठोकण्याचा आदेश दिला तेव्हाच अनिरुद्धानं ओळखलं की, हा आपला शेवटला कॅम्प. करारा-प्रमाणे दोन महिने होऊन काही दिवस लोटले होते. आता डॉक्टरसाहेब आणखी पुढं जायला बांधलेले नव्हते. हात हलवीत असलं तरी पथक मागे घेण्यात त्यांचं काहीच चुकत नव्हतं. फोटोतली जागा आता अगदी हाताशी आलेय् अशी आशा अनिरुद्धाला वाटत होती अन् तेवढ्याच-साठी केवळ आजवर त्यांनी माघारी परत-ण्याचा आदेश दिला नव्हता. एक नवा स्पेसीमेन. जमलं तर आपल्या संग्रहात असावा असं प्राणीशास्त्राच्या कुठल्या प्रोफेसरला वाटणार नाही ? नवा स्पेसीमेन दोन पायांचा. ताठ उभं राहून चालणारा . . . चालणारा . . . पण कोण ?

पण एवढ्या उंचावर येऊनही त्याच्या अस्तित्वाची पुसटशीसुद्धा चाहूल कुठं लागली नाही. याच्यापुढे तरी काय असा-यचंय् ? नुसतं बर्फ . . . मागं गेलेला प्रदेश जेवढा अनोळखी तेवढाच पुढचाही अज्ञात . . .

पण शेर्पा लोक जेव्हा नायलॉनचे निळे-पिवळे तंबू ठोकू लागले तेव्हा नाकासमो-रच्या सुळक्याकडे अनिरुद्धानं अगदी सहज नजर टाकली अन् उगीचंच त्याचं मन त्याला सांगू लागलं : अगदी त्या फोटोत होता तसाच दिसतोय् नाही हा पहाड ? खरंच . . . अगदी तसाच . . . आपण आणखी थोडं पुढं गेलो तर . . .

पण डॉक्टरसाहेबांनी घेतलेला माघा-रीचा निर्णय आत्ता फिरण्यासारखा नव्हता.





वस्स् झालं, आत्ता पुढं कशाला नाहक बर्फ तुडवीत जायचं ? असता इथं हिम-मानव कुठं तर एव्हाना दिसलाच असता आपल्याला.

' खरं तर एक आठवड्यापूर्वीच आपण परतायला हवं होतं. पण केवळ तुझ्या शब्दाखातर इथवर मजल केली. कोणत्याही क्षणी आता पावसाला सुरुवात होईल. अन् तसं का झालं तर आपली कंबक्तीच भरली म्हणायचं. आपल्याला आता मागे वळल्यावाचून गत्यंतरच नाही. There is simply no other go.

'मला कळतंय् अनिरुद्ध, तुला किती वाईट वाटत असेल ते. पण नेता म्हणून मला योग्य निर्णय योग्य वेळी घ्यायलाच हवा.'

त्या रात्री स्लिपिंग बॅग्जमध्ये पडल्या-पडल्या ते दोघं खूप उशीरापर्यंत बोलत राहिले होते.

अनिरुद्ध डॉक्टरसाहेबांना म्हणत होताः 'जसजसा अधिक विचार करावा तसतसा हिममानवाच्या असण्यावर माझा विश्वास बसत चाललाय्. नमची बझारच्या वाटे-वर ऐकलेल्या गोष्टी आता मला भाकड-कथा असतील असं वाटत नाही. डॉक्टर-साहेब, एक महत्त्वाची गोष्ट माझ्या लक्षात आलेय् ती अशी की हिममानव दिसला म्हणून सांगणाऱ्या माणसांना तो नेमका पहाटेच्याच वेळेस नि पहाणारा एकटाच असताना दिसलेला आहे. विलक्षण आहे, नाही ?'

डॉक्टरसाहेबांना खरं तर झोप येत होती. पण अनिरुद्धानं विचारलेल्या प्रश्नाला आपण काहीच उत्तर दिलं नाही तर कदाचित त्याचा काही गैरसमज होईल म्हणून ते म्हणालेः 'असेलही तसं. खरं काय कुणी सांगावं ? पण मला तर हळूहळू खात्रीपूर्वक वाटायला लागलंय की ज्याला लोक हिममानव समजतात ती एक अस्वलाची किंवा तसल्याच जातीच्या दुसऱ्या एखाद्या प्राण्याची—ज्याला आम्ही आमच्या शास्त्रात अॅन्थ्रोप्रॉईड म्हणतो—छायाकृती असावी. अन् अशी जनावरं माणसांनी तुडवलेल्या वाटेवर कधीच यायची नाहीत. या इथल्या पहाडातून सोईस्कर अशा जाणाऱ्या वाटा जवळ-जवळ नाहीतच मुळी.'

पण अनिरुद्धाची अजून खात्री होत नव्हती. 'डॉक्टरसाहेब, मला तर वाटतं की पहिल्यापासूनच एक मोठी चूक करीत आलोय्. एवढी माणसं बरोबर घेऊन बर्फात कुठं त्याच्या पावलांचा मागोवा घेण्यातच आपलं सारं चुकत होतं त्यामुळे कित्येक मैलांवरून त्याला नक्कीच आपली चाहूल लागली असली पाहिजे. डॉक्टर, एक गोष्ट लक्षात घ्या. ज्यानं तो फोटो काढला तो ग्लायडर विमानात बसलेला होता. त्या विमानाला मोटार नव्हती. ते विमान अगदी चूपचाप होतं.'

डॉक्टरसाहेबांना झोप अनावर झाली होती. अनिरुद्धाच्या हे लक्षात आलं होतं. पण ही संधी आपण घालवली तर पुन्हा आयुष्यात ती आपल्याला मिळणार नाही यावद्दलही त्याची पक्की खात्री होती.

स्लिपिंग बॅगमधून डोकं आणखी वर काढीत तो डॉक्टराना म्हणाला, "मला एकट्याला पुढं जाऊ द्या. मी घेतो शोध त्याचा "

डॉक्टरसाहेब नुसते खाकरले.

"मी एका शेर्पा गाईडला घेऊन जातो. अजून मागे वळायला खूप अवकाश आहे. बरोबर काही सामान नेत नाही आम्ही. फक्त ऑक्सिजन, एक वेळचं खाणं नि माझे कॅमेरे; तुम्ही लोकांनी अगदी चूपचाप बसून रहायचं. दुपारपर्यंत आम्ही नक्कीच परत येऊ. डॉक्टरसाहेब, जाण्यापूर्वी एवढा शेवटचा प्रयत्न करूयाच आपण. नंतर उगीच हुरहूर नको लागायला."

डॉक्टर म्हणाले, 'तू झोप आता. मग पहाता येईल.' 'मग नाही, डॉक्टर. मग नाही. आता मगबिग काही नाही. ही मग केव्हाच येणार नाही. पहाट झाली की मी निघणारच . . . '

'ठीक आहे. निघणार तर निघ. पण बरोबर गॅस गन् न्यायला विसरू नकोस. यदाकदाचित् तो भटलाच तर '

'थँक्स, डॉक्टर, थँक्स अ लॉट . . '

'त्याचा चांगला स्पष्ट फोटो काढ-लास तर जग विश्वास ठेवील. केवळ मी












हिममानव पहिला असं सांगून कुणी ऐकणार नाही.'

'जाणीव आहे मला त्याची, डॉक्टर.'

—पहाटे तो शेर्पा गाईडला घेऊन निघाला तेव्हा आकाशात चंद्र नव्हता. होतं झोंबणारं वारं दुसऱ्या कुठल्यातरी ग्रहांवरून वाहणारं. पुढे . . पुढे . . थोडे पुढे जायचं ... पहाटेच्या वेळी ... पाऊल न वाजवता.

पण बर्फावर त्यांची पावलं कुरकुरु आवाज करीतच होती. क्वचित एखादा बर्फाचा कडाही कोसळून पडे नि त्याचा कानठळ्या बसविणारा आवाज येई. पूर्वेकड दिवस अस्फुट फुटायला लागला होता. ऑक्सिजनचे लोकरी मुखवटे संभाळीत ते दोघं हळु हळू, हळु हळू चालले होते. फुफ्फुसात चावरं वारं भरीत . . . वर : . . वर . . .

थोड्या वेळानं अनिरुद्ध थांबला. थर्मास उघडून तो झाकणातून चॉकलेट प्यायला. थोडं त्यानं शेर्पाला दिलं. मग एकदम त्याच्या पाठीवर थाप मारीत तो समोर उभ्या असलेल्या सुळक्याकडे बोट दाखवून मोठमोठ्यानं हसू लागला. पहाटेच्या सोनेरी प्रकाशात तो सुळका केशरानं अभ्यंगस्नान करीत होता. तेवढ्यात शेर्पानं मागे वळून पूर्वेकडे पाहिलं. काळ्याकुट्ट ढगांचा एक प्रचंड कळपच्या कळप क्षितिजावर दिसू लागला होता. अनिरुद्धाला उद्देशून तो आपल्या भाषेत काहीतरी म्हणाला नि पार खाली राहिलेल्या कँपकडे अंगुलीनिर्देश करू लागला. मोठमोठ्या कड्यांच्या भिंतीआड कँप केव्हाच दिसेनासा झाला होता.

अनिरुद्धानं पुढचा रस्ता धरला तेव्हा शेर्पानं त्याला बांधलेली नायलॉनची दोरी काढून घेतली.

आता पायाखालचा- रस्ता बर्फानं तुडुंब भरलेला असला तरी बराचसा सपाट होता. आता अनिरुद्ध एकटाच चालला होता.

सूर्य किंचित् वर सरकला अन् वारं पुन्हा सोसाट्याचं वाहू लागलं. थोड्याच वेळात चांगलीच हिमवृष्टी होणार हे अनिरुद्धाच्या लक्षात यायला वेळ लागला नाही. येऊ घातलेल्या हिमवृष्टीचा एक प्रकारचा विचित्र वास हवेत दरवळू लागला होता. आता त्याला जमेल तेवढं झपाझप चालायलाच हवं होतं.

निळं, निळं . . . अगदी निळं भो ऽ ऽर आकाश नि अलगद वर वर सरकणारा सूर्यप्रकाश. कँप मात्र अजून काळोखातच डुंबत होता. अन् एकदम तो सुळका त्याच्या अगदी पुढ्यात उभा राहिला. कडेनं एक पेन्सिलीच्या रेषेसारखी पायवाट गेलेली ऐन बर्फातून थोडी पावलं तो पुढं सरकला. समोर होता भिंतीचा उतार . . . अन् एकदम तो थबकला . . . श्वास रोखून धरून अन् एका खडकाचा आधार घेऊन तो निश्चल उभा राहिला . . .

प्रश्नच नाही . . . अगदी त्या फोटोतल्याचसारखी प्रचंड सावली . . .

डोळे किलकिले करून अनिरुद्ध पाहू लागला. एकदम एकीच्या तीन सावल्या झाल्याचं त्याला स्पष्ट दिसू लागलं. आजुबाजूच्या पांढऱ्याशुभ्र देखाव्यात पार मिसळून गेलेल्या. अनिरुद्ध उभा होता तिथनं खाली शंभर फुटांवर बर्फात काही हलत होतं. एक मोठी सावली. दोन लहान.

एकवीस हजार फूट उंचीवर, त्या किर्र प्रदेशात त्याच्या हृदयाचे ठोके त्याला स्पष्ट ऐकू येत होते. एखादा हिमप्रपात आपापल्या अंगांगातून वहात असल्यासारखं त्याला वाटत होतं. क्षणभर त्याचा स्वतःवर विश्वासच बसेना. अरे हे तर अद्‌भुत आहे . . . अक्षरशः अद्‌भुत . . . विलक्षण . . . प्रश्नच नाही . . . हिममानव . . . हा हिममानव . . . अगदी आपल्या डोळ्यासमोर वावरतोय् . . . आई नि तिची दोन मुलं . . . नव्हे हिममाता नि तिचे दोन हिमपुत्र . . . डॉक्टरसाहेब असते तर म्हणाले असते . . . व्हर्टिब्रेटस् . . .

तिघांच्याही अंगावर लव होती दाट नि बर्फासारखी पांढरी पांढरीशुभ्र. ती मादी अगदी हुबेहूब एखाद्या स्त्रीसारखीच दिसत होती. अंगापिंडानं, उंचीनं जवळ जवळ तेवढीच. हात फक्त किंचित लांब होते. अन् बाई खूपच ताकदवान दिसत होत्या. मांड्या घसघशीत, (इथं अनिरुद्धाला पु. शि रेग्यांच्या कवितांची आठवण झाली. अगदी अचानक.) पाय एकूण शरीराच्या मानानं तोकडे. बाकी सगळं अगदी 'झक्क तुझी रे काकू'सारखं. स्तन घट्ट . . . टपोरे . . .

छे, छे, कोण म्हणतं ही अस्वलं आहेत म्हणून ?

अनिरुद्ध पार गोठल्यागत उभा होता. बर्फाच्या पुतळ्यासारखा. छे, छे, ही चक्क माणसं आहेत. माणसं . . . मध्येच त्या स्त्रीनं एका मुलाला उचलून घेतलं नि माणसाची आई त्याला पाजते तसंच ती त्याला पाजू लागली . . . सगळे हावभाव अगदी थेट मानवी स्त्रीसारखेच . . .

खरंच, कोण होती ही तिघं ? माणसं म्हणावीत तर एवढ्या उंचीवर, ऐन बर्फात ही कशी काय रहातात ? खातात काय ? रहातात कुठं ? ही पर्वत उतरून खाली कधीच का गेली नसतील ? अन् तेवढ्यात त्या बर्फातल्या स्त्रीचा हसण्याचा आवाज आला. ती आपल्या तान्हुल्याला गुदगुल्या करीत होती अन् स्वतःच मोठमोठ्यानं हसत होती. डॉक्टरसाहेब म्हणाले होते : माणसासारखं हसणं कुठल्याच प्राण्याला जमत नाही !

छॅ, आपण नुसतं पहातच काय राहिलोय् बावळटासारखं ? झटकन् आधी फोटो काढून घ्यायला हवा. मग गॅस गन् वापरून त्या तिघांना बेशुद्ध करायचं नि शेर्पाकरवी डॉक्टरसाहेबांना निरोप पाठवायचा...या... हवी ती शिकार हाती आलेय...काम सोळा आणे फत्ते...

हिमवृष्टीला सुरुवात झाली होती.

पण, डोळ्यासमोर उभं असलेलं ते सुंदर दृश्य त्याला बिघडवायचं नव्हतं... तो अजून तसाच उभा होता निश्चल... आईचं नि मुलाचं कौतुक पहात. मग

एकदम ती दचकल्यासारखी झाली. घावऱ्या-घुबऱ्या आजूबाजूची चाहूल घेऊ लागली...

सरळ सरळ तिची नजर आता अनिरुद्धाच्या नजरेला भिडली होती.

आपण एका प्रचंड कडयाच्या सावलीत उभे आहोत नि तिला आपण सहजासहजी दिसणार नाही, याची पक्की जाणीव अनिरुद्धाला होती. पण अकस्मात तो थिजल्यासारखा झाला.

ती त्याच्याकडेच नजर टवकारून पहात होती. शंकाच नाही. त्याला तिनं पाहिलं होतं.

हळू हळू तिनं आपला उजवा हात वर करून किंचित् हलवल्यासारखा केला. ती दोन मुलं आनंदानं उडया मारू लागली. त्याच क्षणी अनिरुद्धाच्या लक्षात सारा प्रकार आला...

त्यानं मागे वळून पाहिलं. त्याच्यापासून अवघ्या पाच यार्ड अंतरावर त्या कुटुंबाचा पुरुष उभा होता ! एक वर्फाची प्रचंड सुरी आपल्या शरीरातून कुणी आरपार भोसकतो आहे असं अनिरुद्धाला क्षणभर वाटलं. ती अगदी पुढयात उभी असलेली अवाढव्य आकृती पाहून त्याची दातखिळीच बसायला आली होती !

केवढा प्रचंड होता तो देह ? त्या स्त्री-देहाच्या नक्कीच दुप्पट...

गॅस गन् पटकन् उचलण्यासारख्या अंतरावर नव्हती. छट्, काऽऽही करता येण्यासारखं नव्हतं. हा आठ फूट उंचीचा, मांडयांएवढा दंडांचा,निळया डोळयांचा...

पुरुष...हिममानव...

त्या निळया डोळयात एक विलक्षण चमक होती. एक विचित्र समज होती. अन् आणखीनही खूप होतं... जे माणसाला कधीच दिसत नाही ते...

तो पुरुष अगदी निश्चल उभा होता. निश्चल नि निश्चयी. बर्फात घट्ट पाय रोवून...

खरंच किती सुंदर...

कॅमेऱ्यानं हे सारं सौंदर्य टिपता आलं असतं तर... वा... काय छाती... काय खांदे... पांढरे पांढरे शुभ्र दात ... अन् चेहऱ्यावरचं गांभीर्य... उदात्तता... निळया डोळयातला तो विश्वास. .तो निर्भीडपणा- . .अंगावर पांढरीशुभ्र लव. .जाड मान. . छोटे कान... पायाची लांब लांब बोटं...

दोघांच्या नजरा परस्परांना भिडलेल्या मध्ये एक तळ नसलेली दरी.. आरंभ नसलेली.. अंत नसलेली.. कालातीताची.. अद्भूताची.. एका कडयावर होता माणूस उभा अन् दुसरीकडे.. दुसरीकडे ... कोण.. कोण होतं ? कोण म्हणायचं ? हा नुसता असा खडकासारखा उभा काय आहे ! हल्ला का करीत नाही हा आपल्यावर ? आपल्याकडून काही हालचाल होते का याचा तर अंदाज घेत नसेल तो ! आपण कॅमेरा काढू. कदाचित् गॅस गन् पटकन उचलून घेऊ असा संशय तर नसेल आला त्याच्या मनात ... कोण ... आहे तरी कोण हा ? मानव...हिममानव...अर्धमानव...माकड. . गोरीला...अस्वल...?

अनिरुद्ध जरासुद्धा हलला नाही. त्याची नजर आपोआपच खाली वळली. तो पुरुष समजायचं ते समजला. त्याच्या निळया डोळयात क्षमेची वीज चमकून गेली. अनिरुद्धानं खाली वाकून त्याला कुर्निसात केला नि तसाच तो मागे मागे चालू लागला. तो अजून तसाच आपल्या जागी, बर्फात घट्ट पाय रोवून, ताठ उभा होता. अनिरुद्धानं मागे जाताना दोन्ही हात वर केले, तळवे वाहेरच्या अंगाला वळवले, नि चेहऱ्यावर शालीन हासू आणून तो जो एकदम वळला नि धूम पळत सुटला की एकवीस हजार फुटांवर आपल्या अंगाला दरदरून घाम कसा काय फुटला ही साधी गोष्टही त्याच्या अजिवात लक्षात आली नाही.

आता आपल्या जिवाला धोका नाही हे पहाताच अनिरुद्धानं मागे वळून वर पाहिलं. तो मनुष्य अजून तिथंच, तसाच उभा होता. अनिरुद्धाच्या दूर दूर जाणाऱ्या आकृतीकडे गंभीरपणे पहात; पण आत कुठेतरी तो त्याला हसतही असला पाहिजे.

आता पायाखाली नुसतं बर्फ होतं ... नुसतं बर्फ ... वर तो हिमपुरुष उभा होता. ताठ. प्रचंड पुतळयासारखा. अन् पलीकडून कुठून तरी कुणाच्या तरी हसण्याचा आवाज येत होता ... एखादी आई आपल्या मुलाबरोबर खेळत असावी तसा ...

अनिरुद्ध कॅपवर परतला तेव्हा डॉक्टरसाहेब निरवानिरव करीत होते. पूर्वेकडे, खालच्या अंगाला मन्सूनचे ढग जमत चालले होते. आता इथं थांबण्यात काहीच अर्थ नव्हता.

अनिरुद्धानं धाडकन् आपल्या खांद्यावरचे कॅमेरे खाली टाकले नि जोरजोरानं श्वास घेत तो खाली बसला.

डॉक्टरसाहेबांनी त्याला विचारलं; गॅस गन कुठाय् ?'

अनिरुद्ध काही बोलला नाही.

त्याच्या तोंडून शब्दच फुटत नव्हता. हिमालयासारखा तोही अवाक् झाला होता.

• • •

ही दिवाळी व नूतन वर्ष आमच्या ग्राहकांस व हितचिंतकांस सुखाचे जावो



# आकर्षक व शानदार

गेली कित्येक वर्षे 'दीपावली'ची सर्व रंगीत छपाई दर्जेदार करण्याचे श्रेय आम्हालाच आहे

आमची अद्यावत यंत्रसामुग्री
तुमच्या सेवेला सज्ज आहे.

☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆ ☆

**आशा प्रिंटरी, १२ वी खेतवाडी, मुंबई ४**

टे. नं. ३५८३७६











अनुक्रमणिका

# ऐणार-येणार

म्हणजेच उद्यांच्या औद्योगिक प्रगतीची (चा)हूल
















## डिपार्टमेंट ऑफ अॅप्लाइड केमिस्ट्री.

हातबॉंब, गनपॉवडर, सुरुंग, डिटोनेटर्स, मोलोटोव्ह कॉकटेल, यांचे शिक्षण... थिअरी आणि प्रॅक्टिकल्स!






# 'भक्ष'लवादी




## डिपार्टमेंट ऑफ सायकॉलॉजी.

अरुण डोंगरे.

ब्रेनवॉशिंग आणि गर्दीचे मानसशास्त्र या विषयांत स्पेशलायझेशनची सोय आहे!

## डिपार्टमेंट ऑफ फिलॉसॉफी.

'कोणत्याही' परिस्थितीत माओच्या विचारांशी प्रामाणिक राहण्याचे सर्वांगिण शिक्षण!






# विद्यापीठ

## डिपार्टमेंट ऑफ बायॉलॉजी.

शरीरशास्त्राचे समग्र शिक्षण!







## डिपार्टमेंट ऑफ सोशिओपोलिटिकोइकॉनॉमिक्स.




अनुक्रमणिका



रेडग्रीन-कॉकटेल.
सरकारमान्य दरात लवकरच विक्रीस येणार.
अल्पसंख्यांकांस खास सवलतीचे दरांत !
REDG
रशियन तज्ञांच्या खास सहकार्याने - मोलोटोव्ह (INDIA) लिमिटेड - यांनी बनविलेले.




मध्यम वर्गीयांचे फार दिवसांचे
स्वप्न साकार होणार !
लवकरच रस्त्यावर धावूं लागणार...
मिनी कार.
किंमत फक्त 23 हजार
रॉकेलवर चालणारी... ताशी दीडशे मीटर वेगाने धावणारी......



## दीपावली-शुभचिंतन !

आमच्या सर्व ग्राहकांस, व्यापारी बंधूस व हितचिंतकास

ही दिवाळी आनंददायी जावो व नूतन वर्ष सुखसमृद्धीचे जावो















# साठा उत्तरांची कहाणी

प्रा. सुभाष भेंडे

आटपाट नगर होतं. तिथं एक माणूस रहात होता. घरचा मोठा गब्बर होता. वडिलार्जित इस्टेट होती; पण नोकरीचाकरी काही नव्हती. दिवसभर खावं–प्यावं; सकाळ–संध्याकाळ भटकत सिनेमा–नाटकं पहावीत–असं आयुष्य चाललं होतं.

एक दिवस भल्या सकाळी त्यानं ठरवलं–आपण एक मासिक काढायचं. उच्च अभिरुचीला वाहिलेलं. विचारपरिप्लुत (की लुप्त?) असं. संपादक म्हणून मिरवायला मिळेल. पत्रकार परिषदेला जायला मिळेल. परदेशी वकीलतीत जाऊन परदेशी मद्य प्यायला मिळेल.

मग त्यानं 'ज्ञानपिपासू' मासिक काढलं. जाडे जाडे विद्वान गोळा केले. त्यांच्याकडून लेख लिहवून घेतले. 'सौंदर्यशास्त्र आणि उत्क्रांती'–'हेगेलची कलाविषयक उपपत्ती' 'अस्तित्वाचे नवे मान' 'ज्ञानेश्वरीतील ड' असे लेख प्रसिद्ध होऊ लागले. पचायला मोठे जड–पण समाजाचं आरोग्य सुधारतील असे. जनतेच्या दृष्टीची क्षितिजं रुंद करणारे. त्यांच्या चिंतनाला खाद्य पुरविणारे.

वर्ष गेलं–दीड वर्ष गेलं. मासिक काही खपेना. शंभरएक वर्गणीदार मिळेनात. लोकांनी हाय खाल्ली. अंकांची थप्पी लागली. नगरीत कुणी पुरुषानं स्त्रीला धक्का मारला तर ती स्त्री विचारायची–'काय रे मेल्या–डोळ्यापुढं पिपासू दिसतंय् की काय?' कार बंद पडली तर कारवाला कारला विचारायचा–'समोरून 'पिपासू'चा लेखक येतोय् की काय?' पोर रात्री झोपेनासं झालं की आई म्हणायची –'पिपासू'चा संपादक येईल हं–गप्प झोप!'

पैसे सगळे संपून गेले. बँकेतली शिल्लक शून्यावर आली. संपादक रडकुंडीला आला. साऱ्या विद्वानांना हाकून दिलं. 'ज्ञानपिपासू' बंद केलं; पण छापखान्याच्या शाईचा वास नाकात घोटाळू लागला. संपादकाची खुर्ची खुणावू लागली. मग त्यानं दुसरं मासिक काढलं. नाव 'उर्वशी' ठेवलं. शृंगारकथांना वाहून टाकलेलं. जनतेचं मनरंजन करणारं.

आधी त्यानं 'स्पर्शकथा' विशेषांक काढला. मग 'चुंबनकथा विशेषांक'. लोक म्हणाले–आणखी हवं. आणखी काही तरी हवं. मग त्यानं 'आलिंगनकथा' विशेषांक काढला.' वाचकांचं तरी समाधान होईना. 'आणखी हवं–प्रिय संपादक–आणखी काहीतरी हवं!' मग 'उरोजकथा विशेषांक' निघाला. 'कमरकथा विशेषांक' प्रसिद्ध झाला. तरी वाचकांची मागणी वाढली–'आणखी हवं'–संपादक कमरेखाली वार करायला तयार होईनात. पहिल्या अंकात नायक नायिकेला स्पर्श करायचा मग दिवा मालवायचा. मग तो चुंबन घेऊन दिवा मालवू लागला. अखेरीस लोकाग्रहास्तव तो नायिकेला विवस्त्र करून दिवा मालवू लागला. वाचकांचा आग्रह चालूच–'नायकाला दिवा मालवू देऊ नका! त्याला अडवा–त्याचा हात धरा!'

संपादक घाबरला. नायकाला अडवलं म्हणून कोर्टानं जाब विचारला तर? नायकाचा हात धरला म्हणून हातात हातकड्या पडल्या तर? संपादक ऐकत नाही म्हणूनच वाचक चिडले. त्यांनी 'उर्वशी' वर बहिष्कार टाकला. कॉलेजच्या पोरांनी अंकांची जाहीररीत्या होळी केली. 'लेडीज होस्टेल्स आणि 'नर्सेस क्वॉर्टर्स'नी उर्वशीची




अनुक्रमणिका

वर्गणी बंद केली. म्हाताऱ्याकोताऱ्यांनी संपादकाला घेराव घातला. आधी मिळवलेलं सगळं गेलं. 'उर्वशी' बंद पडली. 'पिपासू'मागं चालती झाली. संपादकानं मासिकाच्या वाटेला पुन्हा जायचं नाही असं ठरवलं.

महिना हळुहळू संपू लागला. वीसबावीस तारीख आली. संपादक अस्वस्थ झाला. पुन्हा छापखान्याच्या शाईचा वास. त्यात कोऱ्या कागदाचा वास मिसळलेला. गॅल्या–प्रुफं–टू लाईन ग्रेट, पायका ब्लॅक ! कव्हर पेज, गेटप–ले आॅट–अॅडव्हरटाईजमेंट ! संपादकाला खुळचासारखं झालं. जेवण जाईना, पिणं सुचेना. एकसारखी शून्यात दृष्टी.

मग तो उठला आणि नगरीतल्या एका वयोवृद्ध संपादकाकडे गेला. म्हणाला–'महाराज–मला ज्ञान द्या ! बहुमोलाचा उपदेश द्या. मी तुम्हाला शरण आलो आहे.'

वयोवृद्ध संपादकानं विचारलं–'वत्सा–काय झालं ! तुझी अडचण काय आहे ?'

'महाराज–माझी मासिकं चालत नाहीत. उच्च अभिरुचीचं मासिक काढलं. जनता ते घेत नाही. विद्वानमंडळी अंक फुकट मिळाल्याशिवाय वाचत नाहीत. हजारो रुपयांचं पाणी झालं. 'ज्ञानपिपासू' बंद पडलं.'

'मग तू काय केलंस' ?

'मग मी 'उर्वशी' काढलं. शृंगारकथांचा रतीब घातला. भटजी न् भावीण–डॉक्टर न् नर्स, प्राध्यापक न् विद्यार्थिनी अशा खूप जोड्या केल्या. चुंबनांचा पाऊस पाडला. आलिंगनांची खैरात केली. गुलाबी पोटऱ्या, नाजुक मांड्या यांचं भरघोस पीक काढलं. तरी वाचकांचं समाधान झालं नाही. त्यांचं मन अतृप्त राहिलं. मासिकाचा खप कमी झाला. 'उर्वशी' मग बंद पडली.'

'ठीक आहे. वत्सा–तुला काय हवंय् ?'

'महाराज–अजून हात शिवशिवताहेत. अजून मासिक काढावसं वाटतंय्.

'वत्सा, ते व्यसन असंच आहे. पहिलं मासिक काढण्यापूर्वी ते व्यसन सुटलं तर सुटतं. नंतर ते चिकटून बसतं. निवृत्त झालेल्या नटाच्या नाकात घुपाचा वास शिरला की तो जसा तडफडतो तसं तुम्हाआम्हा संपादकांचं आहे. वत्सा, मी आतापर्यंत तेरा मासिकं काढली. आता सर्व बंद पडली. पैसा अमाप मिळवला–तो घालवूनही टाकला; पण जे त्यावेळी सुचलं नाही ते आता तुला सांगतो. मी सांगतो तो वसा घे. उतशील काय ? मातशील काय ? घेतला वसा टाकशील काय ?'

'नाही महाराज, उतणार नाही–मातणार नाही. घेतला वसा टाकणार नाही.'

'वत्सा, तू स्त्रियांसाठी मासिक काढ. तीन वर्षात मासिकाचा खप दहा हजारांवर जाईल !'

'महाराज, पण मला ते जमेल कसं ? त्याचं रहस्य मला कळेल कसं ?'

महाराजांनी विडी पेटवली. मग ते म्हणाले– 'सगळं काही सोपं आहे. नीट लक्ष देऊन ऐक. आधी मंत्र्यांच्या बायकांना भेट.

**प्रा. डॉ. सुभाष भेंडे हे तसे म्हटले तर साहित्य क्षेत्रातले तरुण लेखक . . . त्यांच्या काही विनोदी कथांनी रसिकांचे लक्ष वेधून घेतले . . . 'दीपावली' मध्ये तर यंदा प्रथमच ते लिहीत आहेत . . . त्यांचे हे पहिले पाऊलच किती दमदार आहे याची या कथेवरुन खात्री होईल . . .**

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

त्यांच्या मुलाखती घेऊन टाक. 'मला उमजलेले आमचे हे–' मंत्रिणीबरोबर मंत्र्यांचा फोटो–दोघांबरोबर मुलाबाळांचा फोटो. आमच्या त्यांचं माझ्याशिवाय पान हलत नाही. कुठलंही धोरण ठरवताना मला विचारल्याशिवाय रहात नाहीत. आमचे हे वरून रागीट आहेत–पण आतून मृदु हृदयाचे आहेत–! सगळा मजकूर जाड टाईपात छापायचा. मंत्रिणीला भरपूर स्कोप द्यायचा !'

'त्यानं काम होतं ?'

'त्यानं खूप कामं होतात. सरकारी जाहिराती मिळतात. कागदाचा कोटा मिळतो. सचिवालयातली कामं भराभरा होऊ लागतात.'

'पुढं काय करू ?'

'एखाद्या रिकामटेकड्या डॉक्टरणीला गाठ. तिची लेखमाला सुरू कर. 'मुली वयात येतात तेव्हा–बारा ते सोळा–चार वर्ष–चार वर्षाचे अठ्ठेचाळीस महिने–चार वर्ष मजकुराची चिंता नाही !

'चार वर्षानंतर काय ?

'गरोदरपणी स्त्रियांनी घ्यावयाची काळजी. गरोदरपणाचे नऊ महिने. एकेका महिन्यासाठी तीन तीन लेखांक. शारीरिक काळजी–मानसिक काळजी–अन्य काळजी. नऊ त्रिक सत्तावीस. दोन सव्वा दोन वर्ष चिंता नाही.'

'त्यानंतर काय ?

'बाळाची कशी काळजी घ्यावी ? यात दोन तीन वर्ष घालवावी ! मग पुन्हा पहिल्यापासून ' मुली वयात येतात तेव्हा '–

'पण महाराज–परत तोच विषय ?'

"हो वत्सा ! कारण पहिली लेखमाला आली तेव्हा लहान असलेल्या मुली सात आठ वर्षात वयात येणारच–त्यांच्यासाठी जुने अंक कसे मिळणार ? ते तर सारे खपलेले असणार !'

'आता आलं लक्षात ! पुढं काय महाराज ?'

आणखी एक परिसंवाद सुरू करावा ! विषय सगळ्यांच्या आवडीचा घ्यावा. मुलींनी स्कर्ट घालावेत की पंजाबी ड्रेस ? स्कर्ट गुडघ्याच्या किती फूट वर असावा ? साडी बेंबीच्या किती फूट खाली असावी ? लुंगी पुरुषांनी नेसावी की स्त्रियांनी ?

'यामुळे काय होतं ?'

'अंकाचा खप खूप वाढतो. पुरुष लोकांचीही मागणी वाढते. कॉलेज तरुणांचं गिऱ्हाईक मिळतं ! मुलामुलींकडून लेख घ्यावेत. निरनिराळ्या स्पर्धा ठेवाव्यात. स्पर्धेत खूप बक्षिसं वाटावीत.'

'म्हणजे खूप पैसे जाणार !'





अनुक्रमणिका

'नीट ऐक वत्सा. मोठी बक्षिसं अस्तित्वात नसलेल्या मुलींना द्यावीत. आपणच त्यांचे लेख तयार करावेत. 'शर्मिला कारखानीस–नागपूर' म्हणजे तू. 'वैशाली महाजन' म्हणजे तूच. आणि 'लैला पाठारे' म्हणजे तू. देणं नाही–घेणं नाही !'

'महाराज ! सदरं कोणती चालवावीत ?'

'ते तर वत्सा फारच सोपं. अमुक महिन्याचे खास पदार्थ. शेंगाच्या फोलपटाचा चिवडा. तांबड्या वटाट्याचं लोणचं. कारल्याचं भरीत. शेवग्याच्या शेंगाची कोशिंबीर !

'हे तर सगळे नवीन पदार्थ. कधी ऐकले नाहीत–कधी खाल्ले नाहीत–'

'म्हणूनच तर द्यायचे. उदाहरण देतो. शेंगाच्या फोलपटाचा चिवडा. एक किलो शेंगदाणे घ्यावेत. आतले दाणे काढून टाकावेत. फोलपटं खरपूस भाजावीत. त्यात मीठ मिरची हळदपूड घालावी. वरून मोहरीची फोडणी द्यावी. गरम असताना खायला द्यावा. रुचकर लागतो. उपवासालाही चालतो.'

'हे झाले शाकाहारी पदार्थ. मांसाहारी पदार्थ कसे लिहायचे ? नवे पदार्थ कसे शोधायचे ?'

'मांसाहाराचे शेकडो पदार्थ. हुस्ने–कबाब, मोहब्बत–इ–चिकन; दिल–ए–ऑम्लेट, सप्त–सूर–मयी कटलेट–'

'महाराज–ही नावं कुठली ? मी तर ही प्रथमच ऐकतो–'

'ही हिब्रू 'हजार पाकक्रिया'मधली असून इ. स. पूर्व सातव्या शतकात या नावाचा प्रथम उल्लेख आढळतो– !'

'महाराज, आपलं ज्ञान अगाध आहे–'

'कसचं–कसचं ! आदाबअर्ज, बाखिलवत ! कबाब सुंदरीनं बनवला म्हणजे तो हुस्ने–कबाब होतो. चिकन मोहोब्बतीनं एकमेकांना खिलवलं की मोहब्बत–इ–चिकन तयार होतं. असं हे सर्व गौड–हिब्रू आहे–'

'शुकरिया महाराज–शुकरिया–'

'बेटा–आपण पुढल्या पानाकडे वळू ! इथं चार पानं राखून ठेवायची !'

'ती कशाला महाराज ?'

'भरतकाम–शिवणकाम–लोकरीचं काम ! परकराच्या बॉर्डरवरलं डिझाईन–ब्लाऊजच्या मागं काढायचं फुलाचं डिझाईन–साडीच्या किनारीवरलं हरणाचं डिझाईन–खमीज सलवारमधल्या खमीजच्या छातीवर काढायचं मांजराचं डिझाईन–'

'शिवणकाम ?'

'शिवणकामाच्या लेटेस्ट फॅशन्स तुला काढायला सांगतील. आजवर जे कधी झालं नाही ते तुला करावं लागेल–पाहताक्षणी पसंत पडाव्या अशा तऱ्हा शिकवाव्या लागतील.'

'हे मला कसं जमणार ?' संपादक घाबरून विचारता झाला.

महाराजांनी दुसरी विडी पेटवली. 'त्याचा विचारही मी केला आहे ! ब्लाऊजला पुढनं बटणं झाली–मागनं बटणं झाली. दोन्ही कडांना बटणं असणारी ब्लाऊजची फॅशन. पदर नसलेल्या साडीची फॅशन. नाजुक पाठीत रुतणाऱ्या मागच्या पट्ट्या नसलेल्या ब्रेसियरची फॅशन. अर्धी पाठ उघडया टाकणाऱ्या खमीजची फॅशन. न सुटणाऱ्या लुंगीची फॅशन. एकदा घातली की पुन्हा काढण्याची गरज नसलेल्या जीन्सची फॅशन. वत्सा, स्त्रियांच्या वस्त्रांवर तुझं बारकाईनं लक्ष असू दे. ब्लाऊजची लांबी तू एका इंचानं जरी वाढवलीस तर तुझ्या मासिकाचा खप एका हजारानं खाली आलाच!'

'आणि महाराज–ही लोकरीच्या वीणकामाची काय भानगड ?'

'वीणकामाचे हे प्रकार म्हणजे वर्तमानपत्रातले अग्रलेख. कुणी वाचत तर नाही–मात्र असल्याशिवाय भागत नाही ! काश्मीरी वीण–नेपाळी वीण–उलटी वीण–सुलटी वीण. दोन टाके उलटे–दोन सुलटे. मग पुन्हा सारे उलटे–सुलटे !'

'केशरचनेचं काय करायचं ?'

'ते तर फार सोपं. एक मुलगी घ्यावी. घ्यावी म्हणजे निवडावी. एक प्रौढ बाई घ्यावी. त्या प्रौढ बाईनं त्या तरुण मुलीच्या केसाची विरचना करावी. केसाचा कोंबडा, जिराफ, उंट, कबूतर, सर्व पशुपक्ष्यांना मदतीला बोलवावं. केसाचा फ्लॉवरपॉट. दुपेडी वेणी. चक्कर. मोवळ, अंबाडा, पर्स, मनीबॅग. शबनम बॅग. डॉक्युमेंट केस, अॅटॅची. नाना प्रकार करावेत. दर महिन्याला प्रकार बदलावेत. छान छान नावं ठेवावीत. यामिनी–कामिनी–नंदिनी–रागिणी–पद्मिनी–मोहिनी–मेदिनी–मेदीनी–'

संपादकानं बोटं घातली. डोळे मिटून हिशेब केला. अजून पानं भरत नाहीत. 'महाराज–अजून मजकूर हवा आहे–'

महाराजांनी दुसऱ्या विडीवर तिसरी विडी पेटवली. त्यांच्या ओठातून हसू फुटलं. 'वत्सा तू चिंता कसली करतोस ? दहा हजार पानं भरून देतो. अरे, जगात जेवढ्या स्त्रिया तेवढे विषय; पण स्त्रियांना तेवढे विषय लागत नाहीत. आठ दहा विषय जन्मभर पुरतात. तर ते असो ! आपण आता पुढं जाऊ. पुढं येईल प्रश्नोत्तराचं सदर. प्रश्न विचारणारीला एक अंक–एक रुपया !'

'आणि कुणी प्रश्न विचारले नाहीत तर ?'

'वत्सा–तुझं मडकं अजून कसं रे कच्चं ? प्रश्न कुणी विचारीत नसतं. संपादकीय खात्याचा उपयोग काय ? उपसंपादक फुकट पगार खाणार ? संपादक नुसत्या नोटा मोजणार ? आपलेच प्रश्न–आपलीच उत्तरं !'

'पण महाराज–प्रश्न तरी कुठले ?'

'सोपे. फारच सोपे. 'माझ्या चेहऱ्यावर मुरुम येतात. मी काय करू ? सुंदर चेहरा वाईट दिसतो.' दुसरा प्रश्न–'माझ्या ओठावर काळसर लव उमटलीय. तिचं मी काय करू ? तिचा कसा बंदोबस्त करू ?' पुढं आणखी कुणी 'माझं वय वीस वर्षं आहे. पण वक्षस्थळं फार खुरटलेली दिसतात.' त्याखालीच 'माझ्या वयाच्या मानानं स्तनाचा आकार फार मोठा दिसतो. ते बेडौल दिसतात. उपाय काय ?' शिवाय अनेक जुजबी प्रश्न !

'गालावर रुज लावली तर गाल सुजतील काय ?' 'लिपस्टिक लावली तर ओठ काळे पडतात काय ?' गंगावन लावले तर केस गळतात काय ?' उत्तरं द्यायची–नाही, नाही, त्रिवार नाही !'

'आणखी काही प्रश्न ?'

'कुणी अडलेली सल्ला विचारील. मी कॉलेजात शिकते आहे. माझं शेजारच्या सरदारजीवर प्रेम आहे. मी काय करू ? उत्तर द्यायचं–मूर्ख आहेस ! अभ्यास कर–लग्नबिग्न मागाहून ! कुणाचा प्रश्न–मी विवाहित आहे. तो विवाहित आहे. माझं त्याच्यावर प्रेम आहे. आता पुढं काय करायचं ? उत्तर–तू घटस्फोट घे–त्याला घटस्फोट घ्यायला लाव ! दोघंही मिळून लग्न करा– ! ते जमलं नाही तर दोघंही एकमेकांना विसरून जा ! तेही नाही जमलं तर छानपैकी नदी पाहून जीव द्या !'

'ठीक ठीक. कल्पना आली–'सासू त्रास देते–वेगळं बिऱ्हाड करू काय?' कर कर–जरूर कर ! 'नणंद लग्नाची आहे–काय करू.' तिला कुठं तरी नोकरी करायला लाव. पैसे मिळतील न् तिचं ऑफिसमध्ये कुणाशी तरी जुळेल !'

'वत्सा–छान ! तू शहाणा आहेस–हुषार आहेस !'

'महाराज–कथा कवितांचं काय करायचं ?'

महाराजांनी चौथी विडी पेटवली. हो. त्यावद्दल सांगायचं राहिलंच. व्यंगचित्रं–विनोदी कथा. कधी छापू नकोस. बायकांना त्यातलं फारसं कळत नाही. उपरोध, उपहास, व्यंगार्थ बायकांना मुळीच कळत नाही. कुणी घसरून पडलं तर सुशिक्षित स्त्रियांचं सुद्धा हसून पोट दुखतं. खालीपिली विनोदी साहित्य द्यायचं कशाला !'

'मग महाराज कथा कसल्या द्यायच्या ?'

'मेलोड्रॅमॅटिक–डोळ्यातून आसवं काढणाऱ्या. स्त्रियांची सहजप्रवृत्ती रडणं हीच. तिचं सतत आवाहन करायचं. नवऱ्याच्या मागं बॉयफ्रेंडबरोबर फिरणारी बाई पातिव्रत्याची कथा वाचून ओक्साबोक्शी रडते ! एरवी भावाचं तोंड न पाहणारी बंधुप्रेमाची गोष्ट वाचून हुंदका फोडते ! सासूच्या 'उठता लाथ–बसता बुक्की' करणारी स्वमंग सून सासुरवाशिणीचे हाल वाचून गळा काढते ! वत्सा–स्त्री स्वभावाची ही मख्खी तू ओळखायला हवीस ! तुझं लग्न झालेलं नाही ?'

'नाही महाराज !'

'तरीच तुला या खाचाखोचा ठाऊक नाहीत ! स्त्रियांच्या मासिकाचं बरं असतं. कुठल्याही स्त्रीची कथा छाप. मोबदला द्यायचं कारण नाही. आपलं नाव प्रसिद्ध झालं यातच ती खूष. कुणीच फारच कुरकुर करू लागली तर तिचं छायाचित्र छाप. तिला वर्षभर मोफत अंक पाठव. खास अंकासाठी त्यांचे लेख माग. त्यांच्या पतीसह त्यांना चहाला बोलव. त्यांचा विरोध संपून जातो. त्या दाती तृण धरून शरण येतात !'

'खास अंक कसले काढायचे ?'

'आतापर्यंत तुला विविध विषय सांगितले. त्यातलाच एकेक विषय घेऊन खास अंक काढायचे !'

'म्हणजे काय महाराज?' संपादकानं काडी ओढून महाराजांची विडी पेटवली.

'सोपं आहे. अन्नपूर्णा विशेषांक–लिपस्टिक विशेषांक–मंगळागौर विशेषांक–नववधू विशेषांक–डोहाळे विशेषांक–सासू विशेषांक शृंगार विशेषांक–गर्भाधान विशेषांक. दोन तीन वर्षांनी हे विशेषांक रिपीट करावेत! इतकंच नव्हे तर तीन चार वर्षांनी अंकातला तोच तो मजकूर पुन्हा छापावा! कुणालाही कळत नाही! पैशाची आणखी गरज लागली तर खूप मजकूर एकत्र करून मोठं थोरलं पुस्तक छापावं.'गृहिणीचा सखा' 'सुखी संसाराची गुरुकिल्ली' 'स्त्रियांना वरदान'–मूळ किंमत तीस रुपये. सवलतीची किंमत आठ रुपये. दोन पुस्तकं घेणाऱ्यास मासिक एक वर्ष मोफत. तीन पुस्तकं घेणाऱ्यास बारा शेड्सच्या लिपस्टीक्स् मोफत. पंचवीस पुस्तकं एकदम घेणाऱ्यास मासिक आजन्म मोफत.'

'आजन्म म्हणजे महाराज?'

'मासिक मरेपर्यंत किंवा घेणारी मरेपर्यंत विचेव्हर ईज अर्लीअर!

'पण महाराज–तुम्ही सांगितल्याप्रमाणं मासिक चालवलं तर मासिक मरायची धास्ती नको!'

'होय वत्सा! इतर कुठलीही मासिकं मरतील. शृंगार मासिकं कुठवर शृंगार भिडवणार? अखेरीस त्यालाही मर्यादा आहे! विनोदी मासिकं विलायती विनोद किती वर्ष चोरणार! अखेरीस त्यालाही मर्यादा आहे! उच्च अभिरुचीची मासिकं किती वर्ष नुकसान सोसणार? अखेरीस त्यालाही मर्यादा आहे! मर्यादा नाही ती स्त्रियांच्या मासिकांना! सारंच वेगळं. नाजुक. स्वयंकेंद्रीत. आत्मरत. अगदी ज्यांच्यासाठी ती चालवायची त्या स्त्रियांसारखंच!'

'होय महाराज–'

'वत्सा–स्त्रियांच्या मासिकामुळे जीवन समृद्ध होतं. जीवनात रस वाटू लागतो. चरवट दाढी वाढवणारे नवकवी, केस पिंजारलेले नवकथाकार, नाना फडणीसासारखा लंबवर्तुळ चेहरा करणारे टीकाकार, एकमेकांचा दुस्वास करणारे किरकिरे विनोदी लेखक यांचा गोतावळा आजूबाजूला जमणार नाही. चिवचिवणाऱ्या, लाडे लाड बोलणाऱ्या, माना वेडावणाऱ्या, शेपटचांशी खेळणाऱ्या, कोपऱ्यावरून पहाणाऱ्या, नजरबंदी करणाऱ्या अनेक लेखिका. पावडरीचा, स्नोचा, अत्तराचा, शांपूचा, क्रीमचा, लोशनचा संमिश्र धुंदफुंद सुवास. त्यातच 'इश्य–अय्या'चे सुगंधी फवारे. मध्ये तू–आजूबाजूला स्त्रीलेखिका. कित्ती कित्ती छान! गोकुळात असल्यासारखं वाटेल. तुला घरी सणासुदीला आमंत्रण. दिवाळीचा फराळ आवर्जून घरी धाडतील. बसमध्ये भेटल्या तर तिकीट काढतील. कारवाल्या असतील तर मुद्दाम लिफ्ट देतील. वर्थडेला प्रेझेंट्स पाठवतील. फॉरेनला गेल्या तर येताना एखादी छान छान वस्तू आठवणीनं आणतील. तर वत्सा–हा वसा घेच तू. उतू नकोस–मातू नकोस–घेतला वसा टाकू नकोस!'

'नाही महाराज. उतणार नाही. मातणार नाही. घेतला वसा टाकणार नाही. थँक्स अ लॉट महाराज! फ्रॉम बॉटम ऑफ माय हार्ट महाराज!'

महाराजांच्या पायावर डोकं ठेवून संपादक तिथून बाहेर पडला. त्यानं लगेच 'रुणुझुणु' हे स्त्रियांचं मासिक काढलं. नटीच्या हस्ते उद्घाटन केलं. त्यादिवशी मोठा फॅशन शो केला. 'ब्युटी कॉंटेस्ट' घेतली. पहिल्या तिघींना 'रुणुझुणु'च्या पहिल्या वर्गणीदार केल्या.

वर्षभरात त्यांची भरभराट झाली. मासिकासाठी नवी बिल्डिंग बांधली. नवा छापखाना आला. दारात कार आली. नाजुक, लाडलाडे बोलणाऱ्या एका लेखिकेशी त्याचं लग्न झालं. त्याच्या जीवनाचं नंदनवन झालं.

तसं तुमच्या आमच्या जीवनाचं होवो.

ही साठा उत्तराची कहाणी. पाचा उत्तरी. सुफळ संपूर्ण.

● ● ●



# आपुले मरण पाहिले म्यां डोळां

राजाराम हुमणे

दिवस ढळत आला होता. दिवसभराचे काम संपवून घरी जाण्याची वेळ आली होती. "ढळला रे ढळला दिन सखया" ही तांब्यांची कविता गुणगुणत मी उरल्यासुरल्या फायली निकालात काढीत होतो इतक्यात काय झाले कुणास ठाऊक छातीत विलक्षण कळ आली, अंगाला दरदरून घाम सुटला, तोंडाला शोष पडला. 'पाणी' 'पाणी' म्हणून मी टेबलावरील घंटेवर हात मारला. घंटीवरचा हात तसाच घंटीवर राहिला आणि घामाने थवथवलेले माझे मस्तक टेबलावर कोसळले.

एरवी 'कँटिन'मध्ये चहा ढोसीत बसणारा किंवा केबिन-बाहेरच्या स्टुलावर विडी फुंकीत बसणारा आणि साहेबाच्या घंटीला कधीही जबाब न देणारा संतू शिपाई या वेळेला मात्र ताडकन् आत आला. आत आल्याबरोबर आपल्या अंगावर चवताळून येणारा साहेब आज खुर्चीत कोलमडून पडलेला त्यानं पाहिला आणि साहेबांशीही कधी कधी गुर्मीत बोलणारा संतू एकदम चरकला. त्यानं घंटेवर पडलेला माझा हात उचलला. आणि त्याचा थंडगार स्पर्श होताच त्याने एकदम किंकाळी मारली. एव्हाना ऑफीस सुटण्याच्या अगोदरच 'वाश'साठी गेलेल्या महिला कर्मचारी घरी जाण्यासाठी माझी परवानगी विचारण्याकरिता केबिनमध्ये येऊन दाखल झाल्या. संतूच्या किंकाळ्यात त्याच्या किंकाळ्यांची भर पडली. सबंध ऑफीसमध्ये एकच हलकल्लोळ झाला

**....सरकारी नोकरीच्या धबडग्यात माणूस पिचून जातो म्हणतात.... पण श्री. राजाराम हुमणे हे मात्र त्याला अपवाद ठरले आहेत, हे त्यांच्या विविध प्रकारच्या लेखनावरून प्रत्ययाला येते...त्यांचे कित्येक उत्तमोत्तम विनोदी लेख प्रसिद्ध आहेत...नुकतेच एक विनोदी नाटक लिहून त्यांनी मोठी लोकप्रियता मिळविली आहे... त्यांचाच हा एक निराळा विनोद...!**

'सर गेले' 'बॉस गेले' अशी अनेक तोंडे अनेक कानात बोलली. हां हां म्हणता माझ्या इवल्याशा केबिनमध्ये तोबा गर्दी उडाली. पलिकडच्या केबिनमधील दुसरा एक अधिकारी धावतच आत घुसला. त्याला पाहताच कारकून मंडळी थोडीशी बाजूला झाली. त्याच्या स्वतःत भिनलेली अधिकार वृत्ती त्यानं प्रसंगी सोडली नाही. Will you please get out ? All of you ! He must get some air ! असं म्हणून सर्वांना त्यानं बाहेर पिटाळून लावलं. माझ्या शरीरातील 'हवा'च निघून गेल्यामुळे वाऱ्याचा खरं म्हणजे मला काहीच उपयोग नव्हता हे त्याच्या ध्यानात आलं नाही; पण माझ्याच टेबलावरील फोन उचलून त्यानं डॉक्टरना बोलावण्याची तत्परता मात्र दाखविली. माझ्या मृत्यूवर डॉक्टर-शिवाय दुसरं कोण शिक्कामोर्तब करणार ? डॉक्टर आले आणि

आणि त्यांनी 'खेळ खलास' झाल्याचे जाहीर केले. ऑफिसमध्ये पुन्हा एकदा 'चूकचूक' झाली.

डॉक्टर येऊन आपला निर्णय जाहीर करीपर्यंत अर्धापाऊण तास गेला होता. पांचच्या ठोक्याला ऑफिसबाहेर पडणाऱ्या कर्मचाऱ्यांची–विशेषत: स्त्री कर्मचाऱ्यांची–माझ्या अनपेक्षित मृत्यूने मोठी पंचाईत करून टाकली होती. जावं तरी वाईट आणि न जावं तरी वाईट अशा कात्रीत ते सर्वजण सांपडले होते. वरून सर्व जण माझ्या मृत्यूबद्दल चुकचूक करीत होते आणि मनातून एकच नव्हे तर एकामागून एक अनेक 'फास्ट' गाड्या चुकल्याबद्दल चुकचुकत होते. त्यांच्यातील प्रत्येकजण पांच पांच मिनिटांनी मनगटे पालथी करून घड्याळ पहात होता. "वॉश" केलेल्या आणि तोंडावरून 'पफ' फिरवून आलेल्या पोरींचे चेहेरे अश्रूने म्लान झाल्यामुळे त्यांचा प्रश्न आणखी विकट झाला होता. पुन्हा चेहऱ्यावर पावडर मारायची म्हणजे आणखी पांच दहा मिनिटं फुकट फाकटी जाणार होती. घरी स्वैपाकाला उशीर होणार होता. साहेब सुटले होते. परंतु त्यांच्या दैनंदिन समस्या काही सुटल्या नव्हत्या. अंधेरीला रहणारी मंदा किरकिरे तर कमालीची अस्वस्थ झाली होती. नेमके साडेबाराच्या सुमाराला काहीतरी अर्जन्ट काम काढून आपल्याला अनेक वेळा डीटेन करणाऱ्या साहेबावर ती अनेक वेळा चडफडली होती–आणि पाय आणि वही आपटीत व डोळ्यात पाणी आणून ती माझ्यासमोर 'डिक्टेशन'ला बसली होती. "मरतानासुद्धा साहेबांनी काय पण वेळ हेरून काढली!" असं रजनी राजेला ती म्हणाल्याचं मला स्पष्ट ऐकू आलं.

मी गेल्यावर 'सिनिऑरिटी' लिस्टप्रमाणे मला नेक्स्ट असलेला हरीश रावते त्या गंभीर प्रसंगी हरखलेला दिसला. इतक्या लवकर त्याला 'प्रमोशन' मिळेल असे त्याला स्वप्नात सुद्धा वाटले नसते; परंतु माझ्या अचानक मरणाने त्यांचे नशीब फळफळले होते. तो वर सरकल्यावर खालची पाच माणसं पायरी पायरीने वर जाणार होती.



BYP

त्या सर्वांना घरी जाण्याची घाई दिसली नाही. आता आपण कितीही उशिरा घरी गेलो तरी साहेबांच्या मृत्यूची वाईट आणि आपल्या प्रमोशनची चांगली बातमी बायकोला एका दमात सांगून घरात आपण निश्चितपणे आनंदाचं वातावरण निर्माण करणार आहोत अशा खात्रीने ते ऑफिसमध्ये निश्चित मनाने थांबले होते. या सहा-जणांची सहानुभूति हीच काय ती माझ्यापुढे पसरलेल्या काळ्या-कुट्ट अंधारातील प्रकाशरेषा होती. त्यातील एक म्हणाला, "साहेब ऑफिसमध्येच गेले हे एक प्रकारे बरंच झालं." साहेब गचकल्या-बद्दल हा महाभाग लगेच समाधान व्यक्त करायला लागलेला पाहून दुसऱ्याने त्याच्याकडे काहीशा आश्चर्याने व काहीशा रागाने पाहिले. पहिल्याने लगेच खुलासा केला : "माझ्या म्हणण्याचा अर्थ एवढाच होता की साहेब 'ऑन ड्यूटी' असताना मरण पावले हे बरे झाले. त्यामुळे त्यांच्या पत्नीला त्वरित आर्थिक मदत मिळण्याची शक्यता आहे."

'पत्नी'चे नाव निघताच माझ्या डोळ्यापुढे एकदम 'माझे घर' आले. वासे फिरले तरी माझे घर फिरणार नव्हते या विचारानं मृत्यूच्या छायेतही माझ्या थंडगार देहातील तापलेल्या मनाला भयंकर 'गारवा' वाटला. माझ्या शेजारच्या केबिनमधील कार्यतत्पर अधिकाऱ्याने डॉक्टरबरोबर 'शववाहिका'ही बोलवली होती. आपले 'प्रमोशन' नक्की झाले म्हणून खुषीत गाजरं खाणाऱ्या आणि ऑफिस-मध्येच ठाण मारून बसलेल्या त्या सहाजणांचा उत्साह आणि चिकाटी मोठी दांडगी होती. त्यांनीच मला ऑफिसमधून 'हलविलं'. शववाहि-केत माझं प्रेत सारताना "आता पुन्हा काही हा माणूस ऑफिसमध्ये पाऊल टाकणार नाही" असं मनातल्या मनात म्हणत सुटकेचा निश्वास त्यांनी टाकला.

घरात माझी पांढरीफटक पावलं पडली आणि किंकाळ्या, आक्रोश आणि क्रंदन एखाद्या वादळ वाऱ्याप्रमाणे घरात घुसली. एरवी मी घरात आल्याबरोबर हास्याच्या लाटेवर तरंगणारं माझं घर आज दुःखाच्या प्रचंड लाटेखाली बुडून गेलं होतं. 'बाबा, आज घरी आलास तो असा आलास का?' एवढाच प्रश्न माझ्या आईनं मला विचारला आणि ती झीट येऊन पडली. पत्नीनं एकदाच डोळे भरून माझ्याकडं पाहिलं आणि तिने डोळे फिरविले. आईच्या शेजारीच तीही फीट येऊन पडली. मुसमुस-णाऱ्या मुलांची शजारपाजारच्या आयाबाया समजूत काढीत होत्या. माझी उचलबांगडी होण्यापूर्वीच लहानग्या मुलांची उचलबांगडी झाली होती. एरवी मला येऊन बिलगणाऱ्या त्या मुलांची नि माझी दृष्टभेट सुद्धा झाली नाही. ऑफिसमधलं ते दृश्य पाहिलं आणि घरातलं हे दृश्य पाहिलं आणि माझं आधीच सुन्न झालेलं काळीज थिजून गेलं. वाटलं इतक्या लवकर आपण मरायला नको होतं. निदान असं मरायला नको होतं. त्यांच्या 'मनाची तयारी' न करता असं तडकाफडकी जाणं निर्दयपणाचं होतं; पण दैवच निर्दय आणि निष्ठूर झालं होतं त्याला मी काय करणार होतो? मी तर त्याच्या हातातलं खेळणं होतो. त्याच्याप्रमाणे मलाही निर्दय होणं भाग



अनुक्रमणिका

पडलं होतं. पण कुठल्या तरी दुर्धर रोगानं महिने न् महिने अंथरुणात खितपत पडल्यावर एके दिवशी शांतपणे आपण डोळे मिटले असते तर इतका हृदयद्रावक देखावा कदाचित् आपल्या दृष्टीला पडला नसता असं मात्रं माझ्या मनाला निश्चित वाटलं. आता झाल्यागेल्या-बद्दल अधिक विचार करणं योग्य नव्हतं आणि त्याचा काही उपयोगही नव्हता आणि आता अधिक विचार करायला वेळ तरी कुठं होता ? कारण माझ्या हाताखालच्या त्या 'सहा' महाभागांनी वेळ न दवडता अंत्यविधीचं सामान केव्हाच माझ्या दाराशी आणून टाकलं होतं. त्यांची ती तत्परता पाहून माझ्या मनात सहज विचार आला की एवढी कार्यतत्परता त्यांनी कार्यालयात दाखविली असती तर बढतीसाठी माझ्या मरणाची त्यांना वाट सुद्धा पहावी लागली नसती. तो विचार माझ्या मनात आला आणि मी मनातल्या मनात हसलो. तुम्हाला सांगितलं तर आश्चर्य वाटल की मी वर जाण्या-पूर्वीच आपल्या वरच्या जागा निश्चित झाल्याबद्दल निश्चिंत झालेल्या त्या सहाजणांनी पदरमोड करुन 'सर्व सामान' आणलं होतं. जमेची खातरजमा असल्यामुळेच त्यांनी स्वखुषीने आणि अक्कलहुषारीने हा 'खर्च' केला होता.

घरात प्रेत येऊन पडलं तरी आमच्या बिल्डिंगमधील माणसांना माझ्या मरणाची गंधवार्ताही लागली नव्हती; परंतु दारात सामान येऊन पडल्यावर मात्र घराघरातून माझ्या मरणावर हलक्या आवा-जात पण खडाजंगी चर्चा होऊ लागली. मरणाच्या दारी पडलेल्या



माणसालासुद्धा प्रसिद्धीच्या या जगात दारात देखावा उभा करावा लागतो म्हणायचं ! आमच्या शेजारच्या उकिडव्यांनी चार दिवसांपूर्वीच नाटकाची तिकीटं काढली होती. माझा डोळा चुकवून पळ काढण्याचा त्यांचा विचार होता आणि सौ. उकिडवे त्यांच्यावर उखडल्या होत्या, "एवढा शेजारी गेला असताना तुम्ही नाटकाला गेला तर उद्या लोक तोंडात शेण घालतील शेण !" उकिडव्यांच्या तोंडात रोज अन्न घालणारी अन्नपूर्णा उद्या त्यांच्या तोंडात शेण पडेल म्हणून सचित होता. नवराबायकोत यावर खूप तणातणी झाली आणि शेवटी उकिडव्यांना नाटकावर पाणी सोडावं लागलं. आपला मृत्यू आपली चर्याच नव्हे तर दुसऱ्यांची दिनचर्याही बदलू शकतो हे पाहून मला काहीसं समाधान वाटलं—काहीसं दुःखही वाटलं.

उद्या उकिडव्यांच्या तोंडात शेण पडणार की नाही हे पाहण्या-साठी मी थोडाच थांबणार होतो ? परंतु आज बिल्डिंगमधील अनेक लोकांच्या तोंडात अन्न पडणार नव्हतं, हे मला स्पष्ट दिसत होतं. माझं प्रेत घरी आणीपर्यंत ७–७॥ वाजले होते. यमाने माझ्यावर अशावेळी गदा उगारली होती की लोकांच्या जेवणावरच गदा यावी. आठ साडेआठच्या सुमारास समोर ताट घेऊन बसणाऱ्या मंडळींना ताटाऐवजी ताटी दिसणार होती. ताट बाजूला सारुन पुरुष मंडळी 'प्रेत केव्हा एकदाचे उचलतात' याची वाट पहात ताटकळत बसली होती. स्त्रियांमध्ये मोठी खळबळ माजली होती. उधार उसनवारी-मुळे माझ्या सौ.शी नाते जुळलेल्या शेजारणी-पाजारणी माझ्या घरातच तळ ठोकून बसल्या होत्या. सौ.ला मूर्च्छा आल्यामुळं मनात योजलेलं सारं काही बोलता यत नव्हतं म्हणून त्या निराश आणि हताश झाल्या होत्या. महिला मंडळातील कुरबुरीमुळ किंवा मत्सरी स्वभावामुळे सौ.शी अबोला धरलेल्या बायकांची स्थिती मोठी विचित्र झाली होती. "निदान तोंड दाखवून तरी आलं पाहिजे." "तोंडदेखलं तरी काही बोललं पाहिजे." असा विचार करीत त्याही अवूनमवून घरात डोकावून जात होत्या. "आपण येऊन गेलो" हीच गोष्ट त्यांना मुख्यतः दाखवून द्यायची होती. परंतु जिला ही गोष्ट समजावला पाहिज होती तीच शुद्ध हरपून बसली होती. त्यासाठी त्यांना पुन्हा एकदा खेटा पडणार होता आणि त्याचंच त्यांना वाईट वाटत होतं.

मी जितका मोठा अधिकारी होतो तितका मोठा नसलो तरी थोडाफार साहित्यिक होतो. अनेक नियतकालिकांतून माझ्या कथा प्रसिद्ध झाल्या होत्या. दोन–चार कथासंग्रहही निघाले होते. जिवंत असताना, आपण मेलो तर आपल्या मृत्यूची बातमी साऱ्या वृत्तपत्रां-तून ठळक मथळ्याखाली प्रसिद्ध होणार याबद्दल मला वालंबाल खात्री होती. माझ्या अगोदर माझे कितीतरी साहित्यिक मित्र गच-कले होते. त्यांच्या मृत्यूची बातमी मीच अनेक वृत्तपत्रांना दिली होती. त्या प्रत्येक वेळी प्रत्येक वृत्तपत्राने त्या साहित्यिकांची छाया-चित्रं आवर्जून मागितली होती आणि ती मिळविण्यासाठी माझी कोण तारांबळ उडाली होती. त्यांच्या घरातील तसबिरी उलथ्या-

पालथ्या करून वृत्तपत्रांची गरज मी कशीतरी भागविली होती. हा सारा अनुभव लक्षात घेऊन मी माझ्या फोटोचे चांगले डझनभर प्रिंटस् काढून तयार ठेवले होते. वृत्तपत्रांना लागतात तसले 'ग्लॉसी' प्रिंटस् ! माझ्या एका मित्राने मित्रकर्तव्य म्हणून माझ्या 'दुःखद निधना'ची बातमी सगळ्या वृत्तपत्रांना पुरविलीही होती; परंतु कुणी माझे चरित्र मागितले नाही की माझ्या पुस्तकांची नावे विचारली नाहीत. फोटो तर कुणीच मागितला नाही. एकदा वाटलं आपण स्वतःच उठावं आणि साऱ्या वृत्तपत्रांना आपल्या आकस्मिक निधनाचं सविस्तर वृत्त सांगावं. पुढारी आपल्या दौऱ्याचं किंवा भाषणाचं वृत्त सांगतात तसं; परंतु मेलेल्या माणसानं असं करणं बरं दिसत नाही म्हणून मी स्वस्थ बसलो. थोडक्यात माझ्या मृत्यूमुळे 'महाराष्ट्राची अपरिमित हानी होणार नव्हती' 'महाराष्ट्र एका थोर साहित्यिकाला मुकणार नव्हता' आणि 'मराठी साहित्यात कधीही भरून न येणारी पोकळीही निर्माण होणार नव्हती.'

अत्यंदर्शन हा फार मोठा शब्द झाला–आणि वृत्तपत्रांनी माझी जी नुकतीच वोळवण केली ती लक्षात घेता तो शब्द वापरणं, माझ्या जीवावर येतं–परंतु मला पाहण्यासाठी अनेक मंडळी येऊन गेली. अपेक्षित आणि अनपेक्षित अशी; परंतु मला जिनं यावसं फार वाटलं ती मात्र आली नव्हती. ती न आल्यामुळं माझ्या मनाला सारखी रुख-रुख लागून राहिली होती. शेवटचे क्षण मी केव्हाच मोजले होते, परंतु त्यानंतरही मी क्षण न् क्षण मोजत होतो. डोळ्यातून प्राण गेले होते. त्यामुळे डोळे आपोआपच उघडे पडले होते. सताड उघडया पडलेल्या डोळ्यांनी मी तिची वाट पहात होतो; परंतु लालन आलीच नाही. लालन म्हणजे माझा जीव की प्राण होती. माझा प्राण गेल्यावर लालन माझ्या नुसती दृष्टीस पडली असती तरी माझ्या जिवात जीव आला असता. लालनवर मी फार फार प्रेम केलं. ती माझ्यावर प्रेम करीत होती की नाही हे मला कधीच समजलं नाही. परंतु तिच्यावर आपण प्रेम करतो आहोत या कल्पनेनेच माझी प्रतिभा फुलली होती. माझं जीवन बहरून गेलं होतं. माझ्या प्रेमाला प्रति-साद कधीच मिळाला नाही. लालनवर आपण जीवापाड प्रेम करतो पण तिला त्याचं काहीच वाटत नाही याची खंत माझ्या उरीमानसी सतत सलत होती. ती खंत विसरण्यासाठी मी मद्याचे प्याले रिचवीत होतो. परंतु दारूच्या कैफातही प्रेमाचा कैफ कायम होता. लालनला विसरण्यासाठी मी मद्य पीत होतो; परंतु मद्याच्या प्याल्यात उसळणाऱ्या फेसात मला प्रतिमा दिसायची ती लालनची. लालन-शिवाय आपण जगूच शकत नाही अशी माझी भावना शेवटपर्यंत कायम होती. लालनला मी हृदयाशी कधीच कवटाळू शकलो नाही. परंतु तिच्या प्रतिमेला कवटाळीत मी माझे जीवन कसेबसे व्यतीत करीत होतो. तसले जीणे असह्य होते; परंतु ते जिणे जगण्याशिवाय गत्यंतर नव्हते म्हणून मी जगत होतो. त्या जीवनाचा इतक्या लवकर अंत झाला म्हणून मनीमानसी मी सुखी होतो. इच्छा एवढीच होती ती या बर्फासारख्या थंड पडलेल्या देहावर तिचे दोन तप्ताश्रू ढळावेत. पण लालन आलीच नाही. आली फक्त कुणाच्या तरी करवी तिने धाडलेली पुष्पमाला ! त्या गुलाबपुष्पांनी शृंगारले गेले फक्त माझे प्रेत ! त्या गुलाबपुष्पात दडलेल्या काटयांनी माझे काळीज पार विद्ध करून टाकले. माझा भयंकर भ्रमनिरास झाला.

'आम्ही जातो आमुच्या गावा–आमुचा राम राम घ्यावा' हे भजन टाळमृदुंगाच्या साथीत म्हणणाऱ्या भजनी मंडळाच्या मागून मी सोनापूरच्या दिशेने मार्गक्रमण करू लागलो. अर्थात चार खांद्यांचा आधार घेऊन अत्यंयात्रा अधामार्ग्ये शब्द वापरणे आता निरर्थक आहे हे मृत्यनंतरच्या तास दोन तासातच मला उमगून गेलं होतं. तेव्हा माझ्यावरील प्रेमाने आलेली पाच आणि जुलमाचा रामराम म्हणून आलेली पन्नास–अशी पाचपन्नास माणसांची ही प्रेत-यात्रा मुंबईच्या गजबजलेल्या रस्त्यावरून हळूहळू मार्ग काढीत होती. अबीरगुलालाने माखलेल्या आणि फुलांनी झाकलेल्या प्रेताला माझ्याशी सोयरसुतक नसलेली रस्त्यावरची भाविक मंडळी 'देवाघरी जाणारी' व्यक्ती म्हणून नमस्कार करीत होती. नाक्यागोल्यावाल्यांनी, सग्यासोयऱ्यांनी–फार काय लालनने–माझी काय संभावना केली होती हे मी प्रत्यक्ष पाहिले होते. त्या पार्श्वभूमीवर या भाविकांचे जुळलेले हात पाहून माझ्या काळजात भयंकर कालवाकालव झाली. प्रेतयात्रा अर्ध्यावाटेवर येते न येते तोच माझ्या अनावृत अंगावर थेंब पडल्याचा मला भास झाला. एखाद्या महामानवाच्या महानिर्वा-णाच्या वेळी आकाशसुद्धा अश्रू ढाळते असे म्हणतात. माझ्यासारख्या








एका सामान्य माणसाची प्रेतयात्रा निघाली असताना असं काही होणं असंभवनीय होतं. मग हे थेंब कसले ? ते कोठून आले ? आणि मग लक्षात आलं की प्रेतयात्रा लालनच्या दारावरून चालली होती. तिचे तर हे अश्रू नसतील ? मी माझी नजर चहूबाजूला भिरीभिरी फिरविली. दोन्ही हातांनी आपले तोंड गच्च आवळून ओक्साबोक्शी रडणारी लालन मला कुठल्याही गच्चीत दिसली नाही. परंतु माणसाचं सारं समाधान शेवटी मानण्यावर असतं. लालन बर्फासारखी



थंडगार, दगडासारखी निर्विकार असतानासुद्धा आपण नाही तिच्यासाठी रात्रीच्या रात्री तळमळत घालवल्या? अनेक वेळा अश्रू ढाळले ? मग लालन या शेवटच्या क्षणी दोन अश्रूसुद्धा ढाळणार नाही हे कशावरून ? नक्की ! हे अश्रू लालनचेच–ज्यासाठी आपला जीव तहानेला होता तेच हे अश्रू ! मी समाधानानं डोळे मिटले. भजनी मंडळी आर्त स्वरात गात होती–"आपुलें मरण पाहिलें म्या डोळा –तो जाला सोहळा अनुपम्य."

सोनापुरापर्यंत अंत्ययात्रा येऊन टेपल्यावर आणखी एक नवल वर्तले. स्मशानभूमीवर माझ्या प्रेताची वाट पहात साहित्यिकांचा आणि संपादकांचा एक मोठा मेळावा उभा होता. वर्तमानपत्रांनी माझ्या मृत्यूची दखल घेतली नाही म्हणून मी मघाशी दुःखीकष्टी झालो होतो; परंतु मराठीतील नामवंत साहित्यिक तेथे जमलेले पाहून मला खूप हायसे वाटले. मराठी साहित्यात आपण कुणीतरी आहोत हे सारस्वतांच्या त्या उपस्थितीने सिद्ध केले. माझे प्रेत खाली ठेवतात न ठेवतात तोच सगळ्या साहित्यिकांनी मला 'घेरावो' घातला आणि साहित्यिकांच्या प्रत्येक बैठकीत अनाहूतपणे घुसून नेहमीच चर्पटपंजरी करणाऱ्या दत्ता डावरेने एकदम 'मित्र हो', म्हणून आपल्या भाषणास सुरवात केली. डावरे म्हणाला, "मित्र हो, आज महाराष्ट्र एका थोर लेखकाला मुकला याबद्दल कुणालाही दुःख होईल; परंतु माझं दुःख त्याहूनही मोठं आहे. मी माझ्या एका जिवलग मित्राला अंतरलो आहे. (डावरे आणि माझा मित्र ? आणि तोही जिवलग ?) गजाभाऊ गेले या गोष्टीवर माझा विश्वासच बसत नाही. काल संध्याकाळीच आम्ही "गुर्दी"मध्ये भेटलो होतो. एकत्र चहा घेतला होता. (हे मात्र साफ खोटं हं–) माझ्या आगामी कादंबरीचे संपूर्ण कथानक त्यांना त्यावेळी मी ऐकवले होते. गजाभाऊ मला तेव्हा म्हणाले होते, "दत्ता तू नावानं जरी 'डावरा' असलास तरी साहित्यिक म्हणून 'उजवा' आहेस. (हंशा. प्रचंड हंशा–शोकसभेत वरं !) त्यानंतर २७ पुस्तकांची नामावली ऐकवली. अप्रसिद्ध म्हणजे आगामी अशा २८ पुस्तकांची कथानकें सुनावली.

श्वास घेण्यासाठी डावरे थांबला असतानाच 'अंगना' या स्त्रियांमध्ये अत्यंत लोकप्रिय असलेल्या मासिकाचे संपादक श्री. निशिकांत नवरे 'मित्र हो' अशी हाळी मारून बोलायला उभे राहिले. डावरेला आपले भाषण अर्ध्यावरच सोडून द्यावे लागले. वक्तृत्वकलेत पारंगत होण्यापूर्वी आपण प्रथम प्राणायम केला नाही याचा त्याला पश्चाताप झाला होता. नवरे म्हणाले, 'मी स्त्रियांचं मासिक चालवितो. आज 'अंगनां'चा खप १० हजाराच्या वर आहे. 'अंगना' ही प्रत्येक महाराष्ट्रीय महिलेची जिवाभावाची सखी झाली आहे. गजाभाऊंचा आमच्या 'अंगने'शी फार जवळचा संबंध होता. (पुन्हा 'प्रचंड हंशा–अरे ही काय शोकसभा आहे की विनोदी परिसंवाद?) माझ्या म्हणण्याचा अर्थ असा की "तुमच्या समस्या" हे सदर गजाभाऊ 'सुभाताई' या टोपणनावाखाली गेली कित्येक वर्षे चालवीत होते. हे सदर 'अंगने'चे खास वैशिष्ट्य होते. परंतु या सदराखेरीज




अनुक्रमणिका

इतर अनेक खास सदरांमुळे आमची 'अंगना' महाराष्ट्रातल्या प्रत्येक घरात जाऊन पोहोचली आहे." यानंतर श्री. नवरे यांनी अंगनेच्या निरनिराळ्या सदरांची आणि त्यात येणाऱ्या मजकुराची सविस्तर माहिती उपस्थित श्रोतृमंडळींना ऐकवली.

त्यानंतर एकामागून एक साहित्यिक बोलले. मला श्रद्धांजली वाहण्याबाबत त्यांच्यात अहमहमिका लागली होती. अर्थात प्रत्येकाच्या श्रद्धांजलीत अर्थातच 'अहम्' जास्त होता. प्रत्येक जण स्वतःचा नगारा वडवीत होता. माझी टिमकी वाजतच नव्हती.

सर्वांत शेवटी बोलले ते आमच्यातील ज्येष्ठ आणि श्रेष्ठ साहित्यिक भास्कर लक्ष्मण तथा भा ल चित्रे. ते म्हणाले, "आताच कुणीतरी म्हणालं की, गजाभाऊ हे त्याचं आराध्यदैवत होतं म्हणून त्यानं जेव्हा जेव्हा लेखणी उचलली ती या गजाननाला वंदन करूनच. परंतु या आराध्य दैवताचंही एक आराध्य दैवत होतं. तेच आज आपल्यापुढं बोलायला उभं राहिलं आहे. गजा मला गुरुस्थानी मानत होता. (भले गुरुजी ! वयानं ज्येष्ठ असलेल्यांचा एखाद्यानं मान ठेवला की लगेच तो तुमचा शिष्य होतो ?) आपण सर्वांनी मोठ्या आदराने त्याचा गजाभाऊ म्हणून उल्लेख केला. परंतु गजा २५ वर्षांपूर्वी जसा माझ्यापुढे बच्चा होता तसाच तो कालपरवापर्यंत होता. पंचवीस वर्षांपूर्वी अर्धी चड्डी घालून आपली कवितांची वही घेऊन आपण भास्कररावांकडे गेलो होतो ही गोष्ट गजा कधीच विसरला नाही. (पण शेवटपर्यंत मी चड्डीतच होतो का ?) आपली प्रत्येक कलाकृती तयार झाल्यानंतर तो ती प्रथम मला दाखवी. माझा अभिप्राय विचारी. (ही मात्र थाप हं !) त्याला माझ्याविषयी नितांत आदर होता. माझ्या वाङ्मयाचा तो एक नुसता चाहताच नव्हे तर निस्सीम भक्त होता. माझी शैली त्यानं 'आदर्श' म्हणून सदैव आपल्या डोळ्यापुढं ठेवली होती. माझ्या प्रासादिक आणि ओघवती शैलीची त्यानं सही सही नक्कल केली. (मेलेल्याला मारून तुम्हा आणखी किती मोठं व्हायचंय भालजी ?) अर्थात चोखंदळ वाचकांना सोनं कोणतं आणि हीन कोणतं हे पटकन् कळायचं. परंतु इथे मुद्दा आहे तो गुणवत्तेचा नसून श्रद्धेचा. पूर्वसुरींबद्दल श्रद्धा नसलेल्या या श्रद्धाहीन पिढीतील एक श्रद्धावान साहित्यिक म्हणून मी गजाचा उल्लेख करीन. .तो श्रेष्ठ श्रेणीचा साहित्यिक होता. जिवाला जीव देणारा मित्र होता. प्रेमळ पिता होता. एकनिष्ठ पती होता. अर्थात गजा खरोखरीच गेला म्हणून मी हे सारं बोलतोय् (पुन्हा प्रचंड हशा). एरवी सदैव विनम्र असलेला गजा या स्तुतीनं शरमिंदा झाला असता. मला ही सारी भाषणं असह्य झाली होती. जो तो आपलंच घोडे पुढं दामटत होता. माझ्याबद्दल बोलायच्याऐवजी स्वतःबद्दलच बोलत होता. माझा संताप अनावर झाला. भालजी बोलत असतानाच मी ताडकन् उठलो आणि या साऱ्या महाभागांना विचारलं, "लेकोहो, मेलं आहे कोण ? तुम्ही का मी ?" • • •

[पान ८१ वरून . . . अश्वत्थामा]

हा होता मध्यम वयाचा. उंचीला वेताचा, अंगानं किरकोळ. ह्यानं केस नि दाढी वाढवली होती. डोळे मात्र विलक्षण तेजस्वी होते.

अण्णाजींना ह्यानं नमस्कार केला. पायाचं बॅण्डेज सोडून अण्णाजींनी मलमपट्टी केली. म्हटलं, "दोन दिवसात आता हिंडूफिरू लागशील बेटा !"

आणि चार दिवसांनी आदिवासींच्या परिस्थितीची चौकशी करण्याकरिता सरकारने कमिशन नेमल्याचं जाहीर झालं. अण्णाजी रेड्डीकरांनी वर डोंगरात फिरून ह्या लोकांना ती गोष्ट नीट समजावून सांगितली. तशी आदिवासींनी चळवळ मागं घेतली. हत्याकांड संपलं. पेटलेले डोंगर थंड झाले.

आता पत्रकारांचं काम संपलं. मुक्काम संपवून ते मुंबईला परतले. त्यांनी अण्णाजींचे आभार मानले. 'अरण्यात इथं मरू नकोस. मुंबईला ये,' असा त्यांनी मला सल्ला दिला. रैनाला तर ही बक्षिसं दिली.

अय्यरनं सांगितलं, "हिला घेऊन मुंबईला या. आपण डॉक्टरना दाखवू तिला."

या मुक्या पोरीनं शब्दही न बोलता फक्त नजरेनंच या सगळ्यांना वांचून टाकलं होतं.

माळ्यावरचा दुखणकरी एव्हांना बरा झाला होता. अण्णाजींनी ह्याला ईशारा दिला होता की बाहेर कुणाच्या नजरेस पडू नकोस. त्याला नाचगाण्याची माहिती होती वाटतं. घरच्या घरात चाळा म्हणून रनाला हा नाच शिकवू लागला.

आठवडाभरानं बेटा स्वत:च थयथय नाचत अण्णाजींच्या खोलीत आला.

अण्णाजींचे पाय धरून बोलला, "अण्णाजी"––

"काय बेटा !"

"माझं नाव राजनारायण."

"हां, राजनारायण."

राजनारायणानं सांगितलं, "जन्माचं चीज झालं. गुरूच्या कृपेनं शिष्य मिळाला. हिला मी नाच शिकवणार. माझं सगळं ज्ञान आणि कला हिच्यात ओतणार. अण्णाजी, पोरीची काळजी करू नका. ती मोठी होणार. नाव मिळवणार. तुम्हाला नि मला नाव मिळवून देणार. . ."

राजनारायणचं भविष्य खरं ठरलं.

कारण पुढं तीन वर्षांनी रैनाच्या नृत्याचा पहिला कार्यक्रम 'षण्मुखानंद'ला झाला तेव्हा मुंबईच्या लोकांनी तिला अक्षरशः डोक्यावर घेतलं. तो विजलीचा पदन्यास, देहाच्या लवलवत्या हालचाली, सहजसुलभ मुद्राभाव आणि मुख्य म्हणजे अंतःकरण फाडून उघडं करणारे बोलके दोन डोळे. रैनानं प्रेक्षक जसे मंत्रमुग्ध केले होते. नागांसारखे तीन तास हे डोलत राहिले.

वृत्तपत्रांनी तर हिच्यावर कौतुकाचा नुसता वर्षाव केला. कोणी तिला मुकी क्लिओपात्रा म्हटलं. कोणी काळी उर्वशी बनवलं. एकानं तर मत दिलं, "माणसाच्या रूपानं नाचणारी वाघीणच. तशी सुंदर, चलाख, चपळ आणि क्रूरसुद्धा. होय, मुकी रैना तुम्हाला गारदच करते."

एका दिवसात रैना एकदम अशी शिखरावर पोचली. तिच्या प्रत्येक कार्यक्रमाला तुफान गर्दी लोटू लागली. मुंबईत ज्याच्या त्याच्या तोंडी तिचं नाव झालं. तिचं अभिनंदन करायला थिएटरवर नि सरदारगृहात भलीभली लोकं येऊ लागली.

सिनेमावाल्यांची अण्णाजींकडे रांग लागू लागली. एकेकाला वाटेला लावता लावता ह्यांचा मात्र घसा बसला. कॅबरे डान्सचे ठेकेदार तर ह्यांच्या पाठीशीच लागले, "छोकरीको हमपर छोडो. महिना दो हजार रुपिया देऊंगा !" डान्स मास्तर राजनारायण असा खवळायचा. दांडा घऊन हा रस्त्यापर्यंत त्यांच्या मागं धावायचा.

तात्यारावांचा मुलगा चेतन विजयकर तर घरचाच झाला होता. सरदारगृहात याची रोज चक्कर पडू लागली होती. बरोबर नाथ पालेकर. रैना असेल तिथं ह्याची बैठक पडायची. कारण तिचं तिलाच ठाऊक ! पण हे आले की रैना बेचैन व्हायची. हे बोलू लागले की तिच्या कपाळाला आठ्या पडत. त्यांचा वागण्यातला रुबाब तिचं डोकं उठवी. आणि त्यांची नजर–हिच्या अंगावर काटा उठे. रैनाची तडफड मला कळत होती. पण बोलून दाखवता येत नव्हती. आणि तिला तर बोलताच येत नव्हतं. . . . .

[७]

रात्रभर माझा डोळा लागला नाही. कॉटवर नुसता तळमळत होतो. कुशी परतत होतो.

डोकं भणभणलं होतं. फुटतं तर बरं होतं.

माश्यांचं मोहळ घोंघावत होतं. मध कुठंच नव्हता. मेणालाच मधमाशा डसत होत्या, वसवसत होत्या.

रैनाला अपघात झाल्याचं अण्णाजींनी फोनवर मला कळवलं होतं. हॉस्पिटलात टाकलं होतं. तिथं कोणालाच तिला भेटण्याची परवानगी नव्हती.

बस्स ! अधिक एक शब्द नाही.

त्यांच्या शब्दावर मी विश्वास टाकला होता. नेहमीसारखा. बेधडक. शंका घ्यायचं कारण नव्हतं. कारण अण्णाजी रेड्डीकर माझ्याकडे कधी खोटं बोलले नव्हते. बनवेगिरी, फसवाफसवी वगैरे त्यांच्या स्वभावात नव्हतं. प्रयत्न करूनही या गोष्टी त्यांना जमल्या नसत्या.

मग ? तात्यारावांच्या पत्रात . . . हे काय ? ते खरं असलंच पाहिजे. उगाच आत्महत्या करायला तात्यारावांना वेड लागलं नव्हतं.

खरं काय ? नि खोटं कोणतं ?

अण्णाजींनी खोटं सांगितलं नसेल ! पण शक्य आहे की संपूर्ण सत्यही त्यांनी सांगितलं नसावं. फक्त माझा संबंध येतो तितकीच माहिती दिली असावी.

संबंध ? त्यांचा माझा इतकाच संबंध होता का ? गरजेला, गरजेपुरताच ?

माझंच चुकलं होतं. हॉस्पिटलाचं नाव विचारायला हवं होतं. पत्ता असता तर बरं झालं असतं. काय तो सोक्षमोक्ष लावता आला असता. पण सुचलंच नाही. हे असं काही असेल अशी थोडीच कल्पना होती म्हणा ! पत्रकाराच्या हिशेबी ही मोठीच चूक होती. नो एस्क्यूज !

स्वतःला शिव्याशाप देत मी रात्र घालवली. सकाळी उठलो आणि नाक्यावर इराण्याकडून सरदारगृहाला फोन केला. अण्णाजींचा मुक्काम तिकडेच होता. मॅनेजरानं सांगितलं चार दिवसांपूर्वीच ही मंडळी खोली खाली करून गेली. रेड्डीकरांबरोबरच्या त्या मुक्या पोरीला अपघात का काय झालं होतं. कुठल्या तरी नर्सिंग होममध्ये इलाज चाललेत. पत्ता वगैरे त्यालासुद्धा ठाऊक नव्हता.

काय गंमत होती बघा. तात्याराव विजयकर आणि अण्णाजी रेड्डीकर— माझ्यावर दोघांचंही वडिलांप्रमाणं प्रेम. पैकी एक, यू हॅव्ह टु क्लिअर अप धिस मेस बॉय–असं मला बजावून जीव देऊन मोकळा झाला होता. खुद्द स्वतःवर नव्हता इतका त्यांचा माझ्यावर विश्वास होता. या विश्वासापोटीच नाही ती जबाबदारी त्यांनी माझ्यावर टाकली होती.

दुसरे अण्णाजी.

पार तळापर्यंत बुडालो होतो तेव्हा केसाला धरून ह्यांनी मला वर ओढला. माझ्यातील माणसाचा मुडदा उठवला, उभा केला. त्याला ताठ मानेनं जगायला शिकवलं. 'कधी खाली मान घालण्याचा प्रसंग येऊ देऊ नकोस बेटा !' हा एकच पाठ कानीकपाळी कोरला.

आणि आज प्रसंगाला आपण मात्र . .

नाही, शक्य नाही. ते भेकड, भ्याड नव्हते. परिस्थितीला तोंड देण्याची हिंमत या गृहस्थामध्ये होती. मैदान टाकून असे पळून नाही जाणार. त्यापेक्षा मरून हौतात्म्य पत्करतील. मला ठाऊक होतं. अण्णाजींना मी अधिक ओळखत होतो . . . .

रैना मुकी आहे ही गोष्ट ठाऊक असणारी हजारो माणसं साक्ष द्यायला पुढं झाली असती. बलात्कार झाला आणि त्या मानसिक आघातामुळं तिची वाचा परत आली ही गोष्टसुद्धा डॉक्टरच्या तपासणीत सिद्ध झाली असती. नाही तरी रैनाचं मुकेपण जन्माचं नाही. मेंदूला भयंकर धक्का बसण्याजोगी घटना लहानपणी हिच्या आयुष्यात घडली असावी. त्यामुळं हिची वाचा गेलेली असावी असं के. ई. एम. च्या ब्रेन स्पेशॅलिस्टानं निदान केलं होतंच. या व्यंगावर या देशात नाही, पण तिकडे अमेरिकेत शस्त्रक्रिया करतात. त्या यशस्वी झाल्याचंही आपल्याला ठाऊक आहे, अशी त्यांनीच माहिती दिली होती. आणि हे ऑपरेशन करण्यासाठीच अण्णाजी अमेरिकेला निघाले होते. रैना बोलूचालू लागलेली बघून खरं म्हटलं तर त्यांना आभाळ ठेंगणं व्हायला हवं होतं ! आनंदाची ही बातमी घेऊन प्रथम माझ्याकडेच ते धावत यायला हवे होते !

पण काय असेल ते असो नाना खस्ता खाऊन वाढविलेली ही मुकी पोर बोलू लागल्यामुळं अण्णाजींना आनंद झाला नव्हता हे मात्र नक्की. तसं नसतं तर त्यांनी ही गोष्ट माझ्यापासून कधीही लपवून ठेवली नसती. फोनवर अपघाताची अर्धवट बातमी सांगून ते मुळी बेपत्ताच झाले होते. मी भेटेनबिटेन म्हणून सरदारगृहातून चालते झाले







होते. इतकंच नव्हे. स्मशानात माझी गाठ पडायला नको म्हणून तर तात्यारावांच्या अंत्यक्रियेलासुद्धा ते हजर राहिले नसावेत.

माझ्या डोक्यात प्रकाश पडू लागला. एकएक गोष्ट स्पष्ट होऊ लागली. उगाच मी आश्चर्य करीत होतो. सरळ, सुसंगत होतं सगळं. अगदी लॉजिकल.

अण्णाजींचा माझ्यावर असावा तितका विश्वास नव्हता. माझ्याबद्दल निश्चित खात्री नव्हती. त्यांच्या दृष्टीनं, मी अजून बच्चा होतो, कच्चा होतो. हेच खरं!



भेटते तर बरं झालं असतं. तात्यारावांचं हे पत्रच त्यांच्या हातात ठेवलं असतं. म्हणालो असतो, "हा अगडबंब क्रूस खांद्यावर घेतोय अण्णा. तुमचा आशीर्वाद हवाय."

होय! त्यांचा आशीर्वाद मिळवायलाच हवा होता. काय वाटेल ते करून. त्यांना गाठून सगळा हा उलगडा व्हायला हवा होता. तोपर्यंत काहीच करायला मी मोकळा नव्हतो.

सगळं सगळं विसरून दोन दिवस या एकाच उद्योगात घालवले. यांचा पत्ता लावण्यासाठी उभी मुंबई पालथी घातली. हॉस्पिटलं झाली. खाजगी शुश्रुषागृहे शोधली, लहान मोठी लॉजिंग बोर्डिंगं आणि खाणावळी धुंडाळल्या. अण्णाजींच्या ओळखीपाळखीच्या लोकांकडे चकरा मारल्या. इतकंच काय पण पोलीस ठाण्यावर जाऊन रजिस्टरमध्ये बलात्काराच्या गुन्ह्यांच्या नोंदीसुद्धा वाचल्या. .

वेडेपणाच होता. पन्नास लाख वस्तीच्या या मुंबईत बिगरपत्ता एखाद्या माणसाचा तपास करणाऱ्याला मी तरी सरळ ठाण्याला पोचवला असता.

पण मी तेच करीत होतो. इलाज नव्हता. दुसरा पर्याय होताच कुठं?

जेवणाखाणाची शुद्ध नव्हती. सवयीनं हॉटेलात जायचो. सवयीनंच कधी कॉफी, कधी चहा मागवायचो. फसाफसा सिगरेटी फुंकत रस्त्यावरच्या रहदारीकडे टक लावून बसायचो. बाजूचं वर्तमानपत्र चाळावसंसुद्धा वाटत नव्हतं. 'रडया लेकाचा!' मनाची अशी लाथ मिळाली की उठून चालू लागायचो. मग रस्त्याला लागेल ते हॉस्पिटल, लॉजिंग किंवा आणिक काय, काय. . . .योगायोगावर माझा विश्वास नव्हता. मात्र वाटू लागलं होतं एक योगायोगच या त्रांगड्यातून मला मोकळा करू शकेल!

आणि साल्या योगायोगाचाही माझ्यावर विश्वास नव्हता.

तसं नसतं तर या अय्यरऐवजी अण्णाजींनाच त्यानं माझ्या पाठीशी उभा केला असता.

फोर्टमध्ये. कॉफीहाऊसच्या बाहेर उभा होतो. तर पाठीवर थाप. मी रागातच पाहिलं.

"थिन्क ऑफ धि डेव्हिल अॅन्ड धि डेव्हिल इज बिफोर यू!" फ्री प्रेसचा हा हा एस रिपोर्टर खिदळला.

"गेलास खड्ड्यात!" मी शाप दिला.

"वहाँही जाता हूं रे," तो आपल्या मद्रासी हिंदीत बोलला, "फिर तुमको लेके. तुमारा वो इडियट एडिटर मर गया ना, उसीको वास्ते मिटींग है!"

आणि याच्याकडून मला कळलं. साहित्यसंघात तात्यारावांच्या निधनानिमित्त शोकसभा होती. अय्यरनं या संपादकाचं नाव यापूर्वी कधी ऐकलंही नव्हतं. चार दिवसांपूर्वी त्यानं आत्महत्या केली. आणि मग गेले दोन दिवस ही 'फ्रन्ट पेज न्यूज' झाली होती. इंग्रजी पेपरांनाही ताकीद होती—'फुल रिपोर्ट द्या!" म्हणजे ह्यांची पंचाईत. मद्राशांना मराठी येत नव्हतं.

म्हणून तर अय्यर मला मस्का लावीत होता. हाताला धरून कॉफी हाऊसमध्ये त्यानं मला ओढून नलं. ग्लासभर कोल्ड कॉफी पाजली. कधी नाही ते विल्सचं पाकीट पुढं केलं. एक आपण शिलगावली.

तो इंग्रजीत म्हणाला, "ह्या एडिटरचं मृत्युपत्र वाचलंस?"

तात्यारावांच्या मृत्युपत्राशी मला कर्तव्य नव्हतं. हवेत जिरत जाणाऱ्या धुम्रवलयांकडे उदासीनपणं पहात मी म्हटलं, "नाही."

"बारालाच जाहीर झालं. संध्याकाळच्या पेपरांना आलं असणार. हॉट न्यूज—" अय्यर सांगू लागला, "आपला डेली त्यानं मुलीच्या नावावर केला आहे. मांडारकर म्हणून कोणी फलाणा संपादक नेमलाय. . . ."

"मग हे मला कसं माहीत नाही?" सिगरेटचं जळतं थोटूक धूम्रपत्रात चिरडत मी ओरडलो.

"हा मराठी जर्नालिझम मिस्टर!" तो हसत म्हणाला, "बातम्या आम्ही काढाव्या. तुम्ही भाषांतरं करावी. आणि बोंब मारावी, मुंबई महाराष्ट्राची आहे."






अनुक्रमणिका

शोकसभेला संघमंदिरात आम्ही उशीरा पोचलो.

सभागृह संपूर्ण भरलं होतं. मुंगी शिरायला वाव नव्हता.

माझ्यातला हॅम्लेट फणा काढून राहिला. कुरकुरू लागला बेटा. ते चित्र आठव आणि हे चित्र पहा!

व्यासपीठावर खुर्चीत बसलेल्या प्रतिष्ठित मंडळीपैकी त्या दिवशी स्मशानात एकसुद्धा कुठं दिसला नव्हता.

तेव्हा खरं काय तर माणूस आपल्या कर्मानं मोठा होतच नाही. तो मोठा होतो लोकांच्या धर्मानं.

अशा प्रसंगाकरिता खास राखून ठेवलेल्या आवाजात आणि शब्दात प्रत्येकजण तात्यारावांचे एकएक गुण आठवून हळहळत होता. कोणाला त्यांच्यात रामशास्त्रींचा निस्पृहपणा दिसत होता. जरा जास्तच. कारण रामशास्त्र्यानं जीव दिला नव्हता. ह्यांनी दिला. कोणाला त्यांची साधी रहाणी आणि विचारसरणी गप्प बसू देत नव्हती. तात्याराव मात्र ह्या दोन्हीमुळं कायमचे गप्प झाले होते. टिळक-आगरकरांच्या परंपरेतला हा अखेरचा मणी ढळला म्हणून बहुतेकांनी अश्रू ढाळले. नाहीतरी ह्यांचे अश्रू मोत्यांइतके किंवा अधिकच मौल्यवान होते. त्यांच्या निधनानं मराठी वृत्तपत्रसृष्टी पोरकी झाली. ती पोकळी आता भरून निघणे नाही असाही कित्येकांनी टाहो फोडला. ...

विचारा श्रोतृवर्ग—तीन–चार हजार असेल–म्हणजे तोसुद्धा विचारात पडला. हा कोण तात्याराव का काय तो खरोखरच इतका मोठा होता का? मग आपल्याला पूर्वी कसं ठाऊक नव्हतं? का मेल्यावर एखाद्याला मोठे करायची रीतच आहे या मोठ्या मंडळींची? कारण त्याशिवाय हे मोठं होणार नाहीत. कशाला विचार करायचा म्हणा? बोलतायत तर बोलू द्या! ह्यांनाही नाहीतरी बोलायला कुठून मिळणार आणि ही मंकस ऐकायला आपल्याला तरी एरव्ही कुठं संधी मिळणार?

चष्मा पुसीत नाथ पालेकर टबलाशी उभा राहिला. चष्मा डोळ्यांना लावला. त्यानं समोर श्रोत्यांवरून नजर टाकली. अस्पष्ट, घोगऱ्या आवाजात, बुश शर्ट पॅंटावरून खाली ओढत चारपांच वाक्यं पुटपुटला. मायक्रोफोन जवळ ओढला. नाटक हे. शोकाचं. बऱ्यापैकी. मग हळूहळू त्यानं आवाज चढवला. "आज सार्वजनिक जीवनात मला जे काही स्थान आहे त्याचं श्रेय मी एकाच व्यक्तीला देतो–तात्यारावांना. मी असा झालो. कारण त्यांनी मला असा घडवला. बी.ए. झालो. नशीबानं फर्स्ट क्लास मिळाला. तर तात्यांचा निरोप 'भेटून जा.' गेलो तर म्हणाले, 'देवानं फर्स्ट क्लास डोकं दिलंय रे. हे काय फायलीत घासत बसणार?' मी विचारलं, 'म्हणजे काय तात्या?' ते म्हणाले, 'कळेल बेटा. उद्यापासून माझ्या जनमतात ये.' चार वर्षं जनमतात होतो. तर तात्यांनीच एक दिवस सांगितलं, 'बेटा, आता मोठा झालास. जन्मभर माझ्या जनमतात तुला मी बांधून ठेवू इच्छित नाही. मी स्वार्थी नाही. देशाला तुझी अधिक गरज आहे. जा! तुझी बुद्धी, शिक्षण, अनुभव देशाच्या कारणी लाव. जो आपल्यापुरताच जगतो तो एक दिवस मरतो. म्हणून या लोकांसाठी जग. चिरंजीव हो. लक्षात ठेव तू जिथं जिथं असशील तिथं तिथं तात्यारावांच्या सदिच्छा तुझ्याबरोबर आहेत. तुमच्या दृष्टीने तात्याराव एक थोर पत्रकारच होते...'

मी उठलो. चालू लागलो.

मागून अय्यरनं शर्ट खेचला, गळ घातली. "आय से वेट नॅन!"

लोकांनीच ह्याला गप्प बसवलं, "यंडुंडू. लड्या चूप!"

[८]

काळोख्यात आधी दिसलं नाही. आणि मग जेव्हा पाहिलं तेव्हां उशीर झाला होता. आता सुटका नव्हती.

खोलीच्या दारात मिरा उभी होती. केव्हापासून तिलाच माहीत.

"तुम्ही?" हसण्याचा माझा प्रयत्न

"सॉरी!"



(दीपा. १५)








अनुक्रमणिका

" महंमदलाच अखेर डोंगराकडे यावं लागलं." तिचा अहेर.

" आत येता ?" मी विचारलं.

" तुम्ही बाहेर येण्यास तयार नसलात तर." तिनं सांगितलं.

" मग चला. बाहेरच वरं ! " मी म्हटलं

तिनं विचारलं, " का ? आत आले तर खोली विटाळेल तुमची ?"

" तसं नाही. पण आमचा उघडा संसार पसंत पडणार नाही. "

मी कुलूप काढलं. दार उघडलं. दिवा लावला.

दोन दिवसांची वर्तमानपत्रं दारातच पडली होती. पत्रंसुद्धा. ती उचलली. कॉटवर टाकली. खोलीत खुर्चीसुद्धा नव्हती. म्हणून कॉटवरची वर्तमानपत्रं पुन्हा खाली फेकावी लागली. चादर झाडली. जरा नीट केली.

मग मिराला मी म्हटलं, " बसा."

"दोन दिवस पेपर वाचलेच नाहीत वाटतं ?" तिनं विचारलं. माझी कबुली,

" खुर्चीवर आलाय को ण ?"

" का ? "

" आठवणच झाली नाही."

" कुठं होता ?" तिनं उलट तपासणी चालवली होती.

" तेही आठवावं लागेल." मी हसून म्हटलं, "एक मात्र नक्की चोरून ठेवण्यासारखी ही ठिकाणं नव्हती."

" आणि ठेवलीत तरी मला काय करायचंय" मिराही हसून म्हणाली, "दोन दिवस कार्यालयाला दांडी मारलीत."

" राजिनामाच धाडणार होतो. पण विचार केला. तितकी तरी तसदी कशाला घ्या ? कामावर गेलं नाही की काढून टाकतीलच नोकरीवरून."

ती हसली. या खेपेला मनमोकळं, दिलखुलास.

मग एकदम आठवण झाल्यासारखं करून तिनं विचारलं, " हे तरी कळलं का ? तात्यांचं मृत्युपत्र ?"

" कॉफी हाऊसला फ्री प्रेसच्या रिपोर्टरनं सांगितलं. मग बुलेटिन विकत घेतलं. अभिनंदन" माझ्या स्वरात अजिबात जीव नव्हता.

" मीसुद्धा तुमचं अभिनंदन करायला आलेय."

" माझं ? कशासाठी ?"

" संपादक झालात म्हणून " तिनं उत्तर दिलं.

मी गप्पच राहिलो.

" भांडारकर --"

" बोला ! "

" म्हणजे मीच बोलायला हवं ?" मिरानं विचारलं. जरा नाराजीनं.

" बोलण्यासारखं माझ्याकडे काहीच नाही." मी हसून जाब केला. " आजतरी."

" उद्या येणार आहात का ऑफिसला ?"

" नाही."

" परवा ?"

" अंऽहं ! "

" मग केव्हा ?"

" कधीच नाही." एकदाचं मी सांगून टाकलं. आणि सुटकेचा निश्वास टाकला.

मिरानं चमकून पाहिलं. माझ्या डोळ्यातच मला ही शोधत राहिली. मग जड शब्दात म्हणाली, " माझाच नाही, तात्यांचासुद्धा विश्वासघात करणार आहात का तुम्ही ?"

" कोणाचाच विश्वासघात करायचा नाही मला."

" भय्या बोललाच होता--" मिरानं वाक्य अर्धच सोडलं

मी मुद्दामहून चेष्टेनं म्हटलं, "काय बोलले तुमचे भय्यासाहेब ?"

ती भडकली, " चेष्टा नका करू ! काय खोटं बोलला हो भय्या ? तो म्हणाला संधी आली आणि तात्यांनी चूक केली नाही असं कधी झालंच नाही. त्यांची अखेरची आणि सगळ्यात मोठी चूक हे मृत्युपत्र. तू मालक, भांडारकर संपादक. मिरा तात्यांचं 'जनमत' त्यांचं बारावं साजरं करायला जगत नाही."

" बंधुराजाच्या या भविष्यानं सावध व्हा ! तात्यांची अखेरची ही मोठी चूक दुरूस्त करा. जाब विचारायला ते जिवंत नाहीतच." मी उपरोधानं म्हटलं.

" नाही." मिरानं निर्वाणीचं सांगितलं, 'तात्यांनी एक चूक केली तर मी सात करीन. त्यांचीच लेक आहे मी."

" तुमची मर्जी ! "

" माझ्या मर्जीचा प्रश्न नाही. भांडारकर. तुमच्या आहे."

" खरं सांगू ?" मी बोललो.

" खरं सांगा, खोटं सांगा. सगळं ऐकेन. फक्त नाही म्हणू नका."

" तुमच्या भय्याचं माझ्याबद्दल बरं मत नाही. कारण मला ठाऊक नाही."

" ठाऊक आहे मला. ते पालेकर हवेयत भय्याला." मिरानं माहिती दिली.

जादूगाराची काम'गिरी'



एक, दो, तीन... छुमंतर चले जाव ! गया !!

"वाटलंच. साहित्य संघातील आजच्या शोकसभेला नाथानं हजेरी लावली तेव्हाच मला संशय आला. असा बेफाम बोललाय लेकाचा. सुपरलेटिव्हज्‌मध्यं. स्वतःबद्दलच खूप. अधूनमधून तात्यारावांबद्दल. मी अर्ध्या-वरून उठून आलो. तर हे असं आहे काय ?" मी हात उडवले.

मिरा बोलली, "दोन दिवस जनमत वाचलाच नाही तुम्ही. वाचला असता तर कळलं असतं की धम्माल चाललीय. इतक्या दिवसात तात्यांनी चुकूनही कधी एक दिवस जनमतात आपलं नाव येऊ दिलं नव्हतं. गेले दोन दिवस हेड लाईनीच मुळी या–'तात्यारावांची परंपरा आम्ही चालवणार–त्यांचे शिष्य.' 'तात्यारावजी काल आमच्या स्वप्नात आले.'

मी वैतागानं ओरडलो, "अहो जा, आधी त्यांना आवरा! तात्यारावांच्या आत्म्याचा त्यांनी लिलाव लावलाय."

"होय ना भांडारकर! आतल्या आत मी रडते, चिडते, फडफडते. पण बाई माणूस. ह्यांना मी कशी नि काय आवरणार?" मिरा हताश होऊन बोलली. हातरुमालानं डोळे पुसू लागली.

"माझंच चुकलं मिस विजयकर !"

"आ !"

"माझ्या लक्षात यायला हवं होतं."

"काय ? मी बाईमाणूस आहे हे ?" रडतारडताही ती खुदकन हसली. श्रावणा-तल्या आभाळासारखी.

तिच्या हसण्यानं मला सावध केलं. बाहेर उधळू बघणाऱ्या अंतःकरणाला अलगद लगाम लागला.

"बरंय ! उद्यापासून येतो मी !" मी सांगितलं.

"खरं !" एकच शब्द. हर्ष, उत्साह, कृतज्ञता . . चिप्प भिजलेला, थबथबलेला.

दुसऱ्याच क्षणी आवेगानं मुसमुसत ती जवळ आली. एखाद्या लहान मुलाला जवळ ओढावं तसं हिनं मला ओढलं. माझ्या गालाची, कपाळाची, ओठाची ती चुंबने घेत सुटली.

"मिरा––मिरा" मी हिला अडवली. दूर करण्याचा प्रयत्न केला, "वेडी तर नाहीस ?"

"होय, वेडीच आहे मी. मला वेडीच राहू दे रवी. शुद्धीवर यायचंच नाही मला." तिनं सांगितलं.

"घरी नाही जायचं ?" मी विचारलं, "ड्रायव्हर बोलवलं असेल रस्त्यावर."

"नाही––नाही" तिनं जोरानं मान हलवली. "इथंच झोपणार मी. जा, निरोप देऊन ये डेव्हिडला. गुडबाय !"

"धिस इज टू मच मिरा !"

"धिस इज टू लिटल् !" तिनं ताडकन उत्तर दिलं, "अधिक काही मागत नाही. फक्त थोडी जागा तुझ्या शेजारी––या कॉटवर. एका दगडाला मिठी मारुन निजेन म्हणते. त्या कठीण, थंड, निर्जीव स्पर्शानं जिवाला तीव्र कळा करुन घ्यायच्यात मला. दाखवायचंय मला की मी व्हर्जिन आहे. तुम्ही काय म्हणता ते–होय, अनाघ्रात आहे. पालेकर म्हणतो तशी त्याच्याबरोबर मी निजलेली नाही . ."

प्रकरण असं एकूण माझ्या हाताबाहेर चाललं होतं. मी काय करणार होतो मला तरी कळत नव्हतं . . . . . आणि मला वाटतं याचंच मला हसू लोटलं. आवरेनाच. मी मोठमोठ्यानं हसत सुटलो.

"पुरे बाबा ! कळलं." मिरानं म्हटलं. हसून. "जाते मी. तू कासावीस नको होऊस."

"शेवटी मीच वाईट." मी विचारलं.

"तुम्ही ? नो . . . . नो ! तुम्ही ग्रेट, बिल्कुल हिरो ! एक अफलातून पोरगी इतकी गळ्यात पडत होती तरी अब्रू राखलीत. आपली आणि तिचीही." खोलीतून अशी खिदळतच ती बाहेर पडली. "फरगेट इट, साफ विसरुन जा सगळं. उद्या ऑफिसला यायचं विसरू नका मात्र."

डेव्हिडनं गाडीतूनच सलाम ठोकला, "दोन दिवस कुठं गुल होता साहेब ? फुकट ताप बाकीच्यांना. माझ्याच डझन-भर खेपा झाल्या बघा !"

"डेव्हिड, उद्या अकराला यांना गाडीतून ऑफीसला आणायचं." मिरानं म्हटलं, लक्षात ठेव हो !"

"जी !" डेव्हिडनं मान हलवली.

"आणि तुम्ही झोपण्यापूर्वी एक करा. दोन दिवसांचे पेपर वाचून ठेवा जरा." दुसरा हुकूम मला होता.

"नॉट टु डे मॅडम ! दुसंग आलीत थडगी आठवणींची अंतरात . . . ." एखाद्या नवकवींगाऱ्या खाकरुन मी सुरवात केली

मिरानं पर्स उघडली. एक नया पैसा अंगावर फेकला आणि डेव्हिडनं गाडी सुरु केली.

[९]

मिराची ओळख नाथ पालेकरामुळंच झाली होती.

'जनमता'त हा सहसंपादक होता. तर एक दिवस तो माझ्या गळ्यातच पडला, "अरे भांडारकर, माझ्याबरोबर तुला आज यायलाच हवं."

"कुठं ?"

"विचारलंस ? आता घात होणारच."

साडेसहाला केम्प कॉर्नरला कुठल्याशा इमारतीत आम्ही घुसलो. इतके दिवस बसनं जातायेता ती नुसतीच बघत होतो. मनाशी म्हणायचो, "धन्य हे लोक !



byp.



# सफरचंदाची कोशिंबीर

**[ खास गरीब जनतेसाठी ]**

[राजकीय दिवाळे वाजण्यापूर्वी]

**साहित्य :— दिल्लीच्या बाजूचे घट्ट दही (केंद्राकडून मिळेल तेवढे); लाल लाल काश्मीरची गोबरी सफरचंदे; सहकारी कारखान्यातील साखर ( परदेशी जाऊन मिळेल तेवढी ); काश्मीरी केशर किंवा त्याचाच मुंबईतला 'होयबा' कंपनीचा अर्क; गरीबांच्या दुःखावर चोळण्याचे मीठ.**

**कृती :— डझन–दोन डझन काश्मीरी सफरचंदे घेऊन, त्यांचे छोटेछोटे तुकडे करावे व ते साईच्या घट्ट दह्यात टाकावे. एखादा घाटावरचा मंत्री पाहून त्याच्या हस्ते सहकारी कारखान्यातील साखर त्यात पेरावी. वासासाठी केशर किंवा 'होयबा' कंपनीचा अर्क पाच–दहा थेंब सोडावा. वर सांगितलेले चिमुटभर मीठ टाकल्यास चव चांगली येते.**

**हरितक्रांतीच्या घोषणांच्या दिवसात, रेशनचे अन्न कमी पडल्यास, गरीब जनतेने सफरचंदाची कोशिम्बीर 'हू' म्हणून ओरपावी. कै. पंडित जवाहरलाल नेहरूंनी सुचविलेल्या 'ऑरेंजेस्'पेक्षा ही कोशिंबीर अधिक शक्ती निर्माण करणारी आहे. गोरगरीबांनी जरूर फायदा घ्यावा.**

ह्यांना अशा आलिशान बिल्डिंगमध्ये जागा मिळते."

पहिल्या मजल्यावर अखेरचा ब्लॉक. पालेकरनं दारावरची घंटी दाबली.

पंचविशीच्या तरुणीनं दार उघडलं. केसाचा बॉब, अंगात मिनीस्कर्ट. पायात मखमली सपाता. लिपस्टिकनं रंगलेले लालचुटूक ओठ हिनं मुरडले, "ओ यू डिअर——"

त्यांच्या ह्या भानगडी संपेस्तोवर मी आपला बाहेर व्हरांड्यातच उभा राहिलो.

पाच मिनिटांनी पालेकरला माझी आठवण झाली. तो बोलला, "साल्या, आत ये ना! आणि हे बघ लाजूबिजू नकोस. ही लोकं मला हसतील. ही वैजा राव. आर्टिस्ट आहे. हा तिचाच स्टुडिओ. हा माझा दोस्त भांडारकर."

आत पाऊल टाकलं की न सांगताही कळलं असतं 'हा चित्रकाराचा आर्ट स्टुडिओ'आहे. पूर्ण झालेली काही चित्रं भिंतीवर टांगली होती. एक दोन अर्धवट चित्रं बोर्डावर धूळ खात होती. बहुधा वजा रावच्या मूडची वाट बघत. बाजूच्या टेबलावर रंगाच्या ट्युबा, कुंचल, चिनी मातीच्या तऱ्हेतऱ्हेच्या भांड्यात काहीबाही वरचं साहित्य उघडं, अस्ताव्यस्त पडलं होतं.

वैजाचा मूड आज काही भलताच दिसत होता. स्टुडिओचं चक्क नाचघर झालं होतं. रेकॉर्ड प्लेअरवर संथ लयीत इंग्रजी रेकार्ड चालू होती. त्या तालावर आपुकमापुकांच्या तीन जोड्या तोंडाला तोंड नि कमरेला विळखा मारून नाचत होत्या.

हा प्रकार बघूनच माझी दांडी उडाली. नाराजीनं मी पालेकरकडे पाहिलं.

तर त्याच्या वैजानं खुलासा केला, "कळलं का भांडारकर, माझा वाढदिवस आहे आज. कितवा ते सांगत नाही. तुम्हीही विचारू नका. त्यासाठी थोडी गंमत करणार आहोत. अगदी सिलेक्टेड कंपनीच असणार."

मी हसलो. रुमालानं तोंड पुसलं.

ती स्वतःशीच पुटपुटली, "पण मिरा कशी आली नाही अजून?"

मला ऐकू गेलं. मी प्रथमच तोंड उघडलं, "कोण मिरा?"

"तिला कोणी पार्टनर हवाय म्हणून तर तुझी वर्णी लागली." पालेकरनं माझी शिफारस केली.

"मीच तर बोलले तुला." वैजाने सांगितलं.

"मग आता ह्यानं काय आमची तोंडं बघत बसायचं?" पालेकरला काळजी पडली.

"तू काळजी नको रे करूस! मिरा आल्याशिवाय रहाणार नाही." वैजानं आश्वासन दिलं. "भांडारकर काय घेणार? चहा, कॉफी . . . ."

पालेकर मोठ्यानं हसला, "म्हणजे हे काही बरोबर नाही हं वैजा! व्हिस्की नाही, निदान बीर तरी हवीच!"

इतक्यात दारावर बेल वाजली.

"धिस मस्ट बी मिरा——" असं पुटपुटत वैजा दाराकडे धावली.

खरोखरच ही मिरा होती. मिरा विजयकर. तंग सलवार. भडक रंगाचं कमीझ. तिचे तलम मुलायम केस भुरु-भुरु उडत होते. तसंच ओठावरसुद्धा हासू.

वैजा रावनं टाळ्या वाजवल्या. नाचणारी जोडपी थांबली. एकानं रेकार्ड बंद केली.

पालेकर म्हणाला, "लेट अस इन्ट्रोड्यूस अवरसेल्व्हज. मी नाथ पालेकर." टाळ्या.

एकएकजण आपापलं नाव घेत होता. मग टाळ्या पडत होत्या.

" मी रवीन्द्र भांडारकर." मी म्हटलं.

आणि अखेरीला मिरा बोलली, "मी मिरा——अाय मीन मिरा विजयकर."

नाथ पालेकरनं विचारलं, "मिस विजयकर, तात्यारावांना ओळखता तुम्ही?"

"वडील ते माझे" तिनं हसत सांगितलं. "तसं म्हणाल तर या भांडार-












करनाही ओळखते मी. प्रत्यक्ष नाही. तात्यांकडून. घरी खूप कौतुक करतात तात्या ह्यांचं."

का कोण जाणे पालेकरचा चेहरा साफ पडला. खरं म्हणाल तर मिरा आली आणि त्याचे डोळे चंचल झाले. वृत्ती वदलली. ती तात्यारावांची मुलगी आहे हे कळताच तो मुळी चेकाळलाच.

"तात्यांचं असंच. माणूस नवीन आला की सुरवातीला ही स्तुती करतील !" तो मिराला म्हणाला, "माझंसुद्धा ह्याच्या-पेक्षाही कौतुक करीत."

मिरानं ह्याला सरळ हाणला, "माझ्याकडे तरी तात्यांनी कधी तुमचं नाव घतलं नाही."

या उत्तरावर सगळेच हसले. वैजा ओरडली, "वरा पचका झाला !"

वजानं चाकराला ऑर्डर दिली.

दोघाचौघांनी भसाडया आवाजात वैजा रावला उद्देशून 'हॅपी वर्थ डे टु यू' म्हटलं.

आणि तमा 'खाना, पिना, मजा मारना'चा खास कार्यक्रम सुरू झाला. टेवलावर वर्फी, केक, वेफर, पॅटीस नि सामोसे यांचा ढीग पडला. कोला नि वीरच्या वाटल्या आल्या. कसल्या त्या अमली सिगरेटची पाकिटं पडली.

मग एकच धुडगूस चालू झाला. खाणं, पिणं, नाचणं नि गाणं. सगळं एकसाथ, वरोवरच. रेकॉर्ड प्लेअर सुरू झाला. जोडया ठरलेल्या होत्याच. इथं सगळेच वयात आलेले. सेन्सॉरचं कारण नव्हतं. सगळेच सारखे. तेव्हा लाज नि भिडेचा प्रश्न नव्हता. मनाचं काही वाटायला ती वृंद झाली होती, वेहोश होती.

मिरा नुसतीच सिगरेट ओढत उभी होती. तर वैजा रावनं तिला माझ्या अंगावर ढकलली. म्हटलं, "तो वघ तुझा पार्टनर, नवखा आहे. विश यू गुड नाइट !"

पालेकर ओरडला, "वैजा, व्हाय डोन्ट यू ट्राय हिम ?"

"व्हाट ?" कोल्याची वाटली उचलून ही नाथाच्या अंगावर धावली. "वीर चढली काय रे तुला ? म्हणून मिराकडे वघतोस ? थांब. तुझी चांगलीच उतरविते."

पालेकर जीव घेऊन आतल्या खोलीत धावला. वैजा त्याच्या मागं पळाली.

मागं कुंदनी ओरडली. "नाली. ही पहिली विकेट !"

जना हा निव्वळ होता. स्वैर. वेवंद जीवन म्हणजे काय ते आज मी प्रत्यक्ष वघत होतो.

माझ्या अंगावर वेकरचं पाकीट फेकून म्हणाली. "मिस्टर. उठा आता. तुमच्या मनाची तयारी होईपर्यंत दिवस उजाडेल!"

"म्हणजे रात्रभर चालणार हे ?" मी आश्चर्यानं विचारलं.

"मग ? तुम्हाला काय वाटलं ?"

"आश्चर्य." सिगरेट शिलगावीत मी म्हटलं.

"अहो, पनामा काय ओढता ? ही चरसाची सिगरेट घ्या ! मग कशाचंच



आश्चर्य वाटणार नाही." मिरानं हसून सांगितलं.

"आश्चर्य म्हणजे तुम्ही इकडे कशा ?"

"का ? मी माणूस नाही ? मलाही ह्यांच्यासारखीच मजा मारावाशी वाटते. वाटतं बेफाम, बेभान होऊन मरून जावं. या अळणी, मिळमिळीत आयुष्याचा कंटाळाच येऊ लागलाय आता."

मी विचारलं, "तात्यारावांना कळलं तर ?"

"त्यांना आहे ठाऊक ! माझा नाद कधीच सोडलाय त्यांनी."

मी गप्पच झालो. मुकाटयानं सिगरेट ओढू लागलो. उद्विग्नपणे हवेत धूर सोडत बसलो.

मिरानं सांगितलं, "मला उपदेश करण्याच्या भानगडीत पडू नका."

"माझा तो अधिकार नाही. असता तर जरूर पडलो असतो. "मी चिडून उत्तर दिलं, "इतकंच नाही. हातही टाकला असता."

"मिस्टर, कुठल्या युगात आहात ?"

"ह्याच. तुमच्या."

आणि मी उठलो. तिला सांगितले, "पालेकरला सांगा, मी गेलो."

"मी सांगू ? कंपनी मलाच हसेल पार्टनरला जाऊ दिलं म्हणून."

"मग बसून तरी काय करू ? सगळं हे बघूनच डोकं जाम चढलंय माझं."

तिनं चेष्टा केली, "आणि तुमचं बोलणं ऐकून माझं चढू लागलंय म्हणून म्हणते, उठाच आता."

"नो, नो—सॉरी ! "

"भांडारकर, मी म्हणतेय आपण दोघंही घरी जाऊया. आपापल्या." आणि मिरा मोठमोठ्याने हसत सुटली.

अशी ओळख झाली.

कारण नव्हतं आणि तरं ही ती वाढत गेली. मिरानंच वाढवली.

म्हणजे त्या रात्री घरी आलो नि कॉटवर पडलो. सकाळी उठतो तर सपाटून ताप. तीनचार दिवस उतरेनाच.

पालेकरनं कचरीत उठवलं, "साल्याला बीर बाधली. फुकटाची म्हणून पी पी प्याला. तासाभरात बिल्कुल आऊट हा भांडारकर. बरोबरची पोरगी ह्याच्या नावानं बोंबलत होती, साला हा बावळट म्हणून."

माझ्या खोलीचा पत्ता मिरानं बरोबर काढला. तात्यारावांच्या ड्रायव्हरकडून.

दार ठोठावल्याचा आवाज झाला. कॉटवरूनच मी म्हटलं, "दार उघडंच आहे."

तर मिरा आत शिरली. माझ्या कपाळाला तिनं हात लावला. हसत म्हटलं, "हट् ! तापच नाही !"

मी बोललो, "आजच उतरला. तुम्हाला घाबरला."

"मला आपली वेगळीच भीती."

"कसली ?"

"तुमचा हा ताप प्रेमाचा तर नव्हे." मिरा चेष्टा करू लागली.

"नाही दिसत." मीही हसलो.

"गॅरन्टी काय ? पहिल्या प्रेमात असंच होतं. वाटतं फ्ल्यू. असतं चक्क लव्ह."

"खूप माहिती दिसते."

तिनं सांगितलं, "म्हणजे काय ? आहेच. बराच अनुभव घेतलाय मिस्टर, या प्रेमाचा. गेल्या पाच वर्षांत मिनिमम शंभर वेळा."

"चहा करून देऊ ?" मी विषय बदलला.

"फुटवण्याचा बेत दिसतोय." तिनं म्हटलं. "पण आधीच सांगते. इतक्या लवकर मी जाणार नाही. तुम्हाला नेस्कॅफे पाजणार. बरोबर क्रीम क्रॅकर—"

"माझ्या खोलीत यापैकी काही नाही."

"माझ्या पर्समध्ये आहे."

आणि बोलल्याप्रमाणं तिनं केलं. मला गरम गरम कॉफी पाजली. क्रीम क्रॅकरची बिस्किटं खाऊ घातली.

मग म्हटलं, "आता निघते मी—"

"काय घाई आहे ?"

"घाई नाही. भीती वाटते तुमची."

"माझी ?"

"माझ्या प्रेमात पडलाबिडलात तर?"

तिनं विचारलं.

"पडलो तर उठेन. तुमच्यासारखाच."

"तापातून उठा आधी. मग मी आहे नि तुम्ही." आणि पर्स उचलून भुर्कन ती खोलीतून बाहेर पडली.

सोमवारी मला आठवड्याची रजा असायची. मिरा तीनलाच खोलीवर हजर व्हायची. मग आम्ही कधी सिनेमा, कधी नाटक बघायचो. कधी टॅक्सीनं नाहीतर बसनं नुसतेच भटकायचो. रात्रीचं जेवण एखाद्या बड्या हॉटेलात व्हायचं.

मला कळत होतं, मी वहात चाललोय. पाण्यासारखा. फक्त उलटा. सखल भागातून वर उंचीकडे.

नाथ पालेकरनं कुठंतरी आम्हाला पाहिलं वाटतं. दुसऱ्या दिवशी आंबट तोंडानं हा बोलला, "तात्यारावांना कळलं तर धडगत नाही तुझी. ह्या मोठ्या लोकांचं असंच असतं."

मी नुसता हसत राहिलो.

तो चिडला, "भडव्या हसतोस काय ? तुला वाटतं, हा तात्या तुला घरजांवई करणार आहे ? त्या भ्रमात राहू नकोस. म्हातारा कमरेवर एक लाथ घालील आणि हाकलून देईल. माणसानं आपली लायकी ओळखावी."

मी विचारलं, "तू काय करतोस रे ?"

"मी गुंतत नाही बाबा. चार दिवस मजा करतो, सोडून देतो. सांगतो काय एकजात सगळ्या ह्या रांडा. फक्त पैसा मोजावा लागत नाही आपल्याला."

"उलट तो सुद्धा त्याच मोजतात." मी म्हटलं, "मग रांडा त्या का आपण पालेकर ?"

"शहाण्यानं तुझ्याशी बोलू नये." तो उसळला.

"मग यापुढं तरी शहाणा हो. बोलूच नकोस."

माझ्या मनाला मात्र नसती हुरहूर लागून राहिली. म्हणजे तात्यारावांना मनस्ताप होणार असला तर —

रहावेना. तसं मिराला मी म्हटलं, "हे काही बरं नव्हे!"









"काय ?" तिनं डोळे वटारले.

"तुमच्याबरोबर सारखं फिरणं. लोक मलतंच विचारतात."

"मलासुद्धा विचारतात. मी सांगते मला दिवस गेले नं की तुमच्याकडच येईन बाळंतपणाला. काळजी करू नका." मिरानं सांगितलं.

"काहीतरीच तुमचं."

"माझं नाही. आमच्या लोकांचं. ह्यांना तुम्ही ओळखत नाही भांडारकर. अतिशय गलिच्छ नि ओंगळ जात आहे. स्वतः गटारात लोळतील. वास घ्यायला धावतील दुसऱ्याच्या तोंडाचा. आमचे तात्या तर ह्यांना उभे जाळतात. झापडपट्टी ही म्हणतात. सांगतात हिच्यापेक्षा झोपडपट्टी खूप बरी."

"झापडपट्टी शब्द छान आहे नाही. तात्याराव खरोखर जिनीयसच आहेत."

"म्हणून तर झापडपट्टीची ही प्रतिष्ठित मंडळी त्यांना सिनिक म्हणते—— म्हणजे वेडपट." मिरानं सांगितलं.

मग त्या दिवशी तिची काय लहर फिरली देव जाणे ! लाडंलाडं ही मला म्हणाली, "आपल्याला जायचंय भय्याच्या लाला महाराजाकडे."

"ही काय दुर्बुद्धी आठवली ?" मी हसून विचारलं.

"का हो ? तुमचा विश्वास नाही?"

"विश्वास ? बुवा, महाराज आणि कंपनीवर ? तितका नालायक नाही मी. तुमचे तात्यारावच म्हणतात ज्याचा स्वतःवर विश्वास नाही तोच या भाकड नादाला लागतो."

"मग माझा माझ्यावर विश्वास नाहीच." तिनं सांगितलं, "तुम्हीच घालवलाय."

"व्हाट डु यू मीन!"

"खरंच!" मिरा हसली. लाजून तिनं खाली मान घातली. डाव्या हातानं पदराशी चाळा करीत म्हटलं, "चला नं ! प्लीज. माझ्यासाठी."

काय विशाद हिला मी नाही म्हणतो. टॅक्सीने पेडर राडला आम्ही उतरलो. तिच्याकडे पत्ता होताच. एका भव्य इमारतीच्या चौथ्या मजल्यावर लिफ्टनं गेलो. दारातच ताज्या टवटवीत चेहऱ्याच्या एका संगमरवरी पोरीनं आमचं स्वागत केलं. हिनं कळ दाबली. समोरचा अजस्त्र दरवाजा उघडला गेला. वरून आकाशवाणी व्हावी तसा आवाज घुमला, "धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगेयुगे !"

किती प्रशस्त सभागृह. पण गर्दीही तशीच तुफान होती. सगळी लोकं बडी होती——त्यातल्या त्यात फालतू मीच असेन.

पार दुसऱ्या टोकाला देव्हाऱ्यासारखं मखर होतं. सोन्याचं किंवा त्याच रंगाचं. मखरात एक ध्यानस्थ बुवा. कमरेला व्याघ्रांबर होतं. बाकी ह्याचा अगडबंब देह उघडाच होता. चेहरा तेजस्वी, अंगकान्ती गोर. प्रकाशाची योजनाच अशी होती की त्याच्या तोंडाभोवती तेजोवलय असल्याचा भास व्हावा.

मिराच्या भय्याचे लाला महाराज ते हेच. त्याची लाळ भक्तांना प्रसाद वाटे. हा सविकल्प किंवा निर्विकल्प समाधीत मग्न होता. म्हणूनही असेल फक्त तो एकटाच प्रकाशात चकाकत होता. बाकी समस्त भक्तजन अंधुक उजेडात रुद्राक्षांची माळ ओढत किंवा बोटं मोडत जप करीत होते——

'महाकालि नमस्तुभ्यम्, महाकालि नमोस्तुते . . . .

तोंडाला येतील त्या अर्वाच्य शिव्या उच्चारीत महाराज झिंगल्यासारखा हातवारे करू लागला.

गर्दीनं एकच कल्ला केला. "महाराज समाधीतून उठले."

मग दर्शनासाठी एकच गर्दी उसळली.

शिष्यमंडळी लोकांना रांगेत उभे रहाण्याच्या सूचना देऊ लागले. चांगल्या दहापंधरा लांबलचक रांगा लागल्या. आमचा कुठंही नंबर लागण्याचा संभव दिसत नव्हता.

तशी मिरा माझ्या हाताला धरून












# सणासुदीला

## कसे ?






## नेल्को रेडिओ किंवा ट्रांझिस्टर खरेदी करून

ULKA-NE-18 MAR










१ **तारा** – मिडियम वेव्ह सेट रु. ११५/–*
२ **तृप्ति** – २ बँडचा ट्रांझिस्टर रु. १७५/–*
३ **सिलिकॉन–३२१** – २ बँडचा डिलक्स ट्रांझिस्टर रु. २३५/–*
४ **तरंग** – ३ बँडचा पोर्टेबल सेट रु. २९८/–*
५ **तरुण** – ३ बँडचा एसी/मेन्स सेट रु. ३१५/–*
६ **तराना** – ४ बँडचा एसी/मेन्स सेट रु. ४१५/–*

* अबकारी करासहित, स्थानिक कर वेगळे







टाटा इलेक्ट्रिक कंपनीच्या आर अँड डी लॅबोरेटरीज यानी डिझाईन केलेले

**नेशनल रेडिओ अँड इलेक्ट्रॉनिक्स कंपनी लिमिटेड.**
मुंबई • कलकत्ता • दिल्ली • मद्रास






सुकुमार महेंद्राचे प्रहरण जीला महाकवी म्हणती
अपमानिता सती ती चंडि बने दुष्ट ध्वंसिण्यासाठी

भट्टनारायणकृत

**वेणीसंहार**

दीपावली
'७०

अनुक्रमणिका





अनुक्रमणिका






पुढं घुसली. महाराजांच्या प्रमुख शिष्याला ती बोलली, "मी चेतन विजयकरची वहीण. महाराजांच्या दर्शनाला आलेय."

वशिला एकदम ताठ होता.

खुद्द लाला महाराजांचेच डोळे उघडले. जड नजरेनं त्यांनी मिराकडे टक लावली. घोगऱ्या आवाजात म्हटलं, "आव बेटा. हम तो तुम्हारीहो राह देखता हूं."

मिरा पुढं झाली.

"बैठो."

मिरा महाराजांच्या पायाशी बसली.

"उघर नही! इघर!" लाला महाराजांनी तिला आपल्या मांडीवर वसण्यास सांगितलं.

इतकी धीट पोर. पण संकोचली, कावरीबावरी झाली. हिनं माझ्याकडे नजर टाकली. मी हसत होतो.

आजुबाजूच्या थोरामोठयांच्या वायका सांगू लागल्या, "तुमचं नशीव मोठं हो! म्हणून महाराजांची कृपा झाली."

महाराजांचा प्रमुख शिष्य बोलला, "अहो, हे ब्रम्हस्वरूप आहे. स्त्रीपुरुष भेद त्यांच्यापाशी नाही. तुमची ते परीक्षा घेतायत."

पण मिराचं मन तयार होईना.

लाला महाराजांना आता अधिक धीर निघेना. त्यांनी मिराच्या कमरेला मिठी मारली. तिला सरळ आपल्या उघडया मांडीवर ओढली. आणि ते खदाखदा हसू लागले.

वायकांच्या जातीला तो अत्याचार होता. मिराची मूळ प्रकृति जागी झाली. ती सात्विक संतापानं उसळली. लाला महाराजांना तिनं त्वेषानं दूर लोटलं. तो ओरडली, "छी:! हलकट मेला--"

महाराज हसतच होता. टाळया वाजवीत होता. बडबडत होता. "सच्चिदानंद, सच्चीदानंद! वेटी तुझं कल्याण होईल! तुझी कामना पूर्ण होईल!"

मिरा जिन्यातच कोसळली. कठडयाला टेकून रडू लागली.

मी हसलो, "अहो रडता कशाला? महाराजानं तर चांगला आशीर्वाद दिला."

"नाही हो भांडारकर. तो वोलतो त्याच्या अगदी उलट होतं. मय्या सांगतो. माझं वाटोळं होणार! माझी इच्छा कधी, कधीच पूर्ण होणार नाही." हुंदके देत ती बोलली.

"आपण तर बुवा खूप झालो तुमच्यावर!"

"आता काय उपयोग?" तिनं विचारलं.

"म्हणजे?"

"मला काही विचारू नका! मी काही सांगणार नाही."

"नाही, सांगायलाच हवं तुम्हाला!" मी आग्रह धरला.

"नाही सांगणार. काय करणार आहात?" मिरा एकदम भडकली.

"पण का नाही सांगणार?"

"माझी मर्जी!"

"मिरा--" मी तिचा हात धरला.

"मिस विजयकर म्हणा. लग्नाची वायको नाही मी तुमची." तिनं तीव्र स्वरात म्हटलं, "आणि कृपा करून माझा हात सोडा."

हे सांगायची खरं म्हणजे जरूरी नव्हती. मिराच्या पहिल्या वाक्याला मी तिचा हात सोडला होता.

चटचट चप्पल वाजवीत ती जिना उतरून गेली. माझ्याकडे पाहिलंही नाही. जसा मी तिच्या ओळखीचासुद्धा नव्हतो.

लाला महाराजाचा राग मिरानं माझ्यावर का काढावा मला तरी कळत नव्हतं. त्या अर्धवटाचं वागणं इतकं मनाला लावून घ्यायचं, खरं म्हणजे, हिला काही कारण नव्हतं.

पण वडया घरच्या वडया पोरी या! त्यांच्या लहरी कधी नि कशा फिरतील नेम नाही.

एक मात्र खरं!

त्या दिवसापासून मिरानं माझा नाद टाकला.

दोन आठवडे मी वाट पाहिली. मग एकदिवस हिला घरी फोन केला.

तिनंच उचलला. वोलली, "मी मिरा--!"

मी म्हटलं, "मी भांडारकर, मिरा--"

तर खाडकन तिनं फोनच खाली आदळला.

मलाही राग आला. च्यायला! इतकी मिजास? समजते कोण ही आपल्याला? गेली उडत! असेल मोठी! पण आपल्या घरी! हिच्या बापाच्या वर्तमानपत्रात नोकरी करतो म्हणून हिचाही नोकर वाटतो की काय हिला मी? हू:! नाहीतरी मी थोडाच मागं लागलो होतो? तीच लागली होती माझ्यामागं. का--पण का? वेळ जात नव्हता एकटयानं म्हणून. पैसा आहे. प्रतिष्ठा आहे. विचारणारं कोणी नाही. रिकामटेकडा वेळ असा घालवायचा. कोणाला तरी नादी लावायचं. चार दिवस भटकायचं त्याच्यावरोवर. शिळा वाटू लागला की कटवायचा. चाळा, एक खेळ! घरात कुत्रं, नाहीतर मांजर. वाहेर आम्ही तरुण पोरं--

पण मिरानं मला ओळखलं नव्हतं हेच खरं. नाही, प्रेमभंगानं मी आत्महत्त्या केल्याची वातमी कधीच येणार नव्हती. उगाच ती वाट वघत असेल--तर तिची चांगलीच जीरणार होती. त्यासाठीच जर पेपर वाचत असेल तर ते वाचण्याचं कारण नव्हतं. हिला अनुभव नाही. दु:खाचीही नशा काही विलक्षण असते. तुम्ही वीरच प्यावी आणि झिंगावं किंवा चरसाची सिगरेट ओढावी आणि धुंद व्हावं. पण--पण माझा हा दु:खाचा प्याला --हाऊ स्वीट! वंडरफुल! तो भरभरून पिऊ दे मला. आणि त्या जालीम नशेत तर्र राहू दे, वेहोश राहू दे! फरगेट ईट मिरा! . . . .

फोर्टमध्ये 'कॉफी हाऊस' ला अय्यरवरोवर कॉफी पीत वसलो होतो. साडेपाचपर्यंत त्याला मिटींग नव्हती. मलाही 'मुंबईच्या वारी' ला काहीतरी विषय हवा

होता. म्हणजे दोघांनाही भरपूर मोकळा वेळ होता.

बोलता बोलता अय्यर एकदम उठला. माझ्या हाताला धरून बोलला, "कम, लेट अस गो."

"कहाँ भाई ?"

"पिक्चरको यार ! ऐसा पिक्चर कभी नही भुलेगा."

एका बड्या हॉटेलच्या मागल्या दारानं आम्ही घुसलो. इथं काळोखाच्या खोलीत चोरून लेकाचे अश्लील सिनेमा दाखवीत होते. तिकिटं कमी नव्हती. प्रत्येकी चांगले पाच रुपये.

पडदा बाजूला झाला. कोणीतरी आम्हाला आत घेतलं. काळोख होता. दोन रिकाम्या खुर्चीवर बॅटरीचा झोत पडला. आम्ही बसलो.

समोर पडद्यावर सिनेमा चालूच होता. आम्हाला उशीरच झाला होता.

**चाकाचा मॉन्टाज**

मग अद्ययावत फॅशनच्या घरातील बेड-रूमचं दृश्य. मोठा पलंग, जाड गाद्या. नग्नावस्थेतील बायकांची चित्रं. (प्रथम या चित्रांचे क्लोज अप) हीभिंतीवर लटकलेली.

नायिका प्रवेश करते. छातीला टर्किश टॉवेल, खाली परकर. केस अस्ताव्यस्त. छातीचा टॉवेल ती पलंगावर फेकते. आता फक्त ब्रेसियर. मग ती कपाट उघडते. ब्लाऊज नि पातळं उपसत रहाते. हिच्या अंगांगाच्या मादक हालचाली. (क्लोज अप नि लाँग, शॉट)

**खोलीचं दार उघडतं**

कपाटाच्या दारात उघड्या दाराचं प्रति-बिंब. नायिका दोन्ही हात तोंडावर घेते. (क्लोज अप)

ती ओरडते, "कोण आहे ?"

"कोण ? कुठं ? मी सद्दू, बाई," उत्तर.

ती म्हणते, "मी पातळ बदलतेय. दिसत नाही ?"

मग ती हसते. बजावते, "आधी दार बंद कर."

**दार बंद होतं.**

मॉन्टाज. बंद रस्त्याची अर्धवट पाटी-दार बंद. आतून दाराशी गडी उभा. कमरेला लांडी चड्डी अंगात फिट गंजीफ्रॉक.

त्याच्या शरीराचा क्लोज अप. बुटकी, पण घट्ट शिसवी मूर्ती. निगरगट्ट चेहरा. तोंडाला लाळ. डोळे तिच्या अर्धवट उघड्या छातीवर.

नायिका विचारते, "दार बंद केलंस ?"

गडी बोलतो, "तर हो ! रोजच काय सांगाया होवं ? "

**पुन्हा मॉन्टाज**

'काम चालू, रस्ता बंद' संपूर्ण पाटी. सबंध पडद्यावर मोटरच्या चाकासारखी गरगरू लागते.

ही गंमत आणखी पुढं पहाणं मला शक्य नव्हतं. मी अय्यरच्या खुर्चीकडे पाहिलं. बेटा रंगला होता. मी उठलो. बाहेर पडलो.

तर माझ्यापुढं ही—मिरा. शंकाच नको.

"तुम्ही ?" तिच्याशी आपणहून न बोलण्याचा माझा निश्चय मी विसरलो.

"होय. आश्चर्य वाटलं ?"

"नाही. तुमच्या कोणत्याच गोष्टीचं आश्चर्य वाटेनासे झालंय."

तिनं म्हटलं, "गुड बॉय ! आता इतकंच करा—"

"मला सांगता ?" मी तिच्याच स्वरात विचारलं.

"तुम्हालाच सांगायला हवं. माझा पाठलाग करायचा सोडून द्या आता."

"कोण करतोय तुमचा पाठलाग ?"

"तुम्हीच की ! एरव्ही अशा चावट सिनेमाला येणार नाही तुम्ही." मिरानं सांगितलं.

आता मात्र मी भडकलो. म्हणजे हे मलतंच होतं. सहन न होणारं. "तुम्हाला लागलंय वेड !"

"नाही. लागलं होतं ते गेलं."

"मग शुद्धीवर आल्यासारखे वागा जरा." मी खवचटपणं बोललो.

"तशीच वागतेय. पण माणसाबरोबर. तुमच्याशी नाही."

"मिरा—" मी ओरडलो.



अनुक्रमणिका

"ओरडू नका. लोकं जमतील. सगळी मलाच अधिक ओळखतात हो."

"मला पर्वा नाही."

"मला आहे. तुम्हाला मी टाकलं. आता तुमच्या त्या पालेकरला जवळ केलाय असं आमच्या कंपनीत जाहीर केलंय मी."

आणि हसतच दारावरचा पडदा माझ्या अंगावर मारून सिनेमा बघायला मिरा खोलीत शिरली.

इतका प्रचंड पराक्रम नाथ पालेकरच्या थोडाच पोटात रहाणार होता. तोंडाला कर्णा लावून हा बोंबलत नव्हता हे नशीब ! म्हणजे माझंच !

संपादकीय खात्यात सगळ्यांच्या समोर ह्यानं मला मोठ्यानं विचारलं, "काय रे भडव्या मिरानं टाकली ना टांग?"

"तुला अधिक माहीत." मी म्हटलं.

"आहेच. एव्हरी थिंग इज फेअर इन वॉर ॲन्ड लव्ह ! साला माझ्यापुढं हुशारी करीत होता. अरे भांडारकर, तू पाहिल्या नसतील इतक्या पोरी मी उडवल्या आहेत." पालेकरचं तोंड हे असं वाजू लागलं.

खूपच झालं तसा ह्याला मी बोललो, "पालेकर, ही 'जनमता'ची कचेरी आहे. तुझं घर नाही. तुला नसली तरी बाकीच्यांना कामं आहेत. मला तक्रार करावी लागेल."

"तू तक्रारीच करणार आणि चुगल्या." तो म्हणाला, "तात्याराव हलक्या कानाचे. म्हणून फावलंय तुझं."

"आता गप्प बसतोस का थोबाडीत देऊ? हलकट साला--" मी ओरडलो.

वृत्तसंपादक जोशी आता जागा झाला. त्यानंच पालेकरला आवरलं.

त्या दिवसापासून आमच्या संपादकीय खात्यात नाथ पालेकर एकदम हिरो झाला. कारण दुसरं काही नाही. त्यानं माझी खाशी जिरवली होती. ह्यांच्या मालकाच्या पोरटीनं मला टाकून त्याला पत्करलं होतं. तात्यारावांचं माझ्याबद्दल वरं मत होतं आणि म्हणून एकजात हे सगळे माझा द्वेष करीत.

तात्याराव तोंडावर सांगत ह्यांना, "थर्ड क्लास माणसं लेको तुम्ही ! कुठं जॉब मिळेना म्हणून या धंद्यात आला आणि अजूनही कुठं तो मिळत नाही म्हणून राहिला आहात. तुम्ही कसले पत्रकार भडव्यांनो? कारकून तुम्ही, खर्डेघाश्ये . . ."

गंमत म्हणजे खालच्या मानेनं निमूट हे सगळं ऐकून घेत. उलट जाब करण्याची एकाचीही कधी हिंमत झाली नाही.

पण संध्याकाळी तात्याराव बाहेर पडले की मागं एकएक शेर व्हायचा.

आपल्या प्रेमप्रकरणाची ताजी खबर पालेकर रोज द्यायचा. दोघं आम्ही 'हेरिटेज'ला गेलो, जुहूला स्विमींग केलं, मढ आयलंडला पिकनिकला गेलो--" एक नि अनेक. मग त्याच्या सविस्तर कॉमेन्टस् होत . . . . 'पोरगी नुसता खवा आहे रे जोश्या'. 'बच्यापैकी फॉर्वर्ड. मी एक पाऊल टाकलं तर मिरा चार टाकते.' 'मस्त मजा येऊन राहिलीय यार ! लेकाचा तो उमर खय्याम अनलकी. साल्याला आमची ही मिरा भेटती तर म्हणाला असता-- 'दारू नको. कविता नको. ही एकटीच सगळं आहे.....'

मला कळत होतं मला चिडवण्यासाठीं, डिवचण्यासाठी यांचं हे सगळे चाललंय. पण तरीही मनस्ताप व्हायचा. कारण नव्हतं. आणि तरीही एकएक हे ऐकून वाटायचं . . . वाटायचं ! बुलबुलासारखा कटचारावर काळीज चिरून आणि कोरून घेतोय मी . . . विनाकारण ! कळत होतं पण वळत नव्हतं.

अशात नाथ पालेकरला सचिवालयात प्रसिद्धि अधिकाऱ्याची जागा मिळाली. आणि तो गेला त्याच्यामागं हे 'मिरानाथ' प्रकरण आपोआपच निकालात आलं. मी नशिबाला लाख धन्यवाद दिले . . .

तात्यारावांना त्या दिवशी काय स्फूर्ती आली कुणास ठाऊक !

गळ्याचा मफलर घट्ट गुंडाळत ते बाहेर माझ्या टेबलाशी आले. जाड भिंगाच्या चष्म्यातून आपली अधू दृष्टी माझ्यावर रोखून त्यांनी विचारलं, "भांडारकर, कॅबरे म्हणजे काय रे?"

"डान्सचा एक प्रकार आहे." मी उत्तर दिलं.

वृत्तसंपादक जोशी मोठ्यानं हसला. कारण त्याला अधिक माहिती होती.आपल्या टक्कलावरून हात फिरवीत त्यानं सांगितलं, "साहेब, नाचाचा हा विलक्षण प्रकार आहे. ऑब्सीन, उत्तान, कामचेष्टांनी भरलेला. सरळ नंगानाच म्हणाना !" . . . . .





अनुक्रमणिका

तात्यारावांनी त्याला मध्येच अडवलं, "जोशी, बोललास छान. पण मला काही कळलं नाही."

"पाहिल्याशिवाय काय कळणार?" जोशी हसून म्हणाला, "बड्या लोकांना परवडणारी कामं ही. वीस ते तीस रुपय पडतात साहेब. गरिबाकरिता नाहीच कॅबरे. त्यांनी तमाशे बघावे."

"असं म्हणतोस. मग आजच जा. बघून ये. मी देतो पैसे. भांडारकला पण घेऊन जा. तुझ्या 'मुंबईच्या वारी'त या गोष्टी यायला हव्यात बेटा. अरे, ही बडी लोकं कायकाय चैनी करतात हे तू नाही सांगणार तर गरिबांना कळणार कसं? आं! कळू दे त्यांना. बाकी काही नाही. निदान ह्यांच्या पोरी कॅबरे शिकून पैसा करतील." तात्याराव मोठ्यानं हसत आपल्या केबीन-मध्ये गेले.

जोशी खूष. फोन करून पालेकरचा त्यानं सल्ला घेतला. जुहूला कुठल्याशा हॉटेलचा पत्ता घेतला. वेळ विचारली. मग त्यानं हसत मला म्हटलं, "साल्या, आज झोप मात्र छान लागेल हा कॅबरे पाहिल्यावर."

"जोश्या, झोपेची तक्रार नाही माझी. तूच गोळ्या घेतोस." मी बोललो.

जुहूवरल्या या पॉश हॉटेलात कॅबरे टाईमाला गर्दी नसती तरच आश्चर्य होतं. एकही टेबल खाली नव्हतं की खुर्ची रिकामी नव्हती.

मुंबईच्या कुठल्याही हॉटेलात असतो तसाच एकंदर गलका होता. फक्त बडबड वेगळ्या ढंगाची, उंची थाटाची.

आणि माझं लक्ष गेलं. खरं म्हणजे आधीच जायला हवं होतं. आमच्यापासून चार हातावर ती उभी होती. नाथ पालेकर नि मिरा विजयकर. समोरचं टेबल मोकळं होतं. कदाचित त्यानंतर बुक केलं असावं आणि कंपनीची ते वाट पहात होते.

तितक्यात पालेकरनंच आम्हांला पाहिलं आणि हा कोकलला, "जोश्या किती उशीर रे. आणि दुसरं कोणी मिळालंच नाही या भांडारकराशिवाय."

मिराला मी मुद्दामच हात जोडले. सांगितलं, "पाठलाग नाही हो केला.

तीसुद्धा कमी नव्हती. उलट बोलली, "कराना! मी एकटी नाहीच."

इतक्यात समोरच्या स्टेजवरचे दिवे उडाले. हॉलमध्येही अंधार झाला. फक्त पायाशी लाल कारपेटवर डिम लाइट उरला.

'इटस् कॅबरे टाईम' कोणीतरी पुकारलं.

मिनिटभर! असा नुसताच काळोख.

मग आर्त, आक्रंदनाचं मंद पार्श्वसंगीत सुरू झालं--

हळु हळू स्टेज निरनिराळ्या रंगात किनारू लागते. वाद्यवृंदाचा नादनिनाद चढू लागतो. संगीताची लय ताल घेऊ लागते. वाढता उजेड स्टेजला रूप आणि आकार देऊ लागतो.

झिंग झेंग ऽऽ--झांजा पिळवटून आदळतात.

डांग ऽऽ डिंग — ड्रमवर दणकट थाप पडते.

आणि बरोबरच आकान्ताची कानठळ्या उठवणारी किंकाळी उठते.

आता लख्ख प्रकाशात स्टेजवर एक उताणी पडलेली बाई दिसते. एकटी, एकाकी. एकलेपणाच्या आगीनं पेटून ती ओरडत उठलीय. अंगावर हरणाचं चामडं. जेम-तेम छाती नि कमर झाकेल इतकं. ती

उठते. अंगाला आळोखेपिळोखे देत. उधाण अवयवांच्या उत्तान हालचालींनी भावनांचे मोहळ उठविते. संथ लयीत रुमझुम पदन्यास करीत इथं नि तिथं मिरमिर डोळ्यांनी वेध घेत राहाते. मग पुन्हा हिची दीर्घ, आर्जवाची किंकाळी. झांजांचा खणखणाट, ढोलकाचा दणदणाट.

त्या आवाजानं आरपार जखमी झालेल्या विद्ध डोळ्यांच्या क्रुद्ध पुरुषाचं आता आगमन. त्याच्या फक्त कमरेलाच हरणाचं चामडं. लोंबतं. आवेगानं थरथरत तो तिच्याकडे जातो. जबरीनं हिला जवळ ओढतो. कवेत गुंडाळतो. ती अल्लद मिठीतून निसटते. भिंगरीच्या पावलांनी थयथय नाचत, गिरक्या घेत ह्याच्या अंगाभोवती भिरभिरत रहाते. तो चाळवतो, चेकाळतो, चवताळतो. तिला कवज्यात घेण्यासाठी हिंस्र जनावरासारखा वसवसून उसळतो. हिला हाताला धरू बघतो. केस ओढतो. पायात तंगडी गुंतवून पाडतो. कमरेला मिठी मारतो. अगदी हाती येऊन वाऱ्याची झुळूक कशी ह्याच्या हातची निघून जाते.

संथ लयीतून झडणारी सलामी झांजा, ढोलक आणि क्लॅरोनेटच्या चढत्या तालाबरोबर आता गती घेऊ लागते. आणि मग ही बाई बाई रहात नाही. तो पुरुष पुरुष रहात नाही. निसर्गाचे दोन घटक–घन आणि ऋण परस्पराना मोडू अन् तोडू बघतात. जिवांचा देण्याघेण्याचा जीवघेणा खेळ सुरू होतो. विचार संपून विकार उठतात. भावनांतून वासना पेटतात. एकच आकान्त चालू होतो. दोन शरीरांचा–मिळण्यासाठी, मिळवण्यासाठी; दोन मनांचा–हरवण्यासाठी, हरण्यासाठी. मग नुसता हलकल्लोळ, जल्लोष !

स्टेजवर पुरुष नि प्रकृती अशा दोघांचा. मागं वाद्यवृंदाचा. कशालाच मेळ उरत नाही. कशालाच ताल रहात नाही. आणि तरीही वाटतंय ताल तुटत नाही, मेळ सुटत नाही. सगळं कसं वावटळीसारखं घडतंय. सोसाट्यानं, बेबंद. लागू आहेत नियम फक्त निसर्गाचे. जे अटळ, अलिखित.

लखकन् वीज चमकते स्टेजवर. ढगांचा गडगडाट होतो. निसर्गाचे ऋण नि घन घटक ऐकमेकांना बिलगतात, जडतात, जखडतात. कायमचे.

आणि दिवे जातात. संगीत थांबतं.

मिनिटभर काळोख....

दहा मिनिटांच्या या कार्यक्रमानं माणसातला पशू उठला नसता तरच आश्चर्य ! प्रश्न तो नव्हता. प्रश्न हा की एकदा उठलेला हा पशू तात्काळ थंड होण्यासारखा आहे काय ? कोण जाणे ! आणि तसा तो शांत झालाच नाही तर... ?

हॉटेलमध्ये लख्ख प्रकाश झाला.

खरं म्हणजे त्यांच्याकडे मी बघायलाच नको होतं. कळावयास हवं होतं इतकं मला. पण मला न कळूनच मी ह्या दोघांकडे पाहिलं. कदाचित् कुठंतरी शंका असावी मला. आणि म्हणून खात्री करून घेण्यासाठी मी पाहिलं असावं. आणि खात्री झाली. नाहीतरी कॅबरे बघायला येणारी जोडपी एकमेकांपासून चार हातावर रहाण्यासाठी येणारच नाहीत. उलट अधिक जवळ नि जवळ येण्यासाठीच आलेली असतात ही इथं. समोर हा उद्दीपक नाच, सगळीकडे अंधुक काळोख–पालेकरचं नि मिराचं इतका वेळ काय चाललं होतं ते सहज कळण्यासारखं होतं. त्याचा हात अजून तिच्या कमरेभोवती होता. आणि तिची मान त्याच्या खांद्यावर होती. आणि हॉलमध्यं स्वच्छ प्रकाश झाला असला तरी अजून ती धुंदच होती, बेभान होती....

मी तिऱ्हाईतासारखी मान फिरवली.

मला काही वाटण्याचं कारण नव्हतं. आतल्या कुईकुई करणाऱ्या कुत्र्याला मी गप्प केलं, "हड् साल्या ! तू हाडकंच चधळ."

आणि एकाएकी टाळकं फिरलं की काय मलाच कळेना. पालेकरच्या अंगावर मी ओरडलो, "अरे भडव्या, पुरे आता. कळलं सगळ्यांना की तुमचं प्रेम आहे. चारचौघात कॅबरे नको तुमचा. खोलीवर जा आणि नाचत बसा."

"भांडारकर, साल्या झालंय काय तुला ?" पालेकर काळजीत पडला.

माझा हा उद्रेक त्याला बिल्कुल अनपेक्षित होता.

पण शुद्धीवर यायला मी तयारच नव्हतो. मला झिंग चढली होती. नशा चढली होती. माझा दुःखाचा प्याला काठोकाठ भरला होता. वर फसफसणाऱ्या या फेसानं मी तर्र झालो होतो. प्याला हातात होता, "मिराकडं बघत मी पालेकरला बोललो, "अरे हर्ष झालाय मला दोस्ता. अभिनंदन ! हार्टिएस्ट. पण मला हार्ट नाही. मी हार्टलेस आहे. म्हणून रडायचं तेव्हा हसतो. हसायचं तेव्हा रडतो. गंमत आहे माझी. म्हणून लोकांच्या गंमतीला उपयोगी पडतो. गंमत करा लेको ! मजा मारा ! माझ्या जिवावर. कारण माझं वाटोळ झालं आहे. शाप आहे मला–माझ्या प्रियेचा ! तिच्या शारिरीक गरजा मी पुरवू शकलो नाही. नाही–नाही शकलो. आणि तिला दुसऱ्या कसल्याच गरजा नव्हत्या. नेसेसिटी इज् द मदर ऑफ इन्व्हेन्शन...येस पालेकर. गरज हीच तुझी आई आहे"....

* *







[ १० ]

तात्यारावांच्या खुर्चीवर बसलो. आभाळाचं ओझं डोक्यावर पडल्यासारखं झालं. उभी खोलीच डोळे वटारून बघतेय असा भास झाला. क्षणभर——

तसा मी सेन्टिमेन्टल नव्हतो. सहसा भावनांच्या आहारी जात नसे. आणि या गोष्टीचा मला अभिमान होता.

पण कधी नाही ते अंतःकरण आज हललं. मन भारावल्यासारखं झालं. दृष्टी ओलावली. गळा जड झाला.

मिरा समोर होतीच.

तिला मी म्हटलं, " तात्यारावांचा एक लाइफ साईज फोटो लावायला हवाय खोलीत.

"हो नं !"

शिपायाला सांगून वृत्तसंपादक जोशीला मी बोलावून घेतलं.

त्यानं देखल्या देवाला दंडवत घातलं. माझं अभिनंदन केलं. म्हटलं, "साहेब——"

"साहेब नको. फक्त भांडारकर." मी बजावलं.

त्याला हे जमेना. तो बोलला, "साहेब, दोन दिवसात 'जनमता'चा सेल चांगला वाढलाय हो."

मी म्हटलं, "जोशी हे बाईना सांगा. माझा याच्याशी संबंध नाही."

"नाही, मला सांगायचं होतं, आपण धोरणात जो बदल केला तो मानवलेला दिसतो." जोशी म्हणाला.

"तात्यारांवाच्या 'जनमता'चं धोरण बदलत नाही जोशी." मी सांगितलं, "दोन दिवस हा काय नि कसा चमत्कार झाला मला ठाऊक नाही. पण उद्यापासून हे बंद व्हायला हवं. तात्यारावांनी शिकवलंय वृत्तपत्र व्यक्तीसाठी नाही, तत्त्वासाठी असतं. म्हणूनच जनमतात कोणाही व्यक्तीचा त्यांनी कधीही उदोउदो केला नाही. फक्त उच्च तत्त्वं तितकी उचलून धरली. मग ती कोणाचीही असोत. हे करताना धर्म पाहिला नाही, पक्ष मानला नाही, आपलं साहिलं नाही, परकं देखलं नाही. हंसाची वृत्ती ठेवली. पाण्यातून फक्त दूध तितकंच घेतलं, टिपलं."

"पण सचिवालयातून साहेबांनी पालेकरांना—" जोशी लांबलचक खुलासा देऊ लागला.

" मला एक्सप्लनेशन नकोय जोशी." माझा आवाज नकळत चढला, "मी तात्यारावांचा चेला आहे. सच्चा. माझ्या डोळ्यापुढं एक तो आदर्श, त्यांचा. त्यांचं धोरण मी चालवणार. त्यांची शिकवण आचरणार. हे एकदा पक्कं झालं की पुढचं स्वच्छ आहे. तुमचा कोणाचा विरोध असला तर आताच बोला."

"आम्ही काय हुकूमाचे ताबेदार. कुठंही पाट्या टाकायच्या."

"मग हुकूम आहे माझा. व्यक्तीपूजा बंद. तात्यारावांचं सुद्धा नाव नको. जिवंतपणी त्यांनी कटाक्षानं 'जनमता'त कधी आपलं नाव येऊ दिलं नाही. सांगत, जाहिरात करून मोठा संपादक व्हायचं नाही मला. बाकीच्यांना संपादक ही करीयर वाटते. माझं ते मिशन आहे. आणि उभ्या आयुष्याच्या त्यांच्या ह्या उपासनेची फक्त दोनच दिवसात माती करून तुम्ही पावन झालात. जोशी मला शरम वाटली. लाज लाज झाली."

आता मात्र जोशी चिरडीस आला, "इतकं वाटत होतं तर रजा नव्हती घ्यायची."

"रजा ? मला यायचंच नव्हतं.परत; पण माथ्यावर खापर फुटलंय हे. अश्वत्थाम्यासारखं. आता सुटका नाही."

मग दोनचार दिवस घरी जायला रात्रीचे दीड दोन वाजत. फॉर्म मशिनवर चढेपर्यंत मी बेचैनच असायचो.

उगाच नाही. कारण होतं.

ठीक साडेअकराला फोन यायचा.

"भांडारकर, चेतन हिअर. आजचा अंक बेकार, नक्कड. तात्यांची सुद्धा बातमी नाही म्हणजे ? अरे ज्याचं खाता त्यालाच लाथा हाणता ? ...हरामखोर..." वगैरे.

आणि मला समाधान वाटायचं.

मग सहाला नाथ पालेकर येऊन डोकं खायचा. समोर खुर्चीवर ठाण मांडून बसायचा. तोंडाची टकळी चालू असायची, "कसला रे रवी तू ? ताकाची रवीसुद्धा नाहीस. असतास तर जनमत नुसतं घुसळून काढलं असतंस. लोकांना हव्यायत बातम्या. सनसनाटी, चित्तथरारक. हाणामारी, खून, बलात्कार, मोठ्यांच्या भानगडी—असल्या. यातलं 'जनमता'त काय असतं बोल ?"

माझा हात याला अर्धचंद्र द्यायला वळवळत. मोठ्या मुष्कीलीनं हा मोह मी आवरायचो. हसून म्हणायचो, "काही नाही."

"नशीब ! कबूल केलंस. अरे माझ्या हातात असता तर आठवड्यात टॉपला गेला असता पेपर. जोश्या सांगतो दोन दिवसात पाच हजारावर सेल गेला होता. पण तात्यांनी घाण केली. म्हातारा स्वतः गेला. तुझ्यासारख्या भोटाला संपादक करून." नाथा खूप हळहळायचा.

मी उपरोधानं बोलायचो, "असं झालं खरं ! काय करायचं ?"





अनुक्रमणिका

तो आवेशानं म्हणायचा, "साल्या, दुसरं काही करू नकोस. फक्त माझं ऐक."

"हाणामारी, खून, बलात्कार, मोठ्यांच्या भानगडी–" त्याचीच यादी मी त्याच्या तोंडावर फेकायचो.

"टिंगल करतोस काय भडव्या ?"

तिसऱ्या दिवशी तर हा खूपच त्रागा करू लागला.

म्हणाला, "तुझ्या या एकाच पेपरात तात्यांच्या बातम्या वर्ज्य का रे? बाकी सगळे पेपर कव्हर करतात. तूच सांग– म्हणजे हे काही बरं दिसत नाही."

"जनमत तात्यारावांचाच आहे, पालेकर," मी आठवण करून दिली.

"ठिकठिकाणी आम्ही या शोकसभा घेतो. काय त्रास होतो आमचा आम्हास ठाऊक! हेतू एकच. मेल्यावर तरी तात्यारावांचं नाव व्हावं. जनमानसात त्यांची मूर्ती कीर्तीरूपानं कायम उरावी. पण या सभांबद्दल तुझ्या 'जनमतां'त एक ओळही येत नाही. खारला तात्यांच्या घरी नामसंकीर्तनाचा कार्य छान प्रोग्रॅम चालवलाय. तुझ्या पेपरात याचा नामनिर्देश नसतो..." पालेकर तक्रारी करीत होता.

मी बोललो, "तात्यारावांना या गोष्टी महत्त्वाच्या वाटत नव्हत्या."

तो उसळला, "तुझा तात्याराव गेला. आता आम्ही आहोत. आमच्या दृष्टीनं या गोष्टी महत्त्वाच्या आहेत."

"हे आम्ही कोण?"

"आम्ही कोण? काय प्रश्न विचारलास वेटा! आहोत मूठभर. पण आख्खी मुंबई आमच्या खिशात आहे. आमचे हात लांब आहेत आणि ताकद अचाट आहे. आज मनात आणू ते आम्ही करू शकतो आहोत. पन्नास लाख लोक आज आमच्या मुठीत आहेत. भांडवलदार कच्छपी आहेत. सरकार पाठीशी आहे. ते आम्ही कोण म्हणून दांताड वेंगाडून विचारू नकोस. कारण मुंबईत आज फक्त आम्हीच आहोत." पालेकराच्या वल्गना सुरू झाल्या.

त्याच्या डोळ्याला डोळा देऊन मी म्हटलं, "तुम्हा मंडळीवर तात्यारावांचा विश्वास नव्हता. माझाही नाही. तुमच्या हेतूंबद्दल शंका आहे; पण मला कळत नाही, तात्यारावांचं इतकं प्रेम तुम्हाला आजच का फुटावं? माझा तर्क आहे तुम्हा मंडळीना त्यांचा हा 'जनमत' हवा आहे."

नाथ पालेकर जोरजोरानं हसला. "गाढव आहेस. 'जनमत' आमचा नाही तर कोणाचा? तुझा? अरे मनात आणू तर या क्षणी लाथ मारून तुला हाकलू शकतो."

"उत्तम! तसंच करा!" मीसुद्धा त्याच्याइतकाच मोठ्याने हसलो.

"तसं आम्हाला करायचं नाही."

त्यानं जाब केला नाही. उठला आणि तो चालता झाला.

रोटरी क्लबचं पत्र घेऊन मिराच माझ्या केबिनमध्ये आली.

पत्रात लिहिलं होतं, ... "या वर्षीचा 'जर्न्यालिझम'चा पुरस्कार कै. तात्याराव विजयकर यांना मरणोत्तर देण्याचा निर्णय क्लबनं घेतला आहे. प्रजासत्ताक दिनाच्या दिवशी कार्यक्रम आयोजित केलेला असून तात्यारावांना मिळालेला पुरस्कार त्यांचे सुपुत्र श्री. चेतन विजयकर स्वीकारणार आहेत. सदर समारंभास आपणही उपस्थित राहण्याची कृपा करावी, ही विनंती."

"तात्या हयात हवे होते आज!" त्यांच्या लेकीच्या डोळ्यातून गंगायमुना वाहू लागल्या.

"मग त्यांना हा पुरस्कार मिळालाच नसता." मी सांगितलं. "आणि मिळता तर त्यांनी तो स्वीकारला नसता."

"काहीतरीच तुमचं. रोटरी क्लबसारख्या मोठ्या संस्थेनं आपल्या कार्याचा गौरव केलेला बघून त्यांना बरं वाटलं असतं." मिरानं म्हटलं.

"अशा मानसन्मानाची त्यांना पर्वा नव्हती. 'सोव्हिएत देशा'च्या वतीनं मिळालेलं पारितोषिक नि रशिया भेटीचं निमंत्रण त्यांनी नाकारलेलं मला ठाऊक आहे." मी माहिती दिली.

"त्यात कम्युनिस्टांचं राजकारण होतं."

"मग यात राजकारण नाही असं वाटतं तुम्हाला?"

"तुम्हाला सगळ्यातच राजकारण दिसतं, मांडारकर."

"असतं म्हणून दिसतं." मी हसून बोललो, "मी पत्रकार आहे मिस विजयकर. परिस्थितीशी घटनांची सांगड घालतो, इंटरप्रीट करतो. राजकारण म्हणजे सत्तेसाठीची स्पर्धा, चुरस असं मी मानतो. बाकी सगळं थोतांड, भंकस, जाहीरात. कोटयवधी लोकांना रेसमध्ये फसवण्याकरिता, या जाळ्यात ओढण्याकरिता. आपण मारे हे खाजगी, ते सार्वजनिक; हे सांस्कृतिक, ते सामाजिक वगैरे वगैरे शिक्के ठोकून लोकशाहीचे उदंड पोवाडे








गात वसतो. परंतु ही मूलभूत स्वातंत्र्यं उप-भोगायला मुळात जी व्यक्ती, जी मतं नि विचार लागतात तेच स्वतंत्र नाहीत. तुम्हाला कळत न कळत सतत त्यांच्यावर आघात नि प्रघात पडत असतात. आपण, आपली मतं नि विचार आपले उरतच नाहीत. पद्धतशीरपणं त्यांचं अव्यक्तीकरणं झालेलं असतं, आणि निवडणुकां-पर्यंत तर आपण पार झिंगलेले असतो. म्हणून तर ही लोकं सांगतील तिथं शिक्के मारतो. . . . "

मिरानं कानात बोटं घातली. म्हटलं, "पुरे हो! आज इतकंच बस्स! बाईचं डोकं माझं, फुटेलबिटेल. आधीच रात्र-भर जागरण . . . "

"अहो, आयतं देवाचं नाव कानी पडतं —"

"आणि उद्यापासून लाला महाराजांच्या सेवेचं भाग्य लाभणार आहे."

"लाला महाराज! सप्तस्वर्ग फेम! बाप रे!"

"अहो, गुरु आहेत ते भय्याजींचे. त्यांच्या शब्दाशिवाय ह्याचं पान हालत नाही." मिरानं हसून म्हटलं.

संध्याकाळी नाथ पालेकर आला आणि सांगू लागला, 'चांडाळा आधी माझ्यावरोवर चल."

मी त्याला विचारलं, "तुला काय वाटतं मी रिकामटेकडा आहे."

"गेलास उडत! तू आणि तुझं काम. आय ॲम गोइंग टु रेप यू टुडे." आपल्या विनोदावर बेहोप खूप होऊन तो खदखदू लागला.

"अरे पण का मला छळतोस बाबा?"

"कारण तू मला आवडतोस. पोरगी असतास तर लग्नच केलं असतं लेका."

"बरं झालं असतं! हजारो पोरींवाळींनी दुवा दिला असता मला."

"हॅट! भांचोद या पोरींना तू ओळखत नाहीस. त्या माझ्या मागंच गोंडा घोळत बावल्या असत्या." नाथ पालेकराचा आत्म-विश्वास दांडगा होता.

"तुझ्यामागं गोंडा घोळतात म्हणजे काय करतात रे?" मी विचारलं.

"स्वतःच्या डोळ्यांनीच बघ की एकदा." त्यानं म्हटलं, "पण आधी ऊठ. जायचंच आपल्याला एरोड्रोमवर. दिल्लीच्या बड्या अधिकाऱ्याला भेटायला."

"आपल्याला म्हणजे?"

"तुला आणि मला."

"माझा काय संबंध?" मी प्रश्न केला.

"तात्यांचे क्लासमेट होते हे. म्हणून तुझ्यात इन्टरेस्ट घेतोय." त्यानं सांगितलं.

मी म्हटलं, "माफ कर. मला इन्टरेस्ट नाही."

पालेकर भडकला, "जातीचाच हलकट आहेस. शब्द गेलाय माझा. जाऊन बोंब ठोकतो आता. च्यायला! फुकट मरावं आम्ही तुमच्यासाठी. तुझ्या तात्याला रोटरी क्लबचं हे ॲवॉर्ड








अनुक्रमणिका





गरवारे फक्त घरच्यांसाठी नव्हे तर उद्योगधंद्यांसाठी पण अनेक वस्तू बनवितात. पॅकिंगकरिता खास पॉलिथीन, तसेच औषधे, तयार कपडे, बिस्किटे, चॉकलेटस् वगैरे हवेपासून सुरक्षित ठेवण्यासाठी प्लॅस्टिकचे तलम आवरण गारफेज.

गारस्ट्रॅप—पाऊसवाऱ्याला न जुमानणारे नायलॉनचे पट्टे. पुठ्ठ्याची व लाकडाची खोकी बांधण्याकरिता गरवारे यांनी नुकतेच नायलॉनच्या रंगीबेरंगी पट्ट्याचे उत्पादन सुरु केले आहे.

पूर्वी जिथे जिथे पोलाद, लोखंड, लाकूड, रबर वगैरे वापरत त्या सर्व ठिकाणी आज प्लास्टिक्स आणि नायलॉनचा सरसि उपयोग केला जातो.

आधुनिक कारखाने नेहमी नायलॉनचे रॉड, गीअर्स, दोर, कन्व्हेअर् बेल्टस व प्लास्टिकचे पाईप, कॉंडुइटस् वगैरे वजनाला हलक्या पण अत्यंत टिकाऊ वस्तू वापरतात. या सर्व वस्तूंचे गरवारे उत्पादन करतात.

एवढेच काय, देशाच्या संरक्षणासाठी आवश्यक अशा पॅरेशूटस् साठी लागणारे नायलॉनही गरवारेच बनवितात.

Vision



रसाळ फळें बघतांच तोंडाला पाणी सुटते. अशा फळांचे पक्ष्यांपासून व गारांच्या वादळापासून संरक्षण करण्यासाठी गारफिल धाग्यांची जाळी अतिशय उपयुक्त ठरतात.



रोजच्या वापरासाठी रंगीबेरंगी प्लास्टिक्सच्या बालद्या, भांडी ग्लासेस अशा अनेकविध गोष्टी. त्यांचे निर्माते गरवारे.

रात्रीच्या जेवणानंतर संगीतासाठी ट्रान्झिस्टर हवाच. सर्व नावाजलेल्या ट्रान्झिस्टर्सची प्लास्टिक्स कॅबिनेटस् गरवारे बनवितात.



आजच्या-कृत्रिम वस्तूंच्या युगात-नायलॉन आणि प्लास्टिक्सच्या युगात-एका उद्योगसमूहाने तुमच्या जीवनावर प्रभावी छाप पाडली आहे. भारतातील नायलॉन आणि प्लास्टिक्सचे आद्य निर्माते तुमचे जीवन अधिक आरामशीर आणि सुखी करण्यासाठी अहोरात्र झटत आहेत.

**गरवारे नायलॉन्स लि.**
**गरवारे प्लास्टिक्स प्रा. लि.**
**गरवारे सिंथेटिक ब्रिसल्स प्रा. लि.**
**गरवारे फिलामेंट कॉ. प्रा. लि.**

# सूर्योदयापासून सूर्योदयापर्यंत

आम्ही
तुमच्या जीवनाशी
निगडीत आहोत





पहाट झाली, तुम्ही उठलात की पहिली गोष्ट टूथब्रश. सर्व उत्तम टूथब्रशची हँडल्स आणि ब्रिसल्स गरवारे बनवितात.

पिसासारखी हलकी, मऊ पण टिकाऊ आणि आकर्षक नायलॉनची साडी. उत्तमोत्तम साड्यांसाठी गरवारे नायलॉन सूत.



तुमच्या फ्रिजचे दार उघडा, आतील प्लास्टिक्सचे सर्व भाग गरवारे निर्मित.



आरामात बसण्यासाठी ही खुर्ची. याचे पट्टे गरवारे फिलामेंटचे.





यशस्वी ऑफीसरच्या टेबलावरील प्लास्टिक्सचे फायलिंग ट्रे आणि फाईल्स—निर्माते गरवारे



मासे—देशातील कोट्यावधी लोकांचे अन्न—गरवारे नायलॉनच्या जाळ्यात पकडले जातात.

ताईच्या बाहुल्यांचे नायलॉनचे केस, स्त्रियांसाठी सुंदर गंगावने व टोप—ह्या गोष्टीही गरवाऱ्यांकडूनच येतात.





जलक्रीडेची मजा काही औरच. तशात गरवारे नायलॉन सुताचा पोहण्याचा पोशाख असेल तर कांही विचारायलाच नको.



मासे पकडण्याचा छंद फार लोकांचा आवडता. गरवारे त्यांच्याकरीता नायलॉनची उत्तम दोरी बनवितात.

खरेदीला जाताना फॅशनेबल पिशवी हवीच. इतकी टिकाऊ की कितीही सामान बेधडक भरा. गरवारे फिलामेंट एका खास ताकदवान सुतापासून आकर्षक पिशव्या बनवतात.



अनुक्रमणिका

मिळवून दिलं. लायकी होती का यांची ? . . . "

बराच वेळ तो असा शिव्याशाप देत होता. मी लक्षच दिलं नाही. ओरडला, ओरडला आणि झक् मारीत आपला आपणच निघून गेला.

दुसऱ्या दिवशी सकाळी आठला माझ्या खोलीवर हजर.

नुकताच उठलो होतो. तोंड धुवून पेपर चाळीत होतो.

तर दारावरुन पालेकर बोलला, "दिल्लीचे साहेब खाली गाडीत बसलेयत. चल."

कॅडेल रोडला एका पॉश हॉटेलात आम्ही शिरलो. पालेकरनं ब्रेकफास्टची आर्डर दिली.

इकडे त्याचे दिल्लीचे साहेब माझ्याशी कुजबुजू लागले, "तात्याराव विजयकर माझा वर्गमित्र. खूप हुशार अभ्यासात. इंग्रजी घेऊन एम्. ए. फर्स्ट क्लास होता. पण 'जर्नालिझम'च्या वेडात फुकट गेला. नादीष्ट, विलक्षण लहरी . . . . . "

नाथानं तोंड घातलं, "सर, तुम्हांला कल्पना तरी असेल का ? पण तुम्हा सर्व वडया वडया अधिकाऱ्यांची पर्सनल फाईल आमच्या तात्यांकडे होती."

साहेब थक्कच झाले, "खरं की काय ? आश्चर्य आहे !"

पालेकर मला म्हणाला, "तुला ठाऊकच असेल भांडारकर. तात्यांकडे खरोखरच ही फाईल आहे. संपादकाच्या खोलीत, कपाटात. चोरखणात ठेवली असावी."

## आकाऽऽऽ श्वाणी : श्रुतिका !



"ह्ह्ह्य ! एक दिवस 'श्रुतिका' लागण्यापूर्वी रेडिओ बंद करायला विसरले तर इतके काही चिडायला नको......!!"

साहेब हसत बोलले, "शक्य असलं तर बघायचीय मला ही फाईल. तात्यांनी माझ्यासंबंधी काय कलेक्ट केलंय . . "

मी सांगितलं, "पण माहिती गुप्त स्वरूपाची असली तर–– नाही म्हणजे पत्रकारांनाही एटिकेटस् असतातच."

साहेब बोलले, "बरोबर आहे. आग्रह नाही माझा. अ‍ॅन्ड आय विल पे यू. रिमेम्बर !"

दिल्लीच्या या वडया अधिकाऱ्याच्या तोंडाकडे आ वासून मी बघतच राहिलो.

साहेबांनी माहिती दिली, "शनिवारपर्यंत मुंबईत आहे मी. रोटरी क्लबच्या त्या फंक्शनचा अध्यक्षच आहे. माझा पत्ता पालेकरला ठाऊक आहे.

मी म्हटलं, "गरज नाही. माझ्या हातून हे होणार नाही."

आणि मी सरळ बाहेर पडलो.

दुपारी मिराला हे मी बोललो.

तिनं सांगितलं, "भय्यासुद्धा मला रोज सतावतो. मी सांगते कपाटाच्या चाव्या सॉलिसिटरकडेच आहेत. भांडारकराशिवाय दुसऱ्या कोणाला मिळणार नाहीत."

"आणायला हव्यात मग." मी म्हटलं.

"पण माझ्याकडेच आहेत नं. " ती मिस्कीलपणं हसली.

नाथा पालेकरानं सांगितल्याप्रमाणं कपाटाच्या चोरखणातच ती फाईल होती. तात्यारावांनी वर लिहिलं होतं––'खाजगी आणि अत्यंत गुप्त. कोणत्याही परिस्थितीत या माहितीचा कोणी उपयोग करू नये.'

त्या दिवशी तरी नाथ पालेकरची सायंफेरी चुकली होती. मी सुटकेचा श्वास टाकला.

पण 'ऑपेरा हाऊस'च्या नाक्यावरच ह्यानं मला अडवलं.

"तुझीच वाट बघतोय लेका." तो बोलला.

"गाडी नाही दिसत !"

"ती साली त्या दिल्लीवाल्या साहेबाकडे पडलीय. असेल साली गॅरेजमध्येच. आणि हा वर माझ्या फ्लॅटमध्ये कोणा छोकरीबरोबर मस्त मजा मारीत असेल." त्यानं खुलासा केला.

"म्हणजे हेसुद्धा धंदे करतोस वाटतं ?"

"हे आणि असले अनेक तू विचारू नये, मी सांगू नये," आज स्वारी जरा अंतर्मुख झालेली दिसत होती. "होय. साहेबाना मी बाया पुरवतो. त्यांच्या खाण्याची आणि तसल्या पिण्याची सोय करतो. ह्यांच्या मानगडी नि लफडी निस्तरतो. एका शब्दात मी ह्यांचा भडवा आहे. आणि भडवेगिरी हा माझा धंदा आहे. आता बोल."

"बोलायचं काय ? तू तुझ्या वाटेनं जा. मी माझ्या जाईन." मी म्हटलं.

"एकदा सांगितलं ना मी भडवा आहे म्हणून. मग तुझ्याशी धंदा केल्याशिवाय तुला बरा सोडीन ! मग काय ठरलं ? काय घेणार आहेस?"







अनुक्रमणिका

"चहा, कॉफी--कोलासुद्धा चालेल !"

"मेलास तू ! फाईल महत्वाची आहे रे ! म्हणून तर तात्या-रावांना टरकून असे उभं सचिवालय."--पालेकर म्हणाला, "दहा हजार शुअर. दोस्त पडलास म्हणून सांगतो."

"फाईल ? कसली ?" मी जसा त्या गावचाच नव्हतो.

"सकाळी त्या हॉटेलात काय कॅबरे डान्स बघत होतास ?"

"हां, हां, ती फाईल होय ? मिळाली. तू म्हणत होतास तिथंच होती तात्यारावांच्या कपाटात." मी सांगितलं.

"गुड ! आता माझ्या हातात कधी देतोयस ?" तो घाईला आला.

"सकाळी तुझ्या त्या दिल्लीच्या साहेबांना सांगितलं नाही का मी ?"

"तुझी ट्रिक पसंत पडली त्यांना. दहा हजार रुपये द्यायला तयार आहेत."

"पण..."

"पंधरा. माझं नुकसान आहे. पण जाने दो!" नाथ पालेकर बोलला.

"कमिशन काय सुटले तुला ?" मी विचारलं.

"सांगितलं ना नुकसान आहे."

"पण किती ?"

"पाच हजार."

"नुकसान ? कसला रे भडव्या भाडचा तू ? फोरास रोडवरची पोरं बरी." मी म्हटलं. खिशात हात घालून एक पाचाची नोट काढली. सांगितलं, "हे घे. निदान पाच रुपये फायदा तरी होईल. आता नीघ. पुन्हा ही गोष्ट काढायची नाही."

पालेकर माझ्याकडे बघतच राहिला, "भांडारकर, अरे माणूस तरी आहेस का ?"

"नाही."

"थोडा व्यवहार शीक."

"शिकायचा नाही."

"तात्यारावासारखाच फुकट बाराच्या भावात जाणार आहेस लेका."

"धन्य होईन ! माझ्यामागं रडणारं कोणी नाही."

"नाही कसं ?" पालेकराच्या तोंडावर एकदम तजेला आला. काळोखात चाचपडत होता. बॅटरी हाती लागली, "तुझी रना. आता का ? बोल लेका ! इलेक्ट्रिक करंट गेला का नाही, खालपर्यंत... तिच्यासाठी तर वसवसतोयस नुसता."

"गप्प ! एक शब्द बोलू नकोस ! जीव घेईन !" आणि खरोखरच मी त्याचा जीव घेतला असता. भयंकर भडकलो होतो.

"काळजी करू नकोस. याहून अधिक बोलणारच नाही मी. इतकंच सांगतो पोरटीनं तुझा जप लावलाय." पालेकर म्हणाला, "मुकी पोर. तूच जाहिरात केलीस मुंबईभर. हिला अपघात झालाय. हॉस्पिटलात आहे. बरी झाली की मुंबई-करांच्या सेवेला पुन्हा उभी रहाणार आहे. वाहवा ! बेस्ट ! जाहिरात बाकी खूप करता. आता चार दिवसांनी जाहीर कराल अपघातानं रैनाचे पाय कायमचे अधू झालेयत. ह्याच्यापुढं ती नाचू शकणार नाही. तरी क्षमस्व...."

"तू काय बोलतोस मला कळत नाही." मी सांगितलं.

"अच्छा ! मी सांगतो. तुझ्या रैनाला अपघात वगैरे झालेला नाही."

"ठाऊक आहे मला. तू नाही, तुझ्या दोस्तानं तिच्यावर बलात्कार केला."

पालेकरला मी भलताच शॉक दिला होता. त्याचं तोंड उघडं पडलं. चकित नजरेनं तो माझ्याकडे बघत राहिला.

आता जात्याच चलाख म्हणून हे मला कसं कळलं असा प्रश्न त्यानं केला नाही. उलट आपणहून मला माहीत नसलेल्या कितीतरी गोष्टी सांगून हा मोकळा झाला.

रैनानं खूप प्रतिकार केला होता म्हणे. चवताळलेल्या वाघिणीसारखी ही तुटून पडली होती. अगदी बेशुद्ध पडेस्तोवर.

पण ह्याचाच परिणाम भयंकर झाला होता. रक्त तर खूप गेलंच. शिवाय कायमचं दुखणं मागं लावून घेतलं होतं पोरीनं. डॉक्टरनं सांगितलं होतं, "नाचगाण्याचं नाव आता जन्मात काढू नका! कमरेला पट्टा बांधून जरी ही सरळ चालू लागली तरी खूप म्हणतो मी." अण्णाजी कपाळ धरून बसले होते. पोलिसात जाऊ शकत नव्हते कारण हा पडला दोस्ताचा पोर. कायमचा माणसातून उठतो. म्हणूनच त्यांनी मला कळवलं नव्हतं. कारण कळलं की मी आकाशपाताळ एक करीन अशी त्यांना ह्या पालेकरानंच धास्ती घातली होती.

"तर हे असं आहे. बोल आता काय करणार आहेस?" नाथानं मला विचारलं.

"कर्तव्य!" मी म्हटलं, "कृपा करून पत्ता दे यांचा."

"देईन. एका अटीवर."

"फाईल नाही मिळणार. दुसरं काहीही माग."

"दुसरं काही नको मला." पालेकर बोलला, "लेका ती पोर इतका जीव टाकतेय तुझ्यावर आणि तुला महत्त्व एका फाईलीचं. मुळातच षंढ आहेस का पिराला वाहिलेल्या बोकडासारखा चेचलाय...?"

ऊरावरची धोंड दूर झाली होती.

खरं म्हणजे माझ्या हे आधीच लक्षात यायला हवं होतं. तात्यारावांच्या लेकाला वाचविण्यासाठी अण्णाजींना गप्प बसण्यावाचून गत्यंतर नव्हतं. आणि दोस्तीकरता हे करणं भागच होतं. अण्णाजींसारखी माणसं दोस्ताच्याच नाही तर स्वतःच्या हयातीपर्यंत दोस्ती राखतात.

आणि ती पोरटी, होय रैना, जप करीत बसली होती म्हणे माझा. बसेल! आहेच तशी लाघवी, मनस्वी मायाळू. मुकी नि बहिरी होती. तेव्हासुद्धा डोळे भरभरून नुसती बघत बसायची. बोललेलं सगळं कळायचं. मनातलं सुद्धा नेमकं ओळखायची. पुस्तकासारखा चेहरा वाचण्याची विद्या तिला कोणी शिकवली होती देव जाण!

आता तर हिला तोंड फुटलं होतं. कान आले होते. मग माझ्या नावानं जप लावतही असेल. नसते प्रश्न विचारून अण्णाजींना हैराण करीत असेल. रैनाचं माझ्यावर तसंच प्रेम होतं.

पण पालेकरासारख्या माणसाला ते काय कळणार आहे? तो एकच अर्थ घेणार. त्याला ठाऊक असलेला. आयाबहिणीकडे तरी ही लोकं सरळ नजरेनं बघत असतील का? मला शंका आहे. त्यांना दिसतं शरीर, जे रक्तामांसाचं आहे. आणि कळतात फक्त या शरीराच्या गरजा, ज्यांनी ह्यांचं रक्त नि मांस पोसतं. तेव्हा प्रेम म्हणजे यांच्या दृष्टीनं फक्त वासना. दरिद्री साले! खरोखरच कमनशिबी!

## [११]

आजच्या अंकापासून 'जनमता'त 'कुऱ्हाडीचा दांडा' ही लेखमाला मी सुरू केली होती. पहिलाच लेख होता--"लाला महाराज आणि कंपनी."

तात्यारावांना जाऊन आज बारा दिवस झाले होते.

त्या घरी आज त्यांच्या बाराव्याचा समारंभ होता. बरोबरच लाला महाराजाच्या हातून गृहशान्तीचाही कार्यक्रम.

चेतन बराच गडबडीत असला पाहिजे. एरव्ही एव्हांना त्याचा फोन यायलाच हवा होता. 'जनमत' वाचून असा उसळला असेल–मिराकडून कळेलच म्हणा! होय. काही झालं तरी तो गप्प बसणार नाही. फोनवर मला चांगला फायर करणार. शिव्या देणार. बघू आणिक काय काय करतो!

आणि मीसुद्धा आज गप्प बसणार नव्हतो. उलट सुनवणार होतो. चांगले इरसाल--

पण साडेबारा झाले तरी चेतनच्या आघाडीवर सामसूम होती. बाकी अनेक फोन आले. लाला महाराज प्रकरण एकूण रंगणार अशी चिन्हं दिसू लागली. काहींनी बोंब मारली. काहींनी शिव्या मोजल्या. बघून घेण्याच्या धमक्याही मिळाल्या. एकादोघांनी कौतुकसुद्धा केलं. कोणालाच मी उत्तर देण्याच्या फंदात पडलो नाही. फक्त हसलो. मनापासून जिवाला बरं वाटलं. जिवन्त असल्यासारखं वाटलं.

आणि घंटी वाजली.

मी फोन उचलला, "मी भांडारकर बोलतोय."

"मी मिरा. भयंकर प्रकार झालाय भांडारकर. भय्यावर सुरीहल्ला झालाय. सिरीयस नाही. लाला महाराजांनी मारेकऱ्याला बाजूला केलं. मग लोकांनी पकडलं. पोलिसांकडे दिलं. हा कोण आहेत माहीत आहे? अण्णाजींच्या टरुपमधला डान्स मास्तर.

"राजनारायण?"

"होय, तोच. पोलिस अधिकारी म्हणतो याचा चेहरा परिचयाचा वाटतो. वॉण्टेडच्या यादीत असावा. डाकू किंवा दरोडेखोर. पोलीसठाण्यावर नक्की कळेल." तिनं सांगितलं.

"अरे बापरे! मग?"

"तुम्ही या नं इकडे. हो आताच. आपल्या रिपोर्टरला पण घेऊन या."

"निघालोच." मी फोन खाली ठेवला.

आमच्या मुंबईच्या खास प्रतिनिधीला बरोबर घेऊन मी टॅक्सीत बसलो. ड्रायव्हरला सांगितलं, "लिंकिंग रोड, खार."

वाटेत आमच्या प्रतिनिधीला चेतनवर झालेल्या या सुरीहल्ल्याची मी बातमी दिली.

तो थक्क झाला. म्हणाला, "खास अंक काढावा लागेल."

तात्यारावांच्या बाराव्याच्या समारंभाचा पार विचका झाला होता. पाहुण्यांनी घर गजबजलं होतं. होम, हवन, शान्ती वगैरे सर्व करून जवणाची पानं मांडली होती. बाहेर अंगणात तात्यांना व पितरांना पानं ठेवून कावळ्याची वाट बघत मंडळी उभी होती. तर बाजूला लपून बसलेला हा इसम सुरा उगारून






चेतनच्या अंगावर धावून आला. मग एकच हलकल्लोळ झाला. चेतनला मोटरीत घालून इस्पितळात पोचवला. हल्लेखोराला पोलिसांनी ताब्यात घेतलं.

मी बंगल्यावर पोचलो आणि कुणीसं बातमी घेऊन आलं, "अरे नक्षलवाद्यांचा पुढारी आहे तो."

"पोलीस इन्स्पेक्टर तर म्हणत होते डाकू आहे?" मिरानं शंका घतली.

"म्हणजे एकच की! नक्षलवादी पुढारी दुसरे कोण असतात?" त्या माणसानं सांगितलं, "डाकूच. आंध्रातला. नांव सत्यनारायण. पाच हजाराचं बक्षीस आहे डोक्यावर. आमच्या महाराजांना मिळायला हवं हे."

अधिक ऐकायला मी थांबलो नाही. मिराला म्हटलं, "हा रिपोर्टर आलाय. तो करील काय ती माहिती गोळा. मी पोलीस ठाण्यावर जातो."

ठाण्यावर पोलिस अधिकाऱ्याला मी सांगितलं, "मी 'जनमता'चा संपादक. हल्लेखोराला मला भेटायचंय."

"परवानगी नाही." त्यानं हसून म्हटलं, "पेपरवाल्यांना तर बिलकुल नाही."

"अहो, त्याच्या घरचा पत्ता हवाय मला."

"त्याचं तोंड बंद झालंय बाबा! हे नक्षलवादी तुम्हाला माहीत नाहीत. अगदी पक्के!" त्यानं सांगितलं.

"हेट मी ड्राय इन्स्पेक्टर!" मी त्याच्या गळ्यातच पडलो. कोठडीच्या खिडकीतून मी हाक मारली, "राजनारायण."

"अं!" त्यानं डोळे उघडले. मला बघून डोळ्यात पाणी काढलं. मी डोळा घातला. मोठ्यानं म्हटलं, "मी 'जनमता'चा संपादक."

आपल्या भाषेत दणादण तो काहीबाही बडबडू लागला. "वन, टू, थ्री, फोर, फ्लोअर. फाइव्ह, सिक्स, सेव्हन हेवन्स. थर्टीसिक्स." इंग्रजी शब्द इतकेच. मग पुन्हा त्याची दणादाण सुरु झाली. आपल्या भाषेत.

माझं काम झालं होतं. बाहेर पोलिस अधिकाऱ्याला मी म्हटलं, "तुमचंच खरं इन्स्पेक्टर. हा माला शिव्या देतोय आपल्या भाषेत."

पब्लीक बूथवर जाऊन फ्री प्रेसच्या अय्यरला मी फोन ठोकला.

"अरे अय्यर, मी भांडारकर."

हा डाफरला, "गो टु हेल! साल्या एडिटर झालास. मीच बातमी दिली. पण तो भांडारकर म्हणजे तूच हे काही बोलला नाहीस."

"तुझी शपथ मला ठाऊक नव्हतं."

"ऑल राइट! पण पार्कमध्ये मसाला मुरगी खाल्यावर पार्डन करीन." त्यानं सांगितलं.

मी म्हटलं, "मुरगीमसालाच काय, माझं हे काम केलंस तर म्हणशील ते देईन."

"आय वॉन्ट टु मॅरी युअर सिस्टर." तो खदखदून हसला.










## ब्रह्मांडाचे ऑम्लेट

[ राजकीय दिवाळें वाजण्यापूर्वी ]

**साहित्य :– विश्वैक्याचा व एकात्मतेचा जप करणाऱ्या नवकवीने वरचेवर पालथे घातलेले ब्रम्हांड. त्याच कवीच्या डोक्यातील कांद्याचा (शाब्दिक) कीस. 'सर्वोदय' कंपनीचे खानदेशी शुद्ध तूप. मीठ-मिरची एकत्र केलेला एकात्मता अर्क.**

**कृती :– नवकवीन आरपार केलेले ब्रम्हांड घऊन, ते एका भांडयात फेसावे व त्याच कवीच्या कांद्याचा कीस त्यात मिसळावा.**

**सर्वोदय कंपनीचे शुद्ध तूप तव्यास लावून, त्यावर नवकवीचे ब्रम्हांड मिश्रण ओतावे. ते खरपूस होईपर्यंत तव्यावर उलट सुलट परतावे.**

**हे ब्रम्हांडाचे ऑम्लेट राष्ट्रीय एकात्मता अंगात वाढवण्यास गुणकारी आहे. तसेच ते पचवून सर्व राष्ट्रांना भेटी देऊन, चंद्रावर जाण्याची प्रचंड शक्ती अंगात निर्माण होऊ शकते. राष्ट्रीयवादी नवकवींना अत्यंत उपयुक्त असे हे ऑम्लेट आहे.**

"तिच्याबद्दलच काम आहे."

"काय?" आता तो सिरीयस झाला.

"सेव्हन हेवन्स. फोर्थ फ्लोअर. रूम ३६, लिंकिंग रोड, खार. नीट टिपून घे पत्ता. आहेस तसाच निघ. या पत्त्यावर अण्णाजी नि ही पोर भेटतील तुला. तुझ्या गाडीत घालून माटुंग्याला तुझ्या खोलीवर यांना घेऊन जा. मग मला फोन कर." मी त्याला सांगितलं.

"माझ्याबरोबर यायला ती तयार नसली तर?" त्यानं शंका काढली.

"सांग मांडारकर सिरीयस आहे. तुमचा ध्यास घेतलाय. काय वाटेल ते कर! पण पोलीस येण्यापूर्वी त्या जागेतून त्यांना पळव." मी म्हटलं.

"डोन्ट यू वरी रे! तुझ्या वहिणीसाठी प्राणदेखील गहाण टाकीन." अय्यरनं धीर दिला.

संध्याकाळच्या वर्तमानपत्रांना ती हेड लाईन होती.

'वड्या सरकारी अधिकाऱ्यावर सुरीहल्ला. हल्लेखोर नक्षलवादी पुढारी सत्यनारायण! खाली हल्ल्याचा सविस्तर वृत्तांत. तरुण सरकारी अधिकारी चेतन विजयकर आणि भयंकर नक्षलवादी पुढारी सत्यनारायण यांची माहिती.

वातमीचा शेवट नेहमीसारखा '... पोलीस गुन्ह्याचा कसून तपास करीत आहेत. हल्यामागं पूर्वनियोजित कट असावा असा त्यांचा संशय असून उद्यापर्यंत कटाचे धागेदोरे उलगडू शकू असं त्यांना वाटतं. या संबंधात अजून काही इसमांना अटक होण्याची शक्यता आहे.'

वृत्तसंपादक जोशीला मी सूचना दिली की वातमीला फार जागा देऊ नका. पहिल्या पानावर अर्धा कॉलम म्हणजे खूप. फक्त पोलीसांचं निवेदनच द्या. तुमचे अंदाज नको.

जोशी आश्चर्यानं बघतच राहिला. पण काही बोलला नाही. तितक्यात अय्यरचा फोन आला, "काम फत्ते!"

"तुझे आभार मानायला माझ्याकडे शब्द नाहीत अय्यर."

तो बोंबलला, "तू आणि तुझे शब्द घाल – ! आधी सांग मला का बनवलंस. तुझी ही मुकी वहीण तुझ्यापेक्षा चांगली बोलते. तुम्ही लोकानी फ्रॉड केलाय. मलाच नाही, उभ्या मुंबईला फसवलंत. मी बाहेर काढणारच."

"अरे, अरे!" ह्याला मी चुचकारलं, "नॉट सो फास्ट. सगळं सांगतो तुला. मोठी ट्रॅजिडी आहे. रात्री तुझ्या खोलीवर येईन तेव्हा सांगतो. तोपर्यंत तरी तोंड उघडू नकोस....."

संध्याकाळी साडेसातला माटुंग्याला ह्याच्या खोलीवर मी गेलो.

रैनानं मला पाहिलं आणि कॉटवर पडलेली ती ताडकन उठली. ओरडत, "रवी ––"

तिचा आवाज आयुष्यात मी प्रथमच ऐकत होतो. आणि हिनं मला मिठी मारली. खांद्यावर मान टाकून ती स्वस्थ पडून राहिली.

मोठ्या कष्टानं बलात्काराची हकीकत मी तिच्या तोंडून वदवून घेतली. मूळची आदिवासींची भाषा हिची. त्याच भाषेत तिनं सांगितलं. शुद्ध मराठी तिला बोलता येत नव्हतं अजून.

त्या प्रसंगाच्या नुसत्या आठवणीनंच चिमणीसारखी ती थरथर कापू लागली. पाठीवरून हात फिरवून तिला मी धीर देत होतो. तिनं सांगितलं, "तू बाहेर मोटरीत बसला आहेस. मला बोलावतोयस असं पालेकरनं सांगितलं मला. म्हणून त्याच्याबरोबर मी जिना उतरून खाली रस्त्यावर गेले. तर मोटरीत घालून त्यानं मला पळवली. जवळच कुठल्या तरी घराच्या खोलीत कोंडली. मग थोडया वेळानं हा चेतन विजयकर आला. आणि... आणि..."

रैना संतापानं वेडीपिशी झाली. त्वेषानं दात ओठ खाऊ लागली.

अय्यर होताच जवळ. तो ओरडला, "पुरे कर रे! का आता छळतो आहेस तिला. त्यानं आधी छळलीच."

अण्णाजी आपल्याच विचारात मग्न होते. ते एकदम माझ्या

अंगावर ओरडले, "कोण चोर आहोत का दरोडेखोर म्हणून पोलिसांना भिऊन दडून बसणार ? असेल राजनारायण नक्षलवादी. पण आश्रमाच्या वातावरणानं त्याची मतं बदलली. त्याला मी सर्वोदयवादी केला. तुमच्या राज्यात हा गुन्हा असला तर फाशी द्या. जाईन."

मी विचारलं, "हा बलात्काराचा गुन्हा पोलीसांना का नाही कळवलात ?"

"तो माझा खाजगी प्रश्न." त्यांनी उत्तर दिलं. "तुला तरी कुठं कळवलं ? तात्यारावांच्या एकुलत्या एक पोराला खडी फोडायला तुरुंगात धाडू ? शहाणा आहेस ! त्यांचा स्नेही म्हणायला थोवाड तरी राहील होय मग ?"

"अहो, पण तात्यारावांना ही गोष्ट कळली होती. आणि ती बाहेर फोडण्याची जबाबदारी माझ्यावर टाकून त्यांनी जीव दिला." मी म्हटलं.

तात्यारावांचं पत्र खिशातून काढून मी त्यांच्या हातात ठेवलं. कितीतरी वेळ अण्णाजी ते वाचीत होते. वाचलं आणि चष्मा काढून त्यांनी डोळे पुसले. डोक्याचा घाम पुसला. म्हटलं, "मी तात्याराव नाही. त्यांच्या मुलाचं मी वाटोळं करणार नाही."

"ठीक आहे." मी वैतागानं बोललो, "मला मात्र अडवू नका. मी ऐकणार नाही. तुमचंसुद्धा."

"नाही बेटा ! तू तुझं कर्तव्य कर. मान खाली घालण्याचा प्रसंग येऊ देऊ नकोस."

सगळी हकीकत कळली तसा अय्यरही उसळला, "व्हाट ए मॅन यू अण्णाजी ! भांडारकर गो अहेड. यू आर नॉट अलोन."

सकाळच्या पेपरांचं पहिलं पान तर हल्ल्याच्या बातमीनंच संपूर्ण भरलं होतं. बातमी तशी कालचीच. फक्त बारीक-सारीक, ऊठसूट सर्व तपशील. चेतन विजयकर, लाला महाराज, 'हाच तो हरामखोर नक्षलवादी' शीर्षकाखाली राजनारायण ऊर्फ सत्यनारायण वगैरे फोटो छापले होते. चेतनची खास मुलाखत. त्यात सरकारी अधिकाऱ्यांचे मुडदे पाडण्याचं नक्षलवाद्यांचे कारस्थान, लाला महाराजांच्या कृपेचा अगाध महिमा इत्यादि गोष्टी त्यानं वर्णिल्या होत्या.

एकट्या 'जनमता'नंच या बातमीला प्राधान्य दिलं नव्हतं.

मिरालासुद्धा ते खटकलं. बातमीदाराला बोलवून तिनं त्याची हजेरी घेतली. उगाच. त्यानं माझ्याकडे बोट दाखवलं.

मी म्हटलं, "खरं त्याचं. मीच सूचना दिली होती, बातमीला खोटं महत्त्व देऊ नका म्हणून."

"खोटं महत्त्व ?" ती नाराज दिसली, "सगळे हे पेपर खोटंच महत्त्व देतायत ?"

"नाहीतर काय ? खरी परिस्थिती त्यांना ठाऊकच नाही."

"तुम्हाला ठाऊक आहे. मग गप्प का ?" तिनं विचारलं.

"गप्प का ?" मी हमल्यासारखं केलं, "काय सांगू ?"

तिनंच उलट प्रश्न केला, "लोकांना मीच काय सांगू ते बोला. भय्यानं तर घर डोक्यावर घेतलंय. ओळखीची लोकं सुद्धा विचारतात -----"

"मी समजू शकतो. पण तुमचा माझ्यावर विश्वास आहे ना ?"

मिरा फणकाऱ्यानं माझ्या केबीनमधून बाहेर पडली.

[ १२ ]

संपादकीय खात्यात तर सर्वच मंडळी माझ्यावर फुगून बसली होती. मोकळेपणानं बोलायलाच कोण तयार नव्हतं. विचारलं तितकाच जाब देत. सांगितलं तितकंच काम करीत. मला ऐकू जावं इतक्या मोठ्यानं वाद घालीत बसत. या विषयावरच चर्चा करून रहात. वातावरण एकूण माझ्याविरुद्ध बरंच तापलं होतं.

अशात तिसऱ्या दिवशी बातमी आली. चेतनवरच्या हल्ल्याच्या संदर्भात अण्णाजी रेड्डीकर आणि रैना यांची नावे बाहेर आली. मुक्या मुलीच्या नाचाच्या कार्यक्रमाची बनवा-बनवी पोलिसांनी जाहीर केली. तूर्त ही दोघं बेपत्ता असून पोलीस त्यांचा जारीनं तपास करीत असल्याची माहिती दिली होती. रैना मुकी नव्हती. तिला चांगलं बोलता येतं. नक्षलवादी सत्यनारायणाची ती हस्तक. दोघांनी थापा मारून अण्णाजी रेड्डीकराला तयार केला वगैरे सनसनाटी गोष्टी पेपरांनी प्रसिद्ध केल्या. काही मराठी पत्रांनी तर एका पत्रकाराचाही या नक्षलवाद्यांशी संबंध असल्याचा संशय व्यक्त केला...

शनिवार होता. सव्वीस जानेवारी. प्रजासत्ताक दिन.

ब्रेबॉर्न स्टेडियमवरील जाहिर कार्यक्रमाला हा नाथ पालेकर भेटला.

माझ्यापाशी येऊन मुद्दामच ह्यानं चौकशी केली, "संध्याकाळच्या रोटरी क्लबच्या फंक्शनला येणार असशीलच."

"म्हणजे ?" मी विचारलं, "शंका आहे तुला ?"

"होय. पोलीस तुला आधीच धरून नेतील."




अनुक्रमणिका

"का? तशी व्यवस्था केली आहेस?"

"च्यायला! दोस्त आहेस म्हणून वॉर्न केला. तर वर हे!" त्यानं म्हटलं.

"दोस्ता, तरीही माझा निर्णय कायम. तात्यारावांची फाईल मिळणार नाही." मी त्याला सांगितलं आणि मोठमोठ्यानं हसत सुटलो.

"जनमता"ला रजा नव्हती. जरा उशीराच मी ऑफिसला पोचलो.

•

वृत्तसंपादक जोशीच्या टेवलाशी दोन पोलीस इन्स्पेक्टर वातचीत करीत उभे होते.

माझ्यामागं हे केवीनमध्ये शिरले.

"आपण भांडारकर?" एकानं विचारलं.

"होय. काय काम आहे?"

त्यांना माझं स्टेटमेंट हवं होतं.

मी दिलं हे असं -- सत्य नारायणाला मी ओळखत नाही. राजनारायणाला ओळखतो. अण्णाजी रेड्डीकरांच्या आश्रमावर झालेल्या हल्ल्यात पायाला पोलिसाची गोळी लागून जायबंदी झालेला हा एक आदिवासी. ह्याला रैनानं आश्रय दिला. बरा झाला तरी हा आश्रमातच राहिला. रैनाला नृत्य शिकविण्यासाठी. पुढं तिच्या ट्रूपमध्ये हा डान्स मास्तर झाला. आणि मंडळीवरोवर मुंबईला आला. तो नक्षलवादी असल्याचं मला तरी माहीत नव्हतं. त्याच्याशी माझा जो थोडाफार संबंध आला त्यात ही गोष्ट कधीच दिसून आली नाही. त्याच्या बोलण्याचालण्यात किंवा वागण्यातसुद्धा तसा संशय यावा असं काही वाटलं नाही.

नशीव! त्यांनी फाजील प्रश्न विचारले नाहीत. तूर्त इतकंच पुरे म्हणून सांगितलं. काही दिवस मुंबई सोडून जाऊ नका. खटल्यात तुमची साक्ष काढावी लागेल असं बजावण्यास मात्र ते विसरले नाहीत.



मी बोललो, "ठीक आहे."

'संध्याकाळ' घेऊन मिराच कावरीबावरी होऊन माझ्या केबीनमध्ये आली. म्हणते, "अहो भांडारकर, अण्णाजी रेड्डीकर नि रैना आपणहून माटुंगा पोलीसांच्या स्वाधीन झालीत म्हणे! वाचा ही बातमी."

मी म्हटलं, "आश्चर्य नाही. अपेक्षित होतं. अण्णाजींना तुम्ही ओळखत नाही."

"आता?"

"आताच युद्धाला तोंड लागलंय, मिस विजयकर. बघायचंय मला, तुम्ही तात्यारावांच्या कन्या आहात? का चेतनच्या भगिनी?"

बिर्ला मातुश्री सभागृह.

रोटरी क्लबाचा कार्यक्रम म्हणजे मुंबईतील सधन नि भव्य प्रतिष्ठित लोकांचा मेळावा. सभागृह तुडुंब भरलं होतं. हासुद्धा या लोकांचा एक विशेष. आपल्या सोशल फंक्शन्सना ते कटाक्षानं उपस्थित असतात.

खुर्च्या भरल्या होत्या तरी इतकी शांतता होती की वाटावं सभागृह खाली आहे. चिटपाखरूसुद्धा नसावं. या मोठ्या माणसांची शिस्त काही औरच, स्वाभाविक. जन्मल्यापासूनच शिकून येतात. आणि मग मरेपर्यंत ती तशीच टिकवतात. अंगावरच्या इस्त्रीच्या कापड्यांसारखी, कडक. कुठं चुरीसुद्धा दिसणार नाही. पावलांचा देखील आवाज होऊ न देता एकएक आत यायचा. बहुदा जोडप्यानं. हेही यांच्या आयुष्यात महत्त्वाचं होतं. अशा कार्यक्रमांना अर्धांगानं कधी येणार नाहीत. बरोबर कायदेशीर अर्धांगी असणारच. यांच्या प्रतिष्ठितपणाचं हे मुख्य अंग आहे. इतकंच नव्हे तर या अर्धांगीकडे सहज नजर टाकली तरी कोणाच्याही लक्षात यायला उशीर लागणार नाही, की ही माणसं सामान्य नाहीत. बडी आहेत. कानात हिऱ्यांची कुडी, हातात मोत्यांच्या बांगड्या, गळ्यात असलाच काहीतरी उंची प्रकार. अंगावर उंचीतली उंची फॅशनेबल साडी. केसांची अद्ययावत रचना. चेहऱ्यावर असंच काही भयंकर रंगरोगण. आता शोभतं की नाही हा प्रश्न वेगळा. कारण ती गोष्ट यांच्या हातची नसते. तो निकाल ईश्वरानं आधीच दिलेला असतो. एखादीच्या बाबतीत बाजूनं बहुतेकींच्या विरुद्ध .... तेव्हा एकएक असा आत यायचा. बाजूला कार्यकर्त्याला कार्ड दाखवायचा. बरोबर आपल्या आसनावरच बसायचा. तोंडानं चकार शब्दही न काढता यंत्रासारखा. म्हणूनही असेल, कर्ण्यावर कोणीही बोंबलत नव्हता, "शांत रहा. मागच्यांनी पुढं होऊन बसून घ्यावं. थोड्याच वेळात कार्यक्रम सुरू होईल." वगैरे हट! मुंबईतील इतर जाहीर सभात रंगणारा गणगोळणीचा प्रोग्रॅम इथं अजिबात नव्हता. सिनेमातल्या रेकॉर्ड नव्हत्या आणि तरीही सगळं कसं शांत, शिस्तीनं, सुरळीत चाललं होतं.










साडेपाचचा कार्यक्रम ठीक साडेपाचलाच चालू झाला. आणि याचं कोणालाही आश्चर्य वाटलं नाही. व्यासपीठावर खुर्ची अडवण्यासाठीही गडबड झाली नाही.

नाथ पालेकरचा तो दिल्लीचा बडा अधिकारीच अध्यक्ष-स्थानी होता. आपलं भाषण त्यानं थोडक्यात आटोपलं. बोलला इंग्रजीत. छान, झोकात. फुकट जाडे-जाडे शब्द नव्हते. टाळ्यांची वाक्यं नव्हती. आवेश नव्हता. आग्रह नव्हता. तात्यारावांच्या एक-दोन आठवणी त्यानं सांगितल्या. शाळेतल्या. तात्याराव नेहमी पहिले यायचे. हा शेवटला. आणि तरीही त्यांची चांगली दोस्ती होती. आपल्या पुढाऱ्यांची गुंडांशी असते तशी किंवा व्हिस्कीची सोडा-वॉटरशी असते तशी. असं साधं नि खुसखुशीत बोलला तो बडा अधिकारी. संपविलं ते सुद्धा विनयानं. असं– "हे आय. सी. एस.ला बसले नाहीत हे एक प्रकारे माझ्यावर उपकारच आहेत. म्हणून तर आमचा नंबर लागला. योगायोग सुद्धा काय बघा ! बुद्धीनं, चारित्र्यानं, कर्तृत्वानं देखील माझ्याहून हा माणूस खूप मोठा आणि त्याचा सत्कार माझ्या हातून होतोय. दुःख इतकंच की ही गंमत बघायला खुद्द तात्यारावच हयात नाहीत."

मग तात्यारावांचे सुपुत्र चेतन विजयकर उभे राहिले. सरकारच्या हौशी नाटक मंडळांच्या नाट्य-स्पर्धात हा गृहस्थ पडत नाही म्हणून. नाहीतर उत्कृष्ट अभिनयाचे पारितोषिक नक्कीच मिळालं असतं.

वडिलांना मिळालेला पुरस्कार स्वतः स्वीकारताना यानं काय मस्त नाटक केलं. उजवा हात बँडेजमध्ये. गळ्यात अडकवलेला. तेव्हा दोन्ही हातांनी नमस्कार करणं चेतनला शक्य नव्हतं. डावा हात उंच करुन मान वाकवीत त्यानं सभागृहाला अभिवादन केलं. जाड, दाटलेल्या स्वरात सांगितलं, "सॉरी ! आमच्या तात्यांबद्दल काय नि किती बोलू असं झालंय मला. पण दुर्दैवानं हे असं (बँडेजकडे बघत) झालं. तरुण नि कर्तबगार सरकारी अधिकाऱ्यांचा नक्षलवादी बळीच घेणार असले तर ठीक आहे. देशासाठी मरायलाच हवं. अधिक बोलायचं नाही, अशी डॉक्टरांची सक्त ताकीद आहे. तात्यांच्या या सत्काराला स्वतः ते नाहीतच. मीसुद्धा राहिलो नसतो, पण आमच्या महाराजांच्या कृपेनं जिवावरचं अरिष्ट टळलं. मी जिवंत राहिलो. या समारंभाला हजर राहू शकलो. तात्यांच्या वतीने तुमचे आभार मानायला. जयहिंद !"

चेतनच्या भाषणाला श्रोत्यांनी शिष्टाचार विसरुन टाळ्या वाजविल्या.

अध्यक्ष उठले. हातात चिठ्ठी वाचत म्हणाले, "वक्त्यांच्या यादीत यांचं नाव नाही. तरीसुद्धा 'जनमता'च्या सध्याच्या संपादकांनी विनंती केल्यामुळे सभागृहाची क्षमा मागून त्यांना मी बोलण्याची परवानगी देतो. श्री. रवींद्र भांडारकर. . . ."

आणि मी उभा राहिलो. शेजारी मिरा बसली होती. माझ्याकडे बघून तोंडभर हसली. मला धीर देण्यासाठी. लटपटत्या पायांनी मी व्यासपीठावर गेलो. तोंडासमोर माईक ओढताना माझा हात कापत होता. समोर श्रोत्यांकडे बघायची तर छातीच नव्हती. आयुष्यात प्रथमच मी सभेपुढं बोलत होतो.

काही क्षण तोंडच उघडेना आणि उघडलं तेव्हा माझाच आवाज मला ओळखीचा वाटेना. काय बोलत होतो, माझं मलाच कळत नव्हतं. मी बोलतच नव्हतो जसा. कोणीतरी मला बोलवीत होतं. माझ्या तोंडानं बोलत होतं . . . . . .

"अध्यक्षमहाराज. आणि बंधुभगिनींनो,

"जाहीर सभेत बोलण्याचा माझा हा पहिलाच प्रसंग. तो शेवटचाच ठरावा अशी ईश्वराजवळ मी प्रार्थना करतो.

"'जनमत'कार कै. तात्याराव विजयकरांच्या कार्याचा गौरव तुमच्या रोटरी क्लबनं केला. हा पुरस्कार देऊन. तात्यारावांच्या आयुष्यात, आता मरणोत्तरच, ही मोठी विनोदी घटना घडत आहे. म्हटली तर शोकांतिका. कारण आज या कार्य-क्रमाला उपस्थित असलेल्या या सन्मान्य, थोर, प्रतिष्ठित नागरिकां-बद्दल तात्यारावांच्या अंतःकरणात प्रेम नव्हतं, आपुलकी नव्हती. वास्तविक स्वतः ते, माझ्या माहितीप्रमाणे, तुमच्यातलेच. तरीही तुमच्या ते विरुद्ध होते, तुमच्याबद्दल त्यांचे काय ग्रह होते, अनुभव

होते, विचार होते, तुम्हाला माहीत आहेतच. त्यांचा हा भ्रम तुम्ही दूर केलात. त्यांच्या कार्याचा गौरव करून पुरस्काराचा हा मला जंगी बार उडवून. खरोखरच हे बघायला तात्याराव आज इथं आपल्यात हवे होते. पण कदाचित मग हा प्रसंगच आला नसता. कित्येक मोठ्या माणसांचे महत्त्व त्यांच्या निधना-नंतरच कळतं. तरीही ते समजून घेण्यात तुम्हीच आघाडी मारली आहे. धन्यवाद!

"मित्रहो, तात्याराव म्हणत, समाजाच्या या गाड्याला तीनच चाकं असतात. पांगुळ-गाड्यासारखी. पुढल्या पहिल्या चाकाचा तावा देवाकडे. गांधींच्या हत्येनंतर देवानं आपल्या या समाजाला वाऱ्यावर सोडून दिलंय, असं ते म्हणत. दुसरं पुढाऱ्यांचं. या बाबतीत तात्यारावांचं भाष्य मी सांगत नाही. गरजही नाही. आपण प्रत्यक्षच अनुभवतो आहोत की हे चाक पार खिळखिळं झालंय. उरलं आता तिसरं चाक. तात्या म्हणत, ते आपलं आहे. जनतेचं आहे. याच्यावर तावा आपला, लोकांचा आणि एक त्याच्याच जोरावर समाजाचा हा गाडा आपल्याला पुढं न्यायचा आहे. देवाचं प्रेम पुन्हा मिळवायचं आहे. आपल्या पुढाऱ्यांना ताळ्यावर आणायचं आहे.

"विचारे तात्याराव! जनतेवर त्यांची भारी श्रद्धा. माणसाच्या माणुसकीवर नितान्त भक्ती. ते म्हणत, जोपर्यंत माणसात माणुसकी आहे तोपर्यंत विष्णुमहाराजांना क्षीरसागरात शेषा-वर खुशाल कसरत करीत राहू दे! नुकसान नाही. जग चालणारच, थांबणार नाही. कारण माणूस हे देवाचंच सूक्ष्म स्वरुप आहे आणि म्हणून आपण जनताच देवासमान आहोत. होय! तुम्ही लोकच त्यांना देवाच्या ठिकाणी होता. आणि म्हणूनच आज मी तुमच्यापुढं उभा आहे. तात्यारावांचं हे पत्र घेऊन माणुसकीला—तुमच्यातील माणुसकीला मी आवाहन करणार आहे. तुमच्याकडे मी न्याय मागणार आहे. तुम्हीच द्या तो. मला कोर्टात जायचे नाही. माझं कोर्ट तुम्ही. हे सभागृह. बाहेरची जनता......"

तात्यारावांचं पत्र मी खिशातून काढलं. वाचू लागलो—

"बेटा,

खात्री आहे, तू तरी मला दोष देणार नाहीस. पत्रकाराचं आयुष्य मेणबत्तीसारखं. स्वत: जळून जगाला प्रकाश देणं हे त्याचं जीवनकार्य. निदान मी तरी तसं समजतो. वात संपली की नुसतं मेण उजेड देऊ शकत नाही. तत्त्वशून्य पत्रकारसुद्धा असाच......."

मी वाचत होतो. टाचणी पडली तरी आवाज झाला असता अशी भयाण शांतता सभागृहात होती. वादळापूर्वीची की नंतरची? आता कळणार होतं.

" ........पालेकर जागचा हल्ला नाही. तसाच उभा राहिलो. सिगरेटची राख बोटानं त्यानं टेबलावर झाडली, मग सावकाश बोलला, ' मुद्दाम आलो न्यूज घेऊन. म्हटलं आधी तुम्हाला सांगावी. हलकट मी नाही. तात्याराव. मुक्या पोरीवर बलात्कार करणारा माणूस हलकट, पाजी वगैरे आणि हा तुमच्या चांगल्याच परिचयाचा आहे. नाव मी सांगू?" ह्याला डिवचलं, "मांडारकर असेल!" तो नुसताच हसत सुटला. पंढरपुराच्या विठ्ठलासारखा. कमरेवर हात घेऊन मग त्यानं सांगितलं, "मांडारकर? छेट! तो तर साला बावळट नंबर एक. हा आहे माझा दोस्त आणि बरकां तुमचा चिरंजीव, चेतन विजयकर, आय्. ए. एस."

" ......ते सत्य होतं. विकट, विदारक, नग्न. पालेकरचा चेहराच सांगत होता. अधिक पुराव्याची मला गरज नव्हती..."

मी वाचत होतो.

आजुबाजूला लक्ष नव्हतं. चेतन खुर्चीवरचा उठून कधी माझ्या अंगावर धावला. मला कळलंच नाही. संतापाच्या भरात दुखावलेल्या हाताचा त्याला विसर पडला असावा. गळ्यातील उजवा हात झटक्यानं त्यानं मोकळा केला. माझ्यावर त्वेषानं तो गुद्दे हाणू लागला. ओरडू लागला, " यू चीट, रास्कल! मांचोद. आय विल किल यू-मुडदाच पाडतो."

व्यासपीठावरच दोघाचौघांनी त्याला आवरला. बाजूला केला.



अध्यक्षांनीही चांगली समज दिली असावी. नाहीतरी शिस्तीची माणसं ही. सगळं कसं शिस्तीत व्हायला हवं असतं ह्यांना. कोणाचा जीव घ्यायचा असला तरी व्यवस्थित. प्रत्यक्ष आपण गुंतणार नाही ही खबरदारी घेऊन. असं चारचौघांत मवाल्यासारखी मारामारी करणे त्यांच्या शिस्तीच्या विरुद्ध होतं. नावालाही शोभणारं नव्हतं.

पहिल्या रांगेत नाथ पालेकर उभा राहून कोकलत होता, "पकडा भडव्याला! नक्षलवादी डाव खेळतो लेकाचा. फॉर्जरी करतो."

आणि मिरा उभी राहिली. आवाज चढवून बोलली, "मी मिरा विजयकर. तात्यारावांची मुलगी आणि ह्या चेतनची बहीण. मी सांगते पत्र तात्यांचंच आहे. त्यांनीच हे माझ्या टेबलावर ठेवलं होतं--आणि मी भांडारकरना दिलं."

मागं काही लोकांनी गिल्ला केला, "फॉर्जरी असली तर कोर्टात जा. पण आधी भांडारकरना बोलू द्या." हे मुद्दा शिस्तीला सोडूनच होतं. इतकी बडी माणसं आपल्या कळपाचे आचार कसे काय धुडकावीत होते देव जाणे!

अध्यक्षांनी माझ्याकडे वळून म्हटलं, "बोला पुढं."

आणि मी माझं भाषण पुढं चालू केलं....." .... बंधुभगिनींनो -- होय, मला कळतं. तुम्ही बडी लोकं. तुमचा माऊ व्हायची माझी काय लायकी? लहान तोंडी मोठा घास गेला. क्षमा करा! अधिक काय बोलायचं! तात्यारावांचं हे पत्र -- त्यांचे शब्द माझ्या तोंडून तुम्ही ऐकले. पत्र खोटं असल्यास जरूर कोर्टात जा. फोर्जरीबद्दल केस करायला तुम्ही मोकळे आहात. बलात्काराची तक्रार मी मात्र कोर्टात नेणार नाही. अण्णाजी रेड्डीकरांनी न्यायला हवी होती. पण गृहस्थ माझ्याहूनही सामान्य आहे. म्हणतो दोस्ताच्या लेकाचं वाटोळं करणार नाही. मग नारायणानं माझं काही केलं तरी चालेल. ह्यांचा नारायण तरी दुसरं काय करणार आहे आपल्या या माबड्या जिवापेक्षा माणुसकी जपणाऱ्या भक्ताचं. त्यानं बुद्धी दिली म्हाताऱ्याला, आपणहून पोलिसांच्या स्वाधीन व्हायची. त्यांना वाटत होतं रैनावर झालेल्या बलात्काराचा बदला म्हणून राजनारायणानं आपल्या या चेतनसाहेबांवर हल्ला केला असेल. एकेकाळचा नक्षलवादी हा. आपल्या सहवासानं कितीही बदलला तरी साफ अहिंसक झाला नाही याचंच ह्यांना दुःख झालं होतं. तर आजच्या वर्तमानपत्रात नक्षलवाद्यांच्या कटाची ही बातमी वाचली त्या अण्णाजींनी. आपण नि ही पोर रैनासुद्धा या भयंकर कटात नक्षलवाद्यांचे हस्तक आहोत हे त्यांना कळलं. मग त्यांना रहावलं नाही. त्यांना वाटलं असावं, नारायणा आता या जगण्यात बिल्कुल अर्थ राहिला नाही रे! त्यापेक्षा सरळ फासावर गेलेलं बरं! आणि म्हातारा पोलिसांकडे धावला. बरोबर या पोरीला घेऊन."






"मरू देत ! ज्याला स्वतःचं सरळ साधं हित कळत नाही, दोस्ताच्या पोराची मान सोडवण्यासाठी आपली आणि या पोरीची मान फुकट फासात अडकवण्यास जो तयार होतो तो मेला म्हणून तुमच्यासारखंच मलामुद्धा दुःख होणार नाही. अशी माणसं मरणारच. गुन्हेगार म्हणून मरणार. गुन्हा कसला? तर हा. माणुसकीपायी एक भयंकर गुन्हा उजेडात येऊ न देण्याचा. एका अर्थी हस्तकच आहेत ते. कटातील. एका बड्या सरकारी अधिकाऱ्याला बलात्काराच्या गुन्ह्यातून वाचवण्यासाठी चाललाय त्या. पिसाळलाय म्हणावं आणि खुशाल कुत्र्याला गोळी घालावी. तसंच एखाद्या माणसाला नक्षलवादी म्हणावं आणि आज वेलाशक निकाल लावावा. कोणी काही बोलणार नाही. उलट कौतुक करतील, धन्यवाद देतील !"

"मित्रहो, मला दुःख नाही. अण्णाजी रेड्डीकर मेल्याचं दुःख नाही. आपले चेतन विजयकर वाचल्याचाही आनंद नाही. दोघांचं काहीही झालं तरी मला सुखदुःख नाही. मी पत्रकार आहे. गुन्ह्याला वाचा फोडणं हे माझं काम. अन्यायाला विरोध करणं हे कार्य. एका असहाय, दुबळ्या, अजाण जीवाचा मधल्यामध्ये बळी जातोय, तो रोखणं हे माझं कर्तव्य आहे. कोर्टात जायला हा माझा वैयक्तिक प्रश्न नाही. तो सामाजिक आहे. सार्वजनिक आहे. तुम्ही आम्ही सगळेच आपापल्या परीनं या गुन्ह्याला जबाबदार आहोत. म्हणून आपला आपणच न्याय करायचा आहे. तिच्यावर–रैनावर–एका मुक्या नि बहिऱ्या मुलीवर झालेला अत्याचार मी तुमच्यापुढं मांडला आहे. तुम्हीच निर्णय घ्यायचा आहे. आज घ्या, उद्या घ्या–जन्मात कधीमुद्धा घ्या. माझ्या नि तुमच्यासुद्धा. ही पोर जन्माची दुबळी नि पंगू होऊन पडलीय. ठाऊक आहे का ? कारण वेडीनं प्रतिकार केला. आपल्या देहावर होणारा सुरीहल्ल्यापेक्षाही हिंस्र असा हा हल्ला परतण्याचा प्राणपणानं प्रयत्न केला. हिच्या रक्षणाला कोणी महाराज धावला नाही. शुद्ध असे तोपर्यंत हा अत्याचार तिनं थोपवला. बळजबरीला शरीर भोगू दिलं नाही. आणि हिची शुद्धच गेली. मग जो प्रकार झाला तो बघून बिचाऱ्या देवाचीही झोप उडाली. त्यानं हिला वाचा दिली. जन्मभर आमच्यापुढं आमच्या नावानं ओरडायला, बोंब मारायला. ही अशी–लोकहो, तुमच्या या दुर्दैवी बहिणीला न्याय द्या–"

मी थांबलो. व्यासपीठावरून उडी टाकली. सभागृहातून तडक बाहेर पडलो. मोटारीत जाऊन बसलो.

ड्रायव्हर डेव्हिड सभागृहाच्या दारात उभा राहून ऐकत होता वाटतं. तो मागोमाग धावला. मिरासुद्धा सभा अर्धवट टाकून इतक्यात आली होती.

डेव्हिड गाडी चालू करीत बोलला, "साहेब तुम्ही ग्रेट आहात."

'जनमता'च्या इमारतीच्या फाटकावर गाडी उभी राहिली आणि मिराला मी म्हटलं, "तुम्ही जा आता. रात्री काय होईल मला सांगता येत नाही."

"म्हणजे ?"

"बहुतेक मोर्चा येईलच. उद्याचा अंक बाहेर पडू नये म्हणून प्रयत्न होतील. आपल्या इमारतीत घुसून लोकं दंगल करतील. कदाचित माझा जीवही घेतील–सांगता येत नाही. स्वस्थ बसायला ही लोकं दरिद्री नाहीत." मी सांगितलं.

"आणि ही गंमत टाकून घरी झोप काढू मी ?" मिरानं यत्नेनं विचारलं, "आय मस्ट बी हीअर."

"अहो गंमत नाही. जिवावरचा खेळ आहे."

"असू दे ! इतके दिवस खेळतेय. आजही खेळेन." तिनं म्हटलं.

संपादकीय खात्यातील नोकरवर्गाला आणि कंपोजिंग नि प्रिंटिंग खात्यातील कामगारांना एकूण परिस्थितीचा मी अंदाज दिला. त्यांना सांगितलं की काही झालं तरी उद्याचा अंक निघालाच पाहिजे. जमावाच्या दबावाला तात्यारावांनी आयुष्यात कधी भीक घातली नाही. अशा प्रसंगी जीवाची बाजी लावून तोंड दिलं. तात्याराव आज देहानं आपल्यात नाहीत. पण–

कामगारांना अधिक सांगायचं कारणच नव्हतं. एकसाथ त्यांचा आवाज उठला, "साहेब, आम्ही गांडू नाही."

आता इतर वृत्तपत्रांचे बातमीदार जागे झाले. फोनवर एकेएक साला डोकं खाऊ लागला. ह्यांना तपशीलवार सगळी माहिती हवी होती.

मी म्हटलं, "लेको, उद्याचा अंक वाचा. अथपासून इतिपर्यंत तुम्हाला हवं ते आणि नको असलेलं सर्व काही मिळेल."

ते शिव्या देऊ लागले, "साल्या, तोवर आम्ही काय झोपून रहावं. चालबाजी नको. अजीर्ण करून घेतलंयस. थोडंतरी बाहेर ओक."

मी ह्यांना सांगितलं, "खरोखरच, बोलायलामुद्धा वेळ नाही रे ! तोच रिपोर्ट चाललाय. हवं असल्यास मी काय लिहिलंय ते वाचायला सांगतो कुणाला तरी."

"ओ. के." ते कबूल होत.

मिरा समोर बसली होती. तिलाच मी फोनवर वाचायला सांगितलं.

कंपोजिंग खात्यानं मग विलक्षण जोर मारला. बारालाच सगळी 'मॅटर' कंपोज होऊन तयार झाली. गॅल्या वाचायलाच त्या मानानं आम्हांला उशीर लागला. आज ती लोकं आम्हाला हसत होती. नेहमी बरोबर उलट प्रकार असायचा.

चारी पानं बांधून तयार होती. प्रुफं तपासून फॉर्मं मशीनवर टाकायच्या आम्ही घाईत होतो. वृत्तसंपादक जोशीचं आता जोरानं तोंड वाजू लागलं होतं. मुहूर्तासाठी भटाची घाई चालली होती.

इतक्यात रस्त्यावर कुत्र्यांनी केकाटत गळा काढला. साडेबाराच्या नीरव शांततेत हे केकाटणं कापत गेलं. कुत्र्यांचं कोकलणं कमी होण्याऐवजी वाढूच लागलं. मग दूर 'ऑपेरा हाऊस'च्या बाजूनं लोकांच्या गलबल्याचा सांडता आवाज गजगजू लागला.

अनुक्रमणिका

जोशी ओरडला, "साहेब, तोच – मोर्चा !"

ह्याला हृदयाचा विकार होता. खिशातून कसलीशी गोळी काढून त्यानं तोंडात टाकली. वर घटाघट पाणी प्याला. छाती चोळत हा खुर्चीवर बसला. टेबलावर डोकं टेकून.

त्याच्याकडे लक्ष द्यायला आता कोणाचंच चित्त ताळ्यावर राहिलं नव्हतं. बाजूंच्या खिडक्यात उभे राहून सगळे रस्त्याकडे डोळे लावून होते.

गलका जवळ येऊ लागला. मशालींच्या उजेडात जमाव स्पष्ट दिसू लागला. तशी खूप माणसं नव्हती. दोनतीनशेपर्यंत भरतील. भाडोत्री झाले तरी रात्रीबेरात्री कितीसे मिळणार ? आरडाओरडा वाढत होता. 'जनमता'च्या इमारतीशी जमाव थांबला. घोषणांचा एकच दणका सुरू झाला :–

"एक दो, एक दो – मांडारकरको फेक दो."

"मांडारकर कौन है, नक्षलवादींका कुत्ता है."

"सगळे आम्ही एकसाथ, ह्या कुत्र्याला मारू लाथ.". . . .

कुंपणावरून उड्या टाकून लोकं आवारात शिरली. दिसेल त्याची मोडतोड करीत सुटली. फाटकावरचे मोठे दिवे, 'जनमता'ची पाटी, फुलझाडं, कुंड्या वगैरे. प्रवेशदार वंदच होतं. जाड नि पक्कं लोखंडी काम. ह्यांनी डोकं आपटून प्राण दिला असता तरी उघडता येणं शक्य नव्हतं. तेव्हा जमाव येथंच थांबला, रेंगाळला. आणि मग इमारतीच्या चारी बाजूंनी पांगला. दगडफेक सुरू झाली. ॲसिड बल्ब नि कागदाचे पेटते गोळे खिडक्यांतून आत पडू लागले. घोषणा चालल्याच होत्या; "सगळे आम्ही एकसाथ, ह्या कुत्र्याला मारू लाथ. . . " वगैरे.

मग पाठीमागच्या लोखंडी शटरकडे जमावाचं लक्ष गेलं. हर्षानं त्यांनी एकच कालवा केला. जाडजूड पहारी घेऊन ते या दारावर तुटून पडले. तसा दरवाजा भक्कम होता. पण जमावाच्या उद्रेकापुढं किती वेळ टिकाव धरणार ?

एकदीडचा सुमार. आणि इतक्या अपरात्री मला फोन आला. मी फोन उचलला.

"हॅलो, मांडारकर–"

आवाजावरून ओळखलं की पालेकराचे हे दिल्लीकर बडे साहेब.

संतापापेक्षा उद्वेगानंच मी बोललो, "साहेब, फायलीची काळजी करू नका. तासाभरात उभ्या बिल्डिंगबरोबरच ही फाईलसुद्धा जळून खाक होईल."

"व्हाट यू मीन ! गैरसमज झालाय मांडारकर तुमचा. फायलीची काळजी नाही मला. तुमच्या हातात ती सेफ आहे. तात्यारावांकडे होती तशीच. तेच सांगणार होतो. तर तुम्ही सांगता–" साहेब म्हणाले.

मी म्हटलं, "थँक यू ! अधिक बोलायला वेळ नाही साहेब. तुमचे मोर्चेवाले कोणत्याही क्षणी इमारतीत घुसतील. आय मस्ट स्टॉप देम. ह्यांना मी अडवणार. निदान उद्याचा अंक मशीनबाहेर पडेपर्यंत. जगलोवाचलो तर बोलू पुन्हा ! अच्छा !"

"अच्छा ! बायबाय ! डोन्ट वरी –"

आणि आता बाजूला रोटरी सुरू झाली. थंड गुस्कारे टाकीत ते अवाढव्य यंत्र झपाट्यानं गती घेऊ लागलं. 'धडाड् धड्, धडाड् धड्' आवाज घुमू लागला. पिळवटून, तळतळाटून. जमीन हादरू लागली. भिंती थरथरू लागल्या. वातावरण तापू लागलं.

आणि . . . आणि आता यंत्राच्या तोंडातून 'जनमता'चे अंक झपाझप एकएक बाहेर पडू लागला. तालात, ओळीनं, क्रमानं. काळ्याभोर जाड अक्षरात फक्त वरची हेडलाईनच पुढं आणि पुढं सरकत चालली होती–

**"लोकहो, या दरिद्री बहिणीला न्याय द्या"**
**"लोकहो, या दरिद्री बहिणीला न्याय द्या"**
**"लोकहो, या दरिद्री बहिणीला न्याय द्या"**
**"लोकहो, या दरिद्री बहिणीला न्याय द्या"**

ही. . .ही ढगावर ढग आदळून विजलीची पिल्लं वळवळत नि घसटत पुढं जात होती.

तिकडेच देहभान विसरून मी बघत उभा होतो. बाहेरचा प्रक्षुब्ध जमाव विसरलो. त्याच्याशी दोन हात करण्यासाठी दाराशी सज्ज असलेल्या माझ्या कामगारबंधूंना विसरलो–

मागं केव्हढ्यानं आवाज झाला.

जमावानं लोखंडी शटर मोडून खाली पाडलं होतं.

"खबरदार ! माझ्या देहावरूनच पुढं जावं लागेल."

मिराचा तो झपाटलेला, पिसाळलेला स्वर ऐकला मात्र आणि मी दाराकडे धावलो.

तात्यारावांची लेक झाशीच्या राणीच्या आवेशात मधोमध दाराबर उभी होती. नजरेनं आग ओकत. विजलीची.

जमाव मागं हटला. भयचकित झाला. प्रकाशाच्या उंबऱ्यावर उभ्या असलेल्या या रणमर्दानीला बघूनच.

आणि बाहेर काळोखात पोलिसांच्या शिट्या वाजू लागल्या. निळी निळी माणसं आवारात भरू लागली होती. भरभरून राहिली होती.

माझ्या डोळ्यापुढं मात्र ढगावर ढग आदळत होते. विजलीची पिल्लं वळवळत होती – "लोकहो, या दरिद्री बहिणीला न्याय द्या!"

**"लोकहो, या . . . . . . . . "**
**" . . . . . . .दरिद्री बहिणीला . . . . "**
**" . . . . . . . . . . . . . . न्याय द्या !"**

★ ★ ★








**सुरेश वेंगुर्लेकर**

गावात देवघरांचा वाडा सर्वात मोठा. चौसोफी. वाड्यासमोर ऐसपैस अंगण. अंगणातल्या चार पायऱ्या चढून गेल्यावर घराची ओटी. नि ओटीवर पितळी कड्यांचा मला मोठा झोपाळा.

नाना या घरातले कर्ते पुरुष. ओटी-वरचा झोपाळा थांबलेला असतो तेव्हा समजायचे नाना घरात नाहीत. नाना घरात असतात तेव्हा ते या झोपाळ्यावर असतात. झोपाळा विशिष्ट लयीत हालत असतो. त्याच लयीत होणारा झोपाळ्याच्या पितळी कड्यांचा आवाज सगळ्या घराला नानांच्या अस्तित्वाची जाग देत रहातो.

नानांना काही हवे—नको दुर्गी पहाते. दुर्गी या घराची आश्रित. आता ती सोळा-सतरा वर्षाची झालीय्. पण बाजाराला गेलेल्या नानांच्या मागून पहिल्यांदा ती या वाड्यात आली तेव्हा दहा-अकरा वर्षांची होती.

सगळ्या घराला नानांचा धाक होता. मात्र दुर्गीला नानांना कधी धाक दाखवावा लागत नाही. नाना दुर्गीला हाक मारतात. बहुधा हाक मारल्यावर काम सांगण्याचीही वेळ येत नाही. नानांनी केव्हा कशासाठी हाक मारली ते दुर्गीला कळते. कामासाठी दुर्गीला हाक मारायची वेळही नानांना फारच थोड्यांदा येते.

दुर्गीने नानांच्या कामाला सुरवात केली तीच मुळी नानांनी न सांगता. शेजा-रच्या गावी आठवड्याचा बाजार भरे. मिरच्यांचा बाजार भरला होता तिथेच पलिकडे एका झाडाच्या बुंध्याशी दुर्गी बसली होती. नाना टाचांवर बसून भाव करीत होते. मिरच्यांच्या जवळिकीने त्यांच्या नाकाच्या हाडात बारीक कळ उठली.. बघता बघता ते धाडधाड शिंकू लागले. . .

झाडाच्या बुंध्यातले दुर्गीचे नानांकडे लक्ष गेले. थोडा वेळ ती नानांकडे पहात राहिली. मग उठून उभी राहिली. नानांचा मिरचीवाल्याशी व्यवहार आटोपला तशी सरळ पुढे झाली. मिरच्यांचे ओझे डोक्या-वर उचलून घेऊन उभी राहिली.

नानांनी दुर्गीकडे पाहिले. ओझ्या-खालच्या डोळ्यांतून तीही नानांकडे फक्त पहात होती. नानांनी तिच्या नजरेत काय पाहिले कोण जाणे. तिला ओझे घेऊ नको म्हणणे त्यांना झाले नाही. काही न बोलता ते पुढे चालू लागले. दुर्गी त्यांच्या मागे पावले टाकत निघाली.

नानांना वाटले होते मोटार स्टँडपर्यंत



अनुक्रमणिका

***...'दीपावली'तूनच मोजके दर्जेदार लेखन करणारे म्हणून ज्यांच्याबद्दल अभिमानाने म्हणता येईल त्या श्री. सुरेश वैंगुर्लेकर यांची ही एक नवीन कथा...गेल्या वर्षी 'दीपावली'च्या दिवाळी अंकातील 'लेणं' ही त्यांची कथा सर्वोत्कृष्ट होती असे अनेक रसिकांनी बोलून दाखविले... या अंकातील त्यांची 'दुर्गी' त्याच तोडीची वाटावी...***

ही ओझे वहाणार असेल. पण स्टँडवर आली तशी झाडाखाली उभ्या असलेल्या मोटारीत ती नानांच्या पुढे चढली. मागच्या शीटखाली मिरच्यांचे ओझे सरकवून सरळ खिडकीतून बाहेर पहात शीटवर बसली.

मोटारीत चढताना नानांनी एकदा तिच्याकडे पाहिले. मग सरळ फरंट सीटवर जाऊन बसले. कंडक्टर आला. नानांनी आपल्याबरोबर दुर्गीचेही तिकीट काढले. नानांच्या मागोमाग दुर्गी अशी वाड्यात आली. अंगणातल्या पायऱ्या चढून ओटीवर तिने डोईवरचे ओझे उतरले. मग तिथेच खांबाचा आधार घेऊन धाप लागल्या उराने ती उभी राहिली.

मथुआक्काने आणून दिलेल्या पाण्याने नानांनी फणसाच्या मुळात पाय धुतले. पाण्याचे भांडे मथुअक्काच्या हाती परत दिले. झोपाळ्यावर पंचा ठेवला होता त्याने हात–पाय कोरडे करत ते झोपाळ्यावर टेकले. जमिनीला पायाचा रेटा देऊन ते झोपाळ्याला गती देणार होते . . तेवढ्यात त्यांचे दुर्गीकडे लक्ष गेले.

मथुअक्काही आत जायचे सोडून दारातल्या काचेच्या नळ्यांच्या तोरणाला धरून दुर्गीकडे पहात थांबली होती.

नाना उठले. दुर्गीसमोर त्यांनी एक नाणे धरले. दुर्गीने मान हालवली. मथुअक्काच्या कपाळावर आठी उमटली. नानांनी आणखी एक नाणे पहिल्या नाण्याच्या जोडीने दुर्गीसमोर धरले. दुर्गीने पुनः मान हालवली. आता मात्र मथुअक्काला रहावले नाही. म्हणाली–,

"गो बाई . . . म्हंजे रुपये हवेत काय हिला ?" यावरही दुर्गीने मान हालवली.

नानांनी दुर्गीकडे नीट पाहिले. मग म्हणाले,

"अक्का, भूक लागलीये तिला. तिच्या पोटाला काही घाल."

मथुअक्काच्या कपाळावर आठ्यांचे जाळे झाले. नानांच्या नजरेतून ते सुटले नाही. म्हणाले, "तू घालणारेस–का घरात सांगू आणखी कुणाला . . ?"

"घालते हो. तू मालक घराचा. मालकानेच घाल म्हटल्यावर मी कोण नको म्हणणारी ?"

"नको म्हणू नकोस नि घालणार तेही धसक फसक करीत घालू नकोस."

नानांच्या शब्दांची धार मथुअक्काने ओळखली. घरात वळत ती दुर्गीला म्हणाली–,

"ये गो . ."

पण मथुअक्काच्या मागनं जाण्यासाठी दुर्गीने पाऊल सुद्धा उचलण्याआधी पुनः मथुअक्का म्हणाली,

"ये म्हटल्यावर येशील हो सरळ माझ्या मागनं. तशी त्या बाजूनं मागल्या दाराशी ये . . पण नको, नको. थांब तिकडूनही नको. तिकडे गुरांचा गोठा आहे. जनावरं गोठ्यातली बुजतील तुला बघून . ."

एकदम झोपाळ्याची गती थांबवून नाना ताड्कन् खाली उतरले. दाराशी जाऊन ओरडून म्हणाले–,

"अहो ऽऽ तांब्याभर पाणी घेऊन बाहेर या जरा."

सीताबाई पाण्याचा तांब्या घेऊन बाहेर आल्या. दुर्गीला नाना म्हणाले–

"जा ग पोरी, त्या फणसाखाली हात–पाय खसाखसा धू . . नि यांच्यामागून आत जा."

दुर्गीने सीताबाईंच्या हातून पाण्याचा तांब्या घेतला . . नि ती फणसाखाली गेली. मथुअक्का केव्हाच घरात आड झाली होती.

दुर्गी फणसाखाली हात पाय धूत होती . . तिच्याकडे पहात सीताबाईंना विचारले–,

"कोण हो ही मुलगी"

नाना म्हणाले–,

"आम्हाला तरी कोठे ठाऊक आहे ? मागून आलीय. भुकेली आहे एवढे ओळखलेय. जेवू घाला तिला. मग तुम्हीच तिची सगळी चौकशी करून सांगा आम्हाला."

दुर्गी हातपाय धुवून आली. सीताबाई म्हणाल्या,

"चल आत."

सीताबाईंच्या मागे दुर्गी घरात गेली.

रात्रीचं जेवण आटोपून नाना अंथरुणावर पडले होते. पोटातलं अन्न जड्शील झालं होतं. डोळ्यांवर हळू हळू माया पसरत होती. पापण्या अधून मधून मिटत होत्या तेव्हा नजर त्यांची आढ्याला होती. जवळच समई होती. समईच्या उजेडात सहाणेवर सीताबाई वाती वळत होत्या. वाती वळता वळता नानांशी बोलत होत्या . .

"झोप लागल्ये का ?"

"अं ?"

"झोप लागल्ये का म्हणाले . ."

"का ?"

"त्या मुलीची चौकशी करायला सांगितली होतीत ना ?"

"केलीत ?"

"मला बाई भीती वाटत्ये."

"कशाची ?"

"काहीच्या बाहीच ऐकलं त्या मुलीकडून."

"काय ऐकलंत ?"

"बाप तिचा चांगला माणूस नाहीये."

"बाप आहे ?"

"नुसता आहे नाही, अगोचर आहे."

"म्हणजे काय करतो ?"

"स्मशानं धुंडतो."

"काय ?"

"होय. मेल्या माणसांच्या कवटया हाडं घरी आणतो.'

"आणि ?'

"लोक त्याच्याकडे वाईटसाईट कामांसाठी येतात म्हणे–"

नानांच्या डोळ्यावरची झापड पार नाहीशी झाली होती. क्षणभर कुणीच काही बोलले नाही. मग नाना म्हणाले–,

"अघोरी विद्या जाणणारी असतात काही माणसे. मुलीला आई– ?"

"आई नाहीये विचारीला. नि बाप हा असला.. भयानक माणूस."

"बाजाराला कशाला आली होती ?"

"बापानेच आणून सोडली. त्याला नको झाली. आईला तिच्या खूप मारायचा म्हणे. एकदा आई घरातनं गेली ती परत आलीच नाही. पोरीने परत परत विचारलेन.. तर एक दिवस एक कवटी घेऊन आला.. नि म्हणाला ही आई तुझी... तेव्हापास्ने पोर घराला भ्यायचीच. तशात याने त्या दिवशी बाजाराला आणून सोडली. आपल्या मागनं आलीस तर नदीत बुडवून टाकेन म्हणाला. कुणाच्याही मागनं जा म्हणाला."

"अस्सं, म्हणून ही पोर आमच्या मागनं आली."

"आम्हाला भीती वाटते.."

"कशाची? जादूटोणा पोरीच्या बापाला येतो. तसा पोरीला नाही ना येत ?

"ते विचारले नाही तिला.."

"विचारायला कशास हवे ? असली अघोरी विद्या जाणणाऱ्या माणसांची नजरच निराळी. हिची नजर तसली नाही. केसांच्या तिच्या जटा झाल्यात त्यावर जाऊ नका. स्वच्छ पाण्यासारखी नजर आहे तिची. स्वच्छ पाण्यात तळापर्यंतचे सगळे दिसते.. तसे मनातले सगळे डोळ्यात दिसते तिच्या. ब्राह्मणाचे घर आहे हे. संस्कार आपोआप होतील तिच्यावर. तुम्ही तेवढं तिला स्वच्छ रहायला शिकवा. एकदा डोक्यावरून नहाली नि तुमचे एखादे जुनेर नेसली... की तुम्हाला सुद्धा आवडू लागेल मुलगी."

"अहो पण मथुअक्कांचे.."

"लक्ष देऊ नका. आमच्या स्वतःच्या कामाकडे पहायला आम्ही मुलीला ठेवून घेतलंय म्हणून सांगा. तिच्या सोवळ्या–ओवळ्यात मुलगी कोठे कडमडणार नाही एवढे पहा. आणि आता फार काळज्या करू नका. समईतली वात लहान करून आता जरा अंग टाका."

आणि नानांनी पायावरची रजई अंगावर ओढून घेतली.

सीताबाईंनी समईतली वात बारीक केली. पण त्या लगेच निजल्या नाहीत. निजण्याआधी त्यांनी वाडग्यात थोडी शिकेकाई भिजत घातली.




दुसऱ्या दिवशी मथुअक्काच्या कितीतरी आधी सीताबाई उठल्या. दुर्गीला उठवून रात्री भिजत घातलेली शिकेकाई तिच्या डोक्यात घातली... मागच्या खळ्यात नेऊन केळीखाली ठेवलेल्या फरशीवर घंगाळभर ऊन ऊन पाण्याने त्यांनी स्वतः तिला खसखसून न्हाऊ घातले. एखादे जुने नाणे चिंच लावल्यावर उजळावे तशी बघता बघता दुर्गी उजळून निघाली. खळ्यात चांदणे पडले होते. न्हाऊन झाल्यावर ओल्या केसांना पीळ भरून थोडे पाणी निचरू दिल्यावर दुर्गीने केस मागे लोटले नि मान वर करून सीताबाईकडे पाहीले... नाना म्हणाले तसेच झाले. नहालेली ती स्वच्छ टवटवीत मुलगी सीताबाईना एकदम आवडली. लांब कोन्या दगडावर लुगड्याचा पिळा ठेवला होता .... तो उचलून त्यांनी मोकळा केला. त्या लुगड्यात दुर्गीला गुंडाळून त्यांनी तिला घरात आणली.

मथुअक्का आपले आटोपून तुळशीला कुंकू वाहून पाणी घालायला पुढल्या अंगणात आल्या तेव्हा सीताबाई तुळशीसमोर रांगोळीने गोपद्मे काढीत होत्या. दुर्गी त्यांना विचारत होती..

"हे काय ?"

"ही गोपद्मे."

"म्हंजे ?"

"गो–म्हंजे गाय. पद्मे म्हणजे पावले. धुळीत गाईची पावले उठलेली तू कधी पाहिली नाहीस काय ?"

दुर्गीने होकारार्थी मान हालवली.

"अशीच असतात ना ती ?"

सीताबाईंनी काढलेल्या गोपद्माच्या आकृतीकडे दुर्गी पहात राहिली. हळू हळू ती आकृती तिच्या लक्षात येऊ लागली... नि ती लक्षात आली तसे ओठातून तिच्या एकदम खुदकन् बारीक हसू उमटले. सीताबाईंनी विचारले–

"तुला काढाच्चै ?"

दुर्गीने चिमटीत रांगोळी उचलली. ती आकृती काढताना सीताबाईंच्या हाताचे वळण तिने पाहिले होते. सीताबाईंनी


अनुक्रमणिका

काढलेल्या आकृतीशेजारी तिने दुसरे गोपद्म काढले. तिच्या पाठीत शाबासकीचा हल्का धपका घालून सीताबाई म्हणाल्या,

"चांगले काढलेस की. रेषा बरीक थोडी जाड झाल्ये. उद्या काढताना बारीक काढ. चिमटीतली रांगोळी सोडताना एकदम सोडूने. . . समजल्ये ?"

दुर्गीने मान हालवली.

मागे उभी राहून मथुअक्का हा संवाद ऐकत होती.

"सीते कोण गो ही मुलगी ?"

दुर्गीने वळून पाहिले. तिच्याकडे रोखून पहात मथुअक्कानं पुनः विचारले,

"कालचीच काय गो ?"

"होय, मालक म्हणाल्ये ठेवून घ्या हिला"

"ती कशाला ? या नानाचे काय नि काय. बाजारास जातो नि एखादी अधिक भाजी घेऊन यावी तशी हा माणसे घेऊन येतो. मागे त्या देवजास घेऊन आला. नदीचे पाणी आणावयास तरी तो उपेगी झालाय. हीस ठेवून काय करायचे ?"

"मी आणीन नदीचे पाणी."

"बोललीस वरी चिचुंद्रीसारखी. घागर बघीतलेस देवजा वाहतो ती ? आख्खी मावशील त्यात. पाणी आणायला निघाली गवळण मोठी."

सीताबाईंनी घाईने मधेच तोंड घातले. .

"मालक म्हणाल्ये—अक्काला माझे फार करावे लागते. आता जमेल तेवढी माझी कामे हिला सांगत चला. अक्काला तिच्या देवाधर्माकडे थोडे जास्त पहायला मिळू द्यात. . ."

"असे म्हणाला नाना ? पण मी नव्हते हो सांगितले त्यास कुणी माणूस बघायास. भावाचे करायास मस जड नाही झाल्ये. आता कधी मवो देवाचे नि नानाचे करायचे एकाच वेळेस येते नि मग नानाचा खोळंबा होतो. तेवढ्यासाठी आणलीन असेल तर त्याने हिला तर मी कशास नको म्हणू ?"

तेवढ्यावर मग मथुअक्कासमोरून दुर्गीची सुटका झाली.

सीताबाईंनी दुर्गीला नानांची एक एक कामे दाखवायला सुरवात केली.

थोडे दिवस सीताबाई प्रत्येक कामात दुर्गीबरोबर वावरल्या. एक एक तिच्या अंगवळणी पडत गेले तशा त्या हळू हळू कामापासून बाजूला होत गेल्या.

दुर्गी भल्या पहाटे उठू लागली. स्नान वगैरे आटोपून फुले वेचायला जाऊ लागली. मागच्या खळ्यातून एक उतरण नदीकडे जाई. या नदीच्या वाटेवर भरपूर दूर्वा-पत्री मिळे. याच वाटेवर पारिजातकाचे झाड होते. पण वाट सोडून एके ठिकाणी थोडे झाडोरीत शिरले की एक ओवळीही उभी होती.

या ओवळीखाली सहसा कुणी जात नसे. तिच्याखाली जनावरे फार निघतात म्हणायचे. ओवळीच्या फुलांचे गजरे माळलेल्या कुणा सुवासिनीचे पिशाच्चही तिथे दिसते म्हणायचे. दुर्गी ओवळीखाली पोचली तेव्हा तिने यातले काहीच ऐकले नव्हते. वाऱ्याच्या झुळकीबरोबर आलेल्या ओवळीच्या फुलांच्या मंदसर वासाचा मागोवा घेत ती इथे पोचली होती. ती पोचली तेव्हा तिच्या चाहुलीने खरोखरच एक जनावर पाचोळ्यातून सरसरत निघून गेले. पण दुर्गीच्या ते लक्षात आले नाही.

ओवळीपलिकडे एक कातळ होता. या कातळातून झरा निघाला होता. त्याचे

नितळ स्वच्छ पाणी नागमोडी वाट काढत झाडीत नाहीसे झाले होते.

दुर्गीच्या समोरच झाडावरून एक इवलाले पांढरट मळखाऊ फूल पाण्यात ठिबकले. पाण्यावरोवर डुलत डुलत वहात निघाले. त्या फुलाकडे पहाता पहाता दुर्गीच्या मनात आले... आपणही ओवळीवर चढून तिच्या या दाट पानात दिसेनासे व्हावे. या नाजुक फुलांसारखे लहानसेसे व्हावे... नि वरून अलगद या पाण्यात ठिबकावे... त्या फुलासारखेच डुलत डुलत वहात निघावे... त्या कल्पनेने तिच्या शरीरातून एक गोड शिरशिरी उठली. नकळत कधी ती ओवळीच्या बुंध्याशी पोचली. ओवळीच्या काळ्याशार जाड बुंध्याला आपल्या न मावणाऱ्या कवेत सामावू पहात तिच्या खोडाशी गाल घासत राहिली. खोडाला तसे गाल घासतानाच तिने वर ओवळीच्या संभाराकडे पाहीले.. त्यां झाडाने एकदम पोटात घेतल्यासारखे तिला वाटले. मायेने ते आपल्या पाठीवरून हात फिरवते आहेसे वाटले. ओवळीची नि तिची गट्टी जमून गेली.

पण ओवळीची वेचलेली फुले ओच्यात घेऊन दुर्गीने खळ्यात पाऊल घातले नाही तोच मथुअक्काने तिला हटकले. नाक फेंदारत विचारले—,

"दुर्गे वास गो कसला येतो आहे? काय आहे तुझ्या ओच्यात पाहू?"

दुर्गीने मथुअक्काला ओच्यातली ओवळीची फुले दाखवली. पण ती पहाताच मथुअक्का किंचाळली,

"ओवळी—? कार्टे कुठून आणलीस ती...?"

"नदीच्या वाटेवर वाजूला एक झाड आहे.."

"वाटलेच मला. जवळपास दुसरी ओवळी नाहीच आहे. कारटे त्या भुताटकीच्या ओवळीखाली कशास मरायला गेली होतीस. कुणी दिसले विसले नाही तुला तिथे?"

"कुणी नाही दिसले. का?"

"आता का? हो, हो आधी खळ्याच्या वाहेर कशी. चांगली तिकडे लांब जाऊन ती सगळी फुले आधी सांडून ये जा कशी."

अक्काच्या या शब्दांनी दुर्गी हबकली. पण ती चट्‌दिशी निघाली नाही तशी पुनः एकदा मथुअक्का ओरडली—,

"होतेस कीनई वाहेर. का खायचा आहे एक धपाटा पाठीत."

नाईलाजाने दुर्गी खळ्यावाहेर गेली. लांब जाऊन मोकळ्या वाटेवर तिने ओच्यातली फुले सांडली. फुलांमागोमाग तिच्या डोळ्यातून कढत कढत आसवेही सांडली. गळणाऱ्या डोळ्यांनी रस्त्यावर फेकून द्याव्या लागलेल्या त्या फुलांकडे पहात बराच वेळ दुर्गी तशीच उभी होती.

"दुर्गे ऽ ऽ .."

मथुअक्काचा आरडा ओरडा ऐकून सीतावाई दुर्गीच्या मागे तिथे आल्या होत्या. त्यांच्या हाकेने दुर्गीने एकदम वळून पाहिले. तसे वळून पहाताना डोळे कोरडे करायची तिला संधीच मिळाली नाही.

"काय हे दुर्गे, रडायला गो काय झाले?"

"काय केले हो मी बाई?"

दुर्गीला हुंदका आवरला नाही. सीताबाईंनी तिच्या पाठीवरून हात फिरवीत म्हटले,

"काही केले नाहीस हो तू. तुला काय ठाऊक तिथे जाऊने म्हणून. पण मथुअक्कांचेही सांगणे सरळ नाही. एकदम ओरडायचे. जाऊ दे. तुझ्या चांगल्यासाठीच सांगितले हो त्यांनी तरी. त्या ओवळीखाली कुणी जात नाही. ती जागा चांगली नाही."

"कुणी सांगितले तुम्हाला बाई? तुम्ही गेलाय कधी त्या ओवळीखाली? खरंच तिथे छान वाटते. येता माझ्यावरोवर?"

सीतावाई थोडा वेळ गप्प राहिल्या. थोडे थांबून मग म्हणाल्या—,

"दुर्गे मोठ्या माणसांनी सांगितलेले ऐकावे. ती जागा चांगली नाही म्हटले... आपणही चांगली नाही म्हणावे. कशाला हवी ओवळीचीच फुले. चल, तिकडे पारिजातकाखाली फुलांचा सडा पडला असेल."

अनुक्रमणिका

यावर दुर्गी काही बोलली नाही.. सीताबाईच्या बरोबर मुकाट पारिजातकाची फुले वेचून ती वाड्यावर परतली.

दुर्गीने वाड्यावर पुनः ओवळीची फुले आणली नाहीत. पण ओवळीची ओढ तिला तुटली नाही. उलट दिवसेंदिवस तिची नि ओवळीची गट्टी अधिकच गडद होत गेली. ओवळीखाली जायची तिने वेळच बदलली. दुपारी वाड्यावर सगळ्यांची सामसूम झाली की नदीवरचे काही काम काढून ती बाहेर पडे नि ओवळीखाली येई. लोक म्हणत तशी चारदोनदा ओवळीच्या आसपास जनावरे सरसरताना तिने पाहिली. पण त्या किडूकमिडूकांचे तिला भय असे कधी वाटले नाही. मात्र लोक म्हणायचे ती सुवासीण तिला कधीच तिथे दिसली नाही.

एक दिवस तर दुर्गीने गंमतच केली. नाना कुठे बाहेर गेले होते. सीताबाईचा नि मधुअक्काचा दुपारचा डोळा लागला होता. दुर्गीने कुंकवाच्या करंड्यातून थोडे कुंकू काढून घेतले. कागदाच्या पुरचुंडीत बांधून घेतले. पुरचुंडी कनवटीला लावली. निघण्यापूर्वी मधुअक्काच्या खोलीत ती डोकावली... तेव्हा कूस बदलून मधुअक्का पुनः निजली. वाड्यातून दुर्गी बाहेर पडली नि थेट ओवळीखाली आली. एका दगडाखाली तिने पुड्यांचे सूत साठवून ठेवले होते.. ते बाहेर काढले. हवे तेवढे घेऊन बाकीचे पुनः दगडाखाली ठेवले. ओवळीची फुले सुतात ओवून लांब चांगला गजरा केला. आंबाड्याभोवती फेरे धरून गुंडाळला. कनवटीची कुंकवाची पुरचुंडी काढली. कुंकवात बोटे भरून कपाळभर मळवट भरले. जवळच एका खळग्यात झऱ्याचे पाणी साचले होते. शेजारी एक मोठा दगड होता. त्या दगडावर बसून खळग्यातल्या पाण्यात वाकून दुर्गीने आपले रुप पाहिले... आणि ती एकदम दचकली. पाण्यात अचानक आईचा चेहरा पाहिल्याचा तिला भास झाला. क्षणभर ती शहारली. नानांच्याकडे आल्यापासून भराभरा दिवस लोटले होते. इथल्या जगातल्या सुखाने ती अंगाने भरली होती. चेहरा तिचा चांगला गोल झाला होता नि आंबाडा वगैरे घालून ती थेट आईसारखी दिसायला लागली होती. कितीतरी दिवसांनी आईच्या आठवणीने तिचं मन थोडं हळवं झालं. तिने पुनः पाण्यात डोकावून पाहिलं. बराच वेळ ती मग आईसारख्या दिसणाऱ्या आपल्या रुपाकडे पहात राहिली होती.

कुणाची तरी चाहूल लागली म्हणून तिने सहज मान वर केली तर थोड्या दूरवर मधुअक्का उभी. दचकून ताडकन् दुर्गी एकदम उठून उभी राहिली. पण पुढल्याच क्षणी काही निराळेच घडले. दुर्गीला मधुअक्काने ओळखलेच नाही. मळवट भरलेल्या कपाळाचे नि ओवळीच्या फुलांचे गजरे माळलेल्या दुर्गीचे ते रुप पाहून मधुअक्काने एकदम भिऊन किंकाळी फोडली नि पाठ फिरवून मोठ्याने 'राम.. राम.. राम.. राम..' म्हणत त्या डुगडुगु पळत सुटल्या. काय झाले ते दुर्गीच्या लक्षात आले

तेव्हा तिची हसायचीही पंचाईत झाली.

मधुअक्का दिसेनाशी झाली तशी दुर्गीने झऱ्याच्या पाण्याने खसखसून तोंड धुतले. डोकीतला ओवळीचा गजरा काढून तो पाण्यावर सोडला. पाण्याबरोबर तो वहात गेला. पदराने तिने चेहेरा कोरडा केला. पुरचुंडीतल्या कुंकवाने नाकाच्या रेषेत वर कपाळावर गोल टिळा रेखला. कुंकवाची पुरचुंडी सूत ठेवले होते त्या दगडाखाली टाकली. पुनः एकदा झऱ्याच्या पाण्यात हात बुचकळला नि मग नदीवरच्या रामाच्या देवळाकडे तिने धूम ठोकली.

दुर्गी वाड्यावर परतली तेव्हा सीताबाई मधुअक्काच्या खोलीत होत्या. मधुअक्काला ताप भरला होता. पांघरूणात त्या थंडीने हुडहुडत होत्या. दुर्गी आली तशी सीताबाईंनी दाराशीच थांबवून तिला विचारले—

"कुठे गेली होतीस दुर्गे ?"

"नदीवरच्या रामाला."

"बघ बाई, नि त्या मेल्या देवजाने सांगितलेन तू ओवळीखाली गेलीस.. म्हणून मधुअक्का तुझ्यामागे तिकडे गेली हे काही मल्तेच होऊन बसल्ये." आता मात्र दुर्गीला एकदम चोरट्यासारखे झाले. तेवढ्यात सीताबाई पुढे म्हणाल्या,

"रामाला गेली होतीस म्हणालीस ना ?"

"हो."

"अंगारा आणला आहेस ?"

"हो, नि हा सुंठवडा पण."

दुर्गीकडून रामाचा अंगारा नि प्रसादाचा सुंठवडा घेऊन सीताबाई पुनः मधुअक्काकडे आल्या. मागोमाग दुर्गीही आली.

"ऐकलेत का—दुर्गी तिकडे नदीवरच्या रामाला गेली होती. त्या वावळ्या देवजाने काहीच्या बाहीच सांगितलेन."

थंडीने हुडहुडत मधुअक्काने विचारले,

"होय गो दुर्गे ?"

दुर्गीने मान हालवली. सीताबाई म्हणाल्या,

"तर, हा काय तिने अंगारा नि सुंठवडा आणलाय."

"चिमूटभर घाल माझ्या तोंडात."

सीताबाईंनी सुंठवड्याची चिमूट मधुअक्कांच्या तोंडात सोडली. त्यांच्या कपाळाला अंगारा लावला.

"सीते ऽऽ "

"काय ?"

"नाना आला नाही काय गो अजून ?"

"नाही आले. कशास हवे होते ?"

"डोळ्यासमोरून ती जात नाहीगे. नाना असता तर त्यास रामरक्षा म्हणायास तरी सांगितले असते."

दुर्गीने एकदम विचारलेन,

"मी म्हणू ?"

"चोंबडेपणा करू नकोस दुर्गे. रामरक्षा म्हणजे तुझी फुगड्यांची गाणी नव्हेत."

तशाही अवस्थेत मधुअक्का कडाडली. सीताबाई सुद्धा म्हणाल्या,

"दुर्गे वेडे नेहमीच मोठ्या माणसांच्यात बोलूने. तूस गो कशी येणार रामरक्षा.."

यावर दुर्गीचे सरळ—

"अथ श्रीरामरक्षास्तोत्रम् ॥.."

सीताबाई 'आ' करून दुर्गीकडे पहात राहिल्या. मधुअक्का ताडकन् अंथरुणात उठून बसली.

पण दुर्गी थांबली नाही. मधुअक्काच्या नजरेला नजर मिडवून ती पुढे म्हणू लागली.

**श्रीगणेशाय नमः ॥ अस्य श्रीरामरक्षास्तोत्र मंत्रस्य बुधकौशिक ऋषिः ॥ श्रीसीताराम-चंद्रो देवता ॥ अनुष्टुप् छंदः ॥ सीता शक्तिः॥**

आपल्याला थंडी भरली होती याचाही मधुअक्काला विसर पडला. तिच्या शरीराची थडथड अचानक थांबली. पांघरूण उडवून देऊन ताठ शरीराने नि तशाच नजरेने त्या दुर्गीकडे पहात राहिल्या. त्यांच्या नजरेवरची नजर ढळू न देता दुर्गीही घडाघडा म्हणतच राहिली होती.. तिची वाणी स्वच्छ होती. उच्चार शुद्ध होते. हुबेहूब नानांसारखे होते. पोरीच्या चेहेऱ्यावर विलक्षण तेज दिसत होते. दुर्गीकडे पहाता पहाता सीताबाईंच्या डोळ्यांना पाणी जमा झाले.

दुर्गीने रामरक्षा संपविली. मनोभावे हात जोडले. सीताबाईंनी.. मधुअक्काने तिचे अनुकरण केले. भिंतीला पाठ टेकून क्षणभर डोळे मिटून दुर्गी तशीच उभी राहिली. मग शांतपणे डोळे उघडून तिने मधुअक्काकडे पाहिले. सीताबाईही मधुअक्काकडेच पहात होत्या..

"मधुअक्का घाम आलाए. ताप पळालासा वाटतो."

"होय सीते. पण पोरीने हा चमत्कार केलान् तरी कसा ?"

हे ऐकून दुर्गीला कसेसेच झाले. म्हणाली,

"अक्का, चमत्कार बिमत्कार काही नाही हो. नानांच्या पूजेच्या वेळी तिथेच असते मी नेहमी. नाना म्हणतात...ती कानावर पडून पडून पाठ झाल्ये. मी कसले चमत्कार करणार ? मी लहानच आहे हो. मस आपले तुमचे आशीर्वाद हयेत."

आणि दुर्गीने सीताबाईंना मधुअक्काला वाकून नमस्कार केला. मधुअक्काने पहिल्यांदाच दुर्गीला आपल्या कुशीत ओढले.

रात्री नाना अंथरुणावर पडले होते. पायाशी दुर्गी होती. खोबऱ्याचे तेल लावून काशाच्या वाटीने नानांच्या पायाचे तळवे ती घाशीत होती. मध्येच नाना म्हणाल्ये—

"दुर्गी जरा देवजास बोलावून आण बरे.."

तर दुर्गी एकदम रडायलाच लागली. नानांनी विचारले—

"तुला रडायला काय झाले दुर्गे. मी ऐकले सारे. गाढव देवज्याने सांगितलेन त्यामुळे..."

"नाही नाना तसे नाही.."

"आँ ?"

"मी खरेच ओवळीखाली गेले होते."

नि मग दुर्गीने नानांना सगळे सगळे सांगून टाकले. सगळे ऐकूनही नानांना हसूच आले. म्हणाले,

# आपल्या त्रिविध कृतीनें एकाच धुण्यांत ...




# डेट अधिक शुभ्र कपडें धुतें

—— इतर कोणत्याही पावडरपेक्षा

**कसं ते पहा :**

१ **डेट** मध्ये असलेले विशेष द्रव्य कपड्यांच्या अगदी आतल्या भागापर्यंत जाऊन पोचते आणि तेथील सारा मळ खळखळून धुवून काढते. डेट कपड्यांना घट्ट चिकटून राहिलेला मळही साफ काढून टाकते.

२ **डेट** हा मळ धुवून काढल्यावर, तो पुन्हा कपड्यावर वावरू देत नाही.

३ **डेट** कपड्यांची शुभ्रता वाढविते...त्यामुळे कपडे कसे लख्ख उजळलेले दिसतात! (नीळ किंवा इतर तत्सम शुभ्रताकारक द्रव्य वापरावे लागत नाही.)

**आजच डेट खरेदी करा!**

SHILPI HPMA 38A/70 MAR

स्वस्तिक ऑइल मिल्स, मुंबई

"दुर्गे, तू खुशाल ओवळीखाली जात जा. देवजास कागाळी न करण्याबद्दल मी बजावून ठेवेन. अक्कास तेवढे कळू देऊ नकोस नि येताना तिला रामाचा प्रसाद आणायला चुकू नकोस. ज्यास रामरक्षा येते त्याच पिशाच्च काय करते? नि हो, उद्या सकाळी मलाही एकदा रामरक्षा म्हणून दाखव कशी..."

दुर्गीचे डोळे आनंदाने चमकले.

श्रावण आला. सणांची गर्दी उडाली. वाड्यापुढच्या अंगणात रात्र जागवायला आजुबाजूच्या बायका-पोरी जमा झाल्या होत्या. गाण्यांची..पोरींच्या फुगड्यांची झिम्मड उडाली होती. सीताबाईंनी दुर्गीला कितीतरी गाणी शिकवली होती. फुगड्यात दुर्गी कुणाला हार जात नव्हती. पिंगा.. कोंबडा...वसफुगडी...फेरे...झिम्मा ..तऱ्हेतऱ्हेच्या फुगड्या. तऱ्हेतऱ्हेची गाणी. खेळाला उत आला होता.

गोमुचा फेरा रंगात आला होता. फेर धरून मध्ये अडवलेल्या गुमाला नाचायचा आग्रह होत होता...

"नाच गोऽ.. गुमा"

"कशी मी नाचु?..."

गुमा म्हणत होती—,

"या गावचा त्या गावचा सोनार नाही आला, नथ नाही मला.. नाचु मी कशी?"

"नाच, गोऽ गुमा"

"या गावचा त्या गावचा शिंपी नाही आला..चोळी नाही मला नाचु मी कशी?"

सोनार...शिंपी...कासार...एकेकाची पाळी लावून गुमा कारण सांगत होती. फेर धरलेल्या पोरींना गुंगवत होती.. नि मग चलाख गुमाने फेर धरलेल्या पोरींना मध्येच गुंगारा दिला.. फेरातून ती बाहेर पळाली. ही चलाख गुमा अर्थातच दुर्गी होती.

मग झिम्मा सुरू झाला. जोडीजोडीने टाळ्यावर टाळ्या देत नाच पोरी म्हणू लागल्या..

**आंबा पिकतो..रस गळतो..**
**कोकणचा राजा झिम्मा खेळतो..**

ताल-लय पोरींच्या हातीपायी भिनली होती. टाळीवर टाळी झडत होती. शब्दांचे झेले उडत होते...

**घडव घडव रे सोनारा**
**बारिक मोत्याच्या डुल्लारा.**
**डुल्लाराला खिडक्या—**
**आम्ही दोघी मैत्रिणी लाडक्या.**
**लाड सांगू बापाला,**
**मोती मागू कापाला...**

तेवढ्यात गोठ्याकडे काहीतरी गडबड झाली. गुरे विचित्र हंबरू लागली. गोठ्यातल्या गोठ्यात धडपडू लागली. माडीवर नानांना निरोप गेला. नाना काठी घेऊन आले. त्यांनी देवजास एक-दोनदा साद घातली.. पण तो कुठे जवळपास दिसला नाही. मग दुर्गीच कंदील घेऊन पुढे झाली. बाकीच्या जणीही दुर्गीमागे निघाल्या.. तशी नाना म्हणाले,

"सगळ्यांचे काय आहे तिथे? काही जनावर बिनावर गोठ्यात निघाले असेल.. व्हा मागे."

तशा मग सगळ्या जणी अंगणातच थांबल्या. एकटी दुर्गी नि नाना गोठ्याकडे गेले.

दुर्गीला गोठ्याबाहेरूनच कंदील दाखवायला सांगून नाना गोठ्यात शिरले. बारीक डोळ्यांनी सगळीकडे पाहू लागले. एके ठिकाणी थोड्या गवताच्या गशिड्या रचून ठेवल्या होत्या.. तिथे काही हालचाल दिसली. दुर्गीने कंदीलाचा प्रकाश टाकला. दोन गशिड्यांच्या मध्ये कुणीतरी लपले होते. त्याचे गुडघ्यापासूनचे पाय दिसत होते. नाना जरा थांबले. थोडी मोक्याची जागा धरून मग दरडावले—,

"कोण आहे?"

गंजीत लपलेला कुणी तिथेच उठून उभा राहिला. गंजीबाहेर न येता म्हणाला,

"भटा मारणारेस काय?"

"ते मग बघू. आधी तू बाहेर ये."

त्याचा आवाज ऐकून दुर्गी चमकली.

तेवढ्यात तो बाहेर आला. अंगावर बिनबाह्यांचा कळकटलेला अंगरखा. खाली नुसतीच लंगोटी. केसांच्या झिंजाड्या. तांबुरलेले डोळे. दंडाला गाठी मारलेले मंत्राचे दोरे. त्याला पाहून नानांच्या अंगावरही शहारा आला. दुर्गीला कापरेच भरले. नानांनी दरडावून विचारले—,

"कोण आहेस तू?"

"ईचा बाप."

त्याने दुर्गीकडे बोट केले. नानांच्या कपाळावर आठ्या उमटल्या. त्यांनी दुर्गीकडे पाहिले. दुर्गीने मानेने 'हो' म्हटले नि मान खाली घातली. विजयी मुद्रेने नानांकडे पाहून तो हसला. त्याच्या पिवळ्या धम्मक दातांच्या दर्शनाने नानांना कसेसेच झाले.

"कशाला आला आहेस?"

"ईस नेयाला."

"ती येणार नाही."

"ती रांड काय येयाची नाई.."

"शूऽऽ त नीट बोल. नि हळू बोल."

"हा हाळू बोलतो. तू पाटव, ती येयल."

"मी तिला पाठवणार नाही."

"आसं करू नको भटा. ती माजी म्हाताऱ्याची काटी.."







# श्रुति धन्य जाहल्या टेलिरॅड लावता

## पराग

टेबल ट्रान्झिस्टर-१० सेमीकंडक्टर्स.
२ स्वयंचलित उष्णतादायक थर्मिस्टर्स
३ ऑल वेव्ह बँडस्. फेराईट रॉड ॲंटिना
मध्यम आणि लघु लहरी-२ साठी.
अंतर्गत सहाय्यक ॲंटिना दूरवरील
शक्तिशाली स्टेशनांसाठी. उत्तम स्पीकर
विहर्नारचे उत्कृष्ट कॅबिनेट.

रु. २८३/– अबकारी करासह,
स्थानिक कर वेगळे.

## नु मेलडी

८ ट्रान्झिस्टर्स. २ डायोडस्.
१ थर्मिस्टर. ३ ऑल वेव्ह बँड.
मध्यम नि लघु लहरी–२ साठी फेराईट
ॲंटिना. टेलीस्कोपिक ॲंटिना.
टोन स्विच. ९० मिमि गोलाकार
उत्तम स्पीकर. बाह्य बॅटरी एलिमिनेटर
पुरवठ्याची व्यवस्था. दोन टोनचे
प्लास्टिक कॅबिनेट.

रु. २४५/– अबकारी करासह,
स्थानिक कर वेगळे.

# टेलिरॅड

रेडिओ
ट्रान्झिस्टर्स
टेलिव्हिजन




टेलिरॅड प्रा. लिमिटेड, साकी–विहार रोड, चांदीवली, मुंबई ७२

Shilpi TR 16/70 MAR

शाखा : ११/२१ मॅथ्यू रोड, मणि महाल, मुंबई–४
आपल्या नजिकच्या अधिकृत टेलिरॅड विक्रेत्यावरोबर संपर्क साधा.

"चूप. शरम नाही वाटत. सा वर्षां-मागे मांजराची पोरे सोडावीत तशी बाजा-रात आणून सोडली तिला. तेव्हा नाही आलास जगली का मेली बघायला. ."

"नाय कसा? तुज्यामागून पोर बशीत बसली ती बगितली. मागनं आलु नि वाडा दिकुल पायला. मग निर्दास्त मागारी गेलु."

"तसाच आता पण जां."

"आता नाई जायचा. मस पोर हवी."

"कुठे घेऊन जाणारेस तिला ?"

"बंदराच्या गावाला."

"लगीन लावून देणारेस ?"

तो हंसला, म्हणाला,

"तर बंदराच्या गावाला तिज नवरे मॉप."

"काय ?"

. "सोजिरांची बोट लागली की हवे तेवडे न्हवरे. पायजेल तेवडा पैसा. चंगळ तिची नि माजी दिकुल.'

ताडकन् नानांनी त्याच्यावर काठी ओढली. तो बोंबटत गोठयावाहेर आला. नानांनी आणखी एक तडाखा लगावला तसा नानांना शिव्या घालत पळू लागला. नाना त्याच्या मागे लागले. अंगणातली गर्दी गोठ्याकडे वळत होती तेवढयात त्या गर्दीतूनच नानांना शिव्या देत तो पुढे. . नि नाना त्याच्या मागे असे पळत ते वाड्या-बाहेर गेले. 'भटा, माजी पोर देस. तुजा वाईट करीन. .' असे तो पळता पळताही ओरडत होता. पण कुणालाच गलक्यात त्याचे शब्द नीट कळले नाहीत.

सीताबाईंना तेवढे क्षणात सगळे उमजले. नाना परत येण्यापूर्वी त्यांनी अंगणातला खेळ आवरून सर्वांना घरोघरी पाठवले. बुचकळ्यात पडलेल्या बाया वाड्यावाहेर पडताना नाना परतले. त्यांना म्हणाले—

"चोरी करायला आला होता. दिले दोन काठीचे रट्टे. लांब नदीकडे पळाला. जा आता तुम्ही आपापल्या घराकडे. निर्धास्तपणे. प्रसाद घेतलात ना ?"

सगळ्याजणी 'हो' म्हणाल्या नि गेल्या. त्यांना घालवायला आलेल्या सीताबाई मग नानांच्या मागून वाड्यात परतल्या.

ओटीवर खांबाला टेकून दुर्गी चोरट्या-सारखी उभी होती. मथुअक्का तिला विचा-रीत होत्या—"तूज काय केलेन नाही ना त्याने ?"

दुर्गी मानेने नाही म्हणाली. तेवढ्यात नाना-सीताबाई तिथे पोचल्या.

मथुअक्का म्हणाली—"पोर भ्याल्येय. आज तीज माझ्या खोलीत निजुदे. निजताना तीज मी रामरक्षा म्हणायास सांगणारे."

नाना म्हणाले——

"बरे."

पण हसून मनात म्हणाले—कोण भ्यालेय. दुर्गी की मथुअक्का ?

त्या दिवसापासून दुर्गी काही केल्या मोकळी नव्हती. नानांचे . . सीताबाईंचे. . . मथुअक्काचे . . सगळ्यांचे सगळे ती करत होती. पण आजारल्यासारखी घरात वाव-रत होती. सीताबाई नानांना म्हणाल्या-देखील . . . तर नाना म्हणाले——"आता गणपती यतील. गणपतींच्या दिवसात पोरगी आपोआप पहिल्यासारखी होईल."





अनुक्रमणिका

एकेका दिवसाने चतुर्थीचा दिवस जवळ होत होता. वाड्यावर कामे वाढली होती. कानाकोपऱ्यातून केर निघत होता. जळमटे काढली जात होती. भांडीकुंडी घासून-पुसून लख्ख होत होती. पण एवढ्या कामांच्या गर्दीतही दुर्गीची मरगळ जात नव्हती. ती पूर्वीची दुर्गी नव्हती. जात्यावर सीताबाईबरोबर ती गाणी म्हणत होती.. पण तिच्या गळ्यातला सूर हरवला होता.

उद्यावर हरतालिका आली. हरतालिकेच्या दुसऱ्या दिवशी गणपती यायचे होते. रात्री दुर्गीच्या स्वप्नात ओवळी आली. म्हणाली.. हरतालिकेला भल्या पहाटे माझ्याखाली ये. झऱ्याच्या पाण्याला माझ्या फुलांचा सुगंध आहे... त्याने न्हा. तूज बरे वाटेल.

हरतालिकेला भल्या पहाटे दुर्गी उठली. उठल्यावरोबर तिने डोक्यात शिकेकाई घातली. देवजाची मली मोठी घागर तिने घेतली. लुगड्याचा पिळा-चोळी घेतली. नि ती ओवळीकडे निघाली. चांदणे पडले होते. रात्री कधीतरी पावसाची सर येऊन गेली होती. पायांना होणाऱ्या गवताच्या ओलसर स्पर्शाने दुर्गीला खरंच बरे वाटत होते. पळसापुढून जाताना आठवणीने तिने चार मोठी पाने तोडून घेतली.



सर्व प्रमुख दुकानातून मिळतात.

ओवळीखाली चांदणे फिके झाले होते. ओवळीच्या दाट पानांतून झऱ्याच्या पाण्यात सांडलेले चांदण्याचे काही ठिपके पाण्यावर मजेने तरंगत होते. पाण्यात ठिबकणारी ओवळीची फुले वाहत्या पाण्याबरोबर पुढे सरकत होती. पण चांदण्याचे पिटुकले ठिपके ढीम हालत नव्हते. दुर्गीला त्यांची मोठी गंमत वाटली. त्यांच्याकडे मान वाकडी करून पहाताना तिला एकदम हसू आले. त्या दिवसानंतर आज पहिल्यांदाच दुर्गी हसली.

कुठेतरी काही खसपसले म्हणून तिने आजुबाजूला पाहिले. काही दिसले नाही. असेल काही किडुकमिडुक म्हणून तिने दुर्लक्ष केले. कोरडी जागा पाहून लुगड्याचा पिळा नि चोळी ठेवली. घागर खाली ठेवली. पळसाच्या पानांचा चांगला मोठ्ठा द्रोण लावून घेतला. एकदा सावधपणे आजुबाजूस पाहून घेऊन अंगातली चोळी उतरवली. घागर नि द्रोण घेऊन ती झऱ्याच्या पाण्याजवळ आली.

आधी ओंजळीने पाणी घेऊन तिने खळाळून चूळ भरली. पाण्याची ओंजळ नाकाशी येताच ओवळीच्या फुलांनी सुगंधित झालेल्या त्या पाण्याचा वास तिच्या मस्तकात भरला. तिच्या अंगभर एक गोड शिरशिरी उठली. बघता बघता तिच्यात पहिली दुर्गी पुनः खुलू लागली.

वाहत्या पाण्याशेजारी गुढग्यावर बसून भराभरा तिने द्रोणाने घागरीत पाणी भरायला सुरवात केली. चांगले पाच-पन्नास द्रोण पोटात रिचवून मगच घागर भरून सांडली. पण दुर्गी थकली नाही. आता तिचा उत्साह उदंड होता. घागर भरली तशी उठून उभी रहात झपकन् तिने ती वर उचलली. एखाद्या पुरुषाच्या ताकदीने लीलया डोकीवर उंच नेऊन सरळ उलटी केली.

एवढ्या घागरीच्या लहानशा तोंडातून घागरीतले पाणी बबबबत दुर्गीच्या डोकीवर सांडले. पहाटेच्या वेळी गार पाण्याच्या त्या स्पर्शाने तिचे अंग शहारले. पण दुसऱ्याच


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास





क्षणी डोकीपासून पायापर्यंत निथळणाऱ्या तिच्या ओल्या अंगावरून ओवळीच्या फुलांच्या मंदसर गंधाची लाट हळुवार पसरली. त्या वासाने दुर्गी धुंद झाली. निःसंकोचपणे तशीच निथळत उभी राहिली. चांदण्याचे कवडसे तिच्या ओल्या अंगावर उतरले होते. लुगडे अंगाला चिप बसले होते. उघडे ओले अंग चमकत होते. त्या धुंदीतच तिने मान वर करून ओवळीकडे पाहिले... नि त्याच वेळी वरून ठिवकलेले एक ओवळीचे फूल तिच्या गालाला स्पर्श करून खांद्यावर अलगद अडकले. नखाएवढाल्या त्या नाजुक फुलाच्या स्पर्शाने.. गंधाने दुर्गीला वेड लागायचे तेवढे राहिले.

तिला कशाचेच भान उरले नाही. ओला पदर अंगावरून सरकला होता. उरोजांचा काही भाग उघडा पडला होता. पण तिला कशाचीच फिकीर नव्हती. या क्षणी ती तिथे फक्त एकटी होती. ओवळीने तिला बोलावून घेतले होते... नि आपल्या सुगंधाने न्हाऊ-माखू घातले होते... त्या विलक्षण अनुभवात ती पूर्ण बुडाली होती. तो अनुभव तिला आणखी आणखी हवा होता.

पुनः एकदा घागर भरायला ती ओणवली... नि इतका वेळ छातीला चिकटून राहिलेला पदर सुटून खाली आला. तिचे दोन्ही स्तन उघडे पडले...

आणि त्याच वेळी मागून कुणीतरी तिच्यावर झडप घातली. तिचे नाकतोंड आवळून धरले... नि तिला झाडीकडे ओढायला सुरवात केली. ओवळीजवळून पुढे सरकताना ती फार धडपडू लागली. तशी त्याने तिचे डोके ओवळीवर दाणकन् आपटले नि मग तिची शुद्धच गेली.

दुर्गी शुद्धीवर आली तेव्हा समोर तिचा बाप उभा होता. आपले घाणेरडे पिवळे दात विचकून म्हणत होता..,

"भोसडीच्या मटान् मस दांडक्यान मारलेन... नि रांडे तू त्यास सामील. घे आता मीच तूज नासवलेय. आता तर गुमान बंदराच्या गावाला येशील? मोठा मायेचा पुत.. पाठवीत नाय म्हंतो. आता य हीथे नि आपट डोचके.."

त्याच्या बोलण्यातून काय झालेय ते तिला कळले नि तिची पुनः शुद्ध गेली.

दुर्गी पुनः शुद्धीवर आली तेव्हा बाप तिला समोर दिसला नाही. नानांची... सीताबाईंची.. मधुअक्काची तिला आठवण झाली नि पोटात तिच्या एकदम तुटून आले.

तशातच अभद्र शंका तिच्या मनात आली. बाप आपला वर आणि हे कर्म मिरवायला वाड्यावर तर गेला नाही? छीः छीः, त्या देवमाणसांना यातले काही कळता नये. आपल्या जिवंतपणी तरी कळता नये. कुठून तिच्या अंगात बळ आले नि ती तटकन् उठून उभी राहीली.

बाप तिचा झऱ्याच्या पाण्याने चुळा भरीत होता. चित्त्याच्या सावध पावलांनी दुर्गी त्याच्या मागे आली. तिच्या डोळ्यांत रक्त जमा झाले. आवाज होऊ न देता तिने घागर उचलली. उंच नेली.. नि सगळ्या शक्तीनिशी ठाकणन् त्याच्या डोचकीत घातली. किंचाळायलाही त्याला फुरसत मिळाली नाही. झऱ्याच्या पाण्यातच तो आडवा झाला होता नि बेभान दुर्गी साप ठेचावा तसे त्याचे डोके ठेचतच होती.

झऱ्याचे पाणी लालभडक होऊन वाहू लागले तेव्हा तिने हातातली घागर खाली टाकली. बापाचे प्रेत ओलांडून लाल पाणी तुडवीत ती ओवळीखालून बाहेर पडली.

नदीच्या वाटेवर आली तशी तिने एकदा वाड्याच्या दिशेने पाहिले. सगळ्यांच्या आठवणीने पुनः एकदा तिच्या पोटात खूप तुटून आले. दाताखाली करकचून ओठ आवळून तिने वाड्याकडे पाठ फिरवली नि नदीच्या दिशेने ती चालत राहीली.

ऐन गणपतीच्या दिवसात या दोन माणसांच्या मरणाने नानांना फौजदारापुढे जाबसाल द्यायला जावे लागले. पण तरीही नानांनी गणपतीचे नि दुर्गीचेही सगळे केले. दुर्गीचे सुतक पाळले. दुसऱ्या ब्राह्मणास बोलावून गणपतीस पुजले. दहाव्या दिवशी नदीत दुर्गीचे पिंड सोडले. अकराव्या दिवशी त्याच नदीत गणपतीस बुडवले.

नदीवरून परतताना देवजाला पुढे जायला सांगून नाना ओवळीखाली आले. पोर पिशाच्चरूपाने तरी दर्शन देईल म्हणून नानांनी वाट पाहिली. पण दुर्गी दिसली नाही.

• • •










# पिकासोचे नटरंगी जीवन

प्रभाकर अत्रे

'पाब्लो पिकासो" हा कलेच्या क्षेत्रातला एक परवलीचा शब्द आहे. मथुरा-द्वारकानिवासींना कृष्ण ठाऊक नसला, अयोध्या-लंका निवासींना राम-रावणे ठाऊक नसले, राजस्थानला पद्मिनी वा प्रताप ठाऊक नसला, हिन्दूंना गीता वा यवनाला कुराण ठाऊक नसले तर जितके आश्चर्य वाटेल तितकेच आश्चर्य निर्मितीक्षम कलेच्या (क्रिएटिव्ह आर्ट) क्षेत्रात **पाब्लो पिकासो**"हे नाव ठाऊक नाही असा कलावंत सापडणारच नाही. जागतिक कीर्ती संपादन केलेली, प्रयोगक्षम प्रतिभावंतांची ती एक अधिदेवता झाली आहे. पण (कलावंत हा अॅबनॉर्मल असतो तसा) पिकासोही अॅब्नॉर्मलच आहे. त्यामुळेच तो व्यक्ती राहिलेला नाही. ती एक वल्ली झालेली आहे. पिकासोचे नुसते कलाजीवनच 'अॅब्नॉर्मल' नाही, तर त्याचे वैयक्तिक जीवनही अनेकांगी, विक्षिप्त, नटरंगी असेच आहे. हा माणूस तसा अत्यंत लोकप्रिय आणि अत्यंत विवाद्यही! रूढ परंपरांचा उच्छेद करून, तरल प्रतिभेच्या साहाय्याने व असीम कल्पकतेने त्याने जणु दृश्य-कलेच्या क्षेत्रात प्रचंड उलथापालथ घडवून आणली. पिकासोला लाभलेली दृष्टी ही 'अ-कलात्मक' तपशीलातून कलात्मक रूप पाहणाऱ्या निर्माणक प्रतिभेची द्योतक आहे. आणि त्याचे मन, शरीर, जीवनदृष्टी हा तारुण्याने खळाळणारा प्रचंड स्रोत आहे. त्यामुळेच कलेच्या क्षेत्रात पिकासो जसा 'वृद्ध' झाला नाही तसाच रंगेल, रसील्या वृत्तीचा, मिश्किल, थट्टेखोर, नाटकी आणि तरुणाच्या उत्साहाने ओसंडणाऱ्या शारीरिक हालचाली करू शकणारा पिकासो हाही म्हातारा झाला नाही. काही कलाकारांची कला 'अजरामर' होते तशाच



**... हरहुन्नरी, हुकमी पण दर्जेदार लेखन करणारे असे ज्यांच्याबद्दल सार्थपणे म्हणता येईल असे हे श्री. प्रभाकर अत्रे 'दीपावली'साठी लिहितात तेव्हा ते एक घरचेच कार्य या भावनेनेच लिहितात. कथा, कादंबरी, काव्य, स्फुट-लेखन इत्यादि सर्व साहित्य प्रकारांमध्ये त्यांनी मानाचे स्थान पटकावलेले आहे ... 'वेताल मी... बेधुंद मी', 'जिणे न माझे लाजिरवाणे' इत्यादि 'दीपावली'तील त्यांच्या लेखमालांचे चांगलेच स्वागत झाले... त्यांचीच ही नवी लेखमाला...**

. . . . . . . . . . . . . . . . . . .

काही कलाकारांच्या वृत्तीही 'अजर' राहतात. पाब्लो पिकासोची वृत्तीही अशीच अजर राहिली आहे. त्याची कला तर अजरामर झाली आहेच.

पिकासोच्या कलेचा शोध त्या क्षेत्रातली अधिकारी माणसं घेतील. तुमच्यामाझ्या-सारख्या माणसाला कुतुहल वाटत असते ते कलाकाराच्या व्यक्तिजीवनाबद्दल !" "कवी तो होता कसा आननी ?" असा प्रश्न कवीबद्दलच नव्हे तर सर्वच कला-कारांबद्दल आपल्याला पडतो. आणि मग कलेवरून आपण कलाकाराची एक अंधुक प्रतिमा मनात निर्माण करतो. ती प्रतिमा मिळती-जुळती ठरली तर तो सुवर्णयोग ठरतो. न ठरली तरी–कुतुहल असतेच.

पिकासोचे व्यक्ति-जीवन रंगविणारी दोन पुस्तकं माझ्या वाचनात आली. त्या दोन पुस्तकांची नावं आहेत "लाइफ वुइथ पिकासो" आणि "द प्रायव्हेट वर्ल्ड ऑफ पाब्लो पिकासो." पहिल्या पुस्तकाची लेखिका-निवेदिका आहे "फ्रॅकॉइज् गिलॉट" (Francoise Gilot) आणि प्रत्यक्ष लेखक आहे 'कार्लटन लेक' (Carlton Lake) आणि दुसऱ्या पुस्तकाचे लेखक आहेत डेव्हिड डग्लस डंकन (David Douglas Duncan)

यापैकी फ्रॅकॉइज् गिलॉट हिचा जन्म १९२१ साली झाला. तिने बी. ए. पदवी संपादन केली नंतर कायदा व वाङमयाचा तिने दोन वर्षे अभ्यास केला. वयाच्या विसाव्या वर्षी तिने 'एंद्रे सोझडा'च्या स्टुडियोत चित्रकलेच्या अभ्यासाला व व्यासंगाला सुरुवात केली. १९४३ त तिची पिकासोची प्रथम भेट झाली. त्यानंतरची दहा वर्षे ती जणू 'पिकासोमय'च झाली होती. त्याच्या कल्पना, त्याचे विचार, त्याचं मित्रमंडळ आणि त्याचं कलालय यांचा फार मोठा पगडा तिच्या मनावर बसला होता. १९४६ त **मॅटिसी** हा चित्रकार भेटला. त्याच्याही काही कल्पनांनी ती भारावली. १९५३ त तिने पिकासोला सोडले. पॅरिसला गेली आणि लुक **सायमन** नावाच्या चित्रकाराशी तिने लग्न केले. दहा वर्षे ती पिकासोच्या सहवासात होती. मॅडम गिलॉट हिच्या चित्रांची अनेक प्रदर्शने विविध देशात भरली. त्यात फरान्स, इंग्लंड, अमेरिका, जर्मनी व इटली यांचा समावेश होतो. तिने काही नामवंत लेखकांच्या पुस्तकांची मुख-पृष्ठे व आंतर्चित्रे काढली असून तिची काही चित्रे पॅरिस आणि न्यूयॉर्कच्या म्युझियममध्ये लावलेली आहेत.

लेखनिक कार्लटन लेक पॅरिसमध्ये राहतात. 'डिक्सनरी ऑफ मॉडर्न पेंटिंग'चे संपादक. १९५० पासून ते ख्रिश्चन सायन्स मॉनिटरचे 'पॅरिस आर्ट वार्ताहर' म्हणून काम करतात. 'न्यूयॉर्कर' अटलांटिक मासिकातून त्यांचे लेखन प्रसिद्ध होत असते. पिकासो, छागल आणि हेन्री मूर यांज-वरच्या 'अटलांटिक' मासिकाच्या मुख-पृष्ठावरच्या चित्रांनी नवचित्रकारांच्या 'पोर्ट्रेट्स्'बाबतच्या दुनियेत चांगलीचधमाल उडवून दिली होती.

डेव्हिड डग्लस डंकन हा प्रेस फोटो-ग्राफर ! पिकासोच्या पंचाहत्तराव्या वाढ-दिवसाच्या निमित्ताने पिकासोचा पाहुणा म्हणून त्याच्याकडे राहिला. हजारभर चित्रे (छायाचित्रे) त्याने घेतली. मिळतील तशी, मिळतील त्यावेळची, मूडची–अमाप ! त्याच्या पुस्तकातले चित्रांकन खरोखरच जीवनदृष्ट्या आणि कलादृष्ट्या सुरेख आहे. प्रेक्षणीय आहे. पण डंकनच्या कॅमेऱ्याची नुसती काचच 'सेन्सिटिव्ह' नाही. त्याचं मनही तितकंच सेन्सिटिव्ह आहे. ह्याचा प्रत्यय प्रस्तुत पुस्तकात येतो. तो केवळ छायाचित्रकार नाही तर तो भाष्यकारही आहे. सूक्ष्म अवलोकन करणारा, ते रसिक-तेने टिपणारा आणि त्या अनुभवांना सुरेख शब्दांचा साज चढविणारा रसिकराज आहे हेही जाणवते. ह्या दोन पुस्तकातून घडलेले पिकासोच्या भेट-रंगी, रसील्या, काहीशा विक्षिप्त अशा जीवनाचे दर्शन मराठी कला-रसिकांना घडविण्याची इच्छा धरून हा प्रपंच केला आहे.

'फ्रॅकॉइज् गिलॉट'ला पिकासोचे जे दर्शन घडले त्याचे रेखांकन करणाऱ्या पुस्तकाचा परिचय प्रथम करून घेणे हे दोन दृष्टींनी मला महत्त्वाचे वाटते. एकतर ती स्वतः चित्रकर्ती होती (व आहे) आणि दुसरे म्हणजे पिकासोच्या जीवनात ज्या काही स्त्रिया आलेल्या दिसतात त्यातली ती एक आहे. दहा वर्षांचा कालखंड हा कलात्मक व कौटुंबिक जीवनाच्या दृष्टीने लहान कालखंड खासच नव्हे. जवळीक लाभलेल्या व कलात्मक दृष्टी असलेल्या स्त्रीच्या दृष्टीतून टिपलेला पिकासो कसा होता ?

### पिकासोची पहिली भेट

पिकासोची आणि गिलॉटची पहिली भेट मे १९४२ मध्ये झाली. त्यावेळी फरान्स हा जर्मनांनी जिकलेला प्रदेश होता. वय एकवीस होतं. चित्रकलेचा छंद तिला जडला होता. तिची एक मैत्रिण तिच्याकडे महिना-भर विश्रांतीसाठी व हवापालटासाठी आली होती. तिला आणि **ॲलन कनी** या नावाच्या नटाला घेऊन ती नॉत्रदामच्या जवळच असलेल्या व चित्रकार व लेखक यांचे खास हॉटेल म्हणून सर्वत्र गाजलेल्या **ले कॅटालान** नामक हॉटेलात जेवण्यासाठी म्हणून गेली होती.

हॉटेलात जाऊन बसल्यावर पलिकड-च्याच टेबलावर पिकासो बसलेला तिला दिसला. त्याच्याबरोबर दोन स्त्रिया आणि एक पुरुषही बसलेला होता. पुरुष तिच्या परिचयाचा नव्हता. पण त्या दोन स्त्रियां-







पैकी एक होती मेरी लॉरी वॉलेस तर दुसरी होती डोरा मार! १९३६ पासूनची पिकासोची सहचरी! ती युगॉस्लॉव असून, फोटोग्राफर आणि पेंटरही होती.

पिकासोला तेथे अचानकपणे पाहून तिला आश्चर्य वाटलं. १९३६ साली त्याचा फोटो पाहून त्याची एक वेगळीच प्रतिमा तिने मनात गृहीत धरली होती. काळेभोर केस, अतिशय तेजस्वी डोळे आणि सुदृढ शरीर-यष्टी, मोहक व आकर्षक व्यक्तित्व होते त्या छायाचित्रातल्या पिकासोचे! परंतु त्या पहिल्याच प्रत्यक्ष भेटीत दिसलेला पिकासो वेगळा होता. केस पिकले होते. दृष्टीतली वीज नाहीशी झाली होती. ती दृष्टी क्षीण तरी झाली होती किंवा थकलेली तरी असावी असे गिलॉटला वाटले.



जेवण चालू असताना पिकासोचे लक्ष गिलॉटच्या टेबलाकडे होतं. अधूनमधून त्याच्या हालचाली तशाच होत होत्या. काही शेरे ताशेरेही तो मारीत होता. ते ऐकू यावे इतपत मोठ्याने तो बोलत होता. त्याने कनीला ओळखले होते. बोलताना मिश्किल वा विनोदी असं काही बोलला की तो आपल्या टेबलाशी बसलेल्या सहकाऱ्यांच्या प्रतिक्रिया अजमावून पाहण्याऐवजी तो गिलॉटच्या टेबलाकडे पाही व त्यांच्या प्रतिक्रियांचा अंदाज घेण्याचा प्रयत्न करी. अखेरीस तो उठला आणि गिलॉट, तिची मैत्रिण व नट कनी बसला होता त्या टेब-लाशी आला. येताना त्याने शेरीचा मोठा घड आणला होता. त्यातल्या काही शेरी त्याने त्या तिघांनाही दिल्या.

गिलॉटची मैत्रिण 'जिनीव्ह' देखणी होती. त्यांना शेरी दिल्यानंतर पिकासो कनीला म्हणाला, "तुझ्या त्या मैत्रिणींची ओळख करून दे की!"

कनीने त्यांची ओळख करून दिली आणि मग तो म्हणाला, ह्या दोघींपैकी फ्रॅकॉइज हुशार आहे. आणि जिनीव्ह सुंदर आहे. आणि मग पिकासोकडे वळून तो म्हणाला, "जिनीव्ह एखाद्या ॲटिक् संगमरवरी शिल्पासारखी दिसते नाही का?"

पिकासोने खांदे उडवले आणि तो म्हणाला, "तू एखाद्या नटासारखाच बोलतो आहेस. ही जी हुशार मुलगी आहे तिचं वर्णन तू कसं करशील?"

"फ्रॅकॉइज ही फ्लॉरेंटाइनची कुमारिका आहे." जिनीव्हने उत्तर दिले.

"पण सर्वसामान्य नाही. धर्मातीत व्यक्तित्व लाभलेली कुमारिका आहे ती" कनीने पुस्ती जोडली. सर्वजण हसले.

"सामान्य जातीची नसेल तर सुरेख! पण तुझ्या ह्या मैत्रिणी करतात काय?"

"आम्ही चित्रकार आहोत" जिनीव्ह म्हणाली होती. त्यावर पिकासो हसतच सुटला आणि मग म्हणाला, "आजच्या दिवसाचा हा प्रचंड मोठा विनोदच म्हटला पाहिजे. अशा दिसणाऱ्या (त्याला देखण्या

म्हणायचं असावं) मुली चित्रकार असणं वा होणंच शक्य नाही."

गिलॉटने जिनीव्ह एका आर्ट स्कूलची विद्यार्थिनी असून, सध्या महिन्याच्या रजेवर यथे आल्याचे सांगितले, व स्वतः कुणाचे शिष्यत्व पत्करले नसले तरीही चित्रकार असल्याचेच पटवून देण्याचा प्रयत्न केला. खरं तर त्या दोघींच्या चित्रांचे प्रदर्शन त्यावेळी चालू होते. त्याचीही माहिती तिने पिकासोला दिली.

ती माहिती ऐकून त्याच्या मिश्किल डोळ्यात आश्चर्य तरळले आणि तो त्यांना म्हणाला, "मीही एक चित्रकार आहे. तुम्ही माझ्या स्टुडिओत आलं पाहिजे. माझी काही चित्रं पाहिली पाहिजेत."

"पण कधी?" गिलॉटने उत्सुकतेने विचारले.

"उद्या, परवा–कधीही या की" तो म्हणाला.

त्यांनी त्याला तारीख दिली. 'जशी तुमची मर्जी' असं म्हणत व शेरीचा उरलेला घड घेऊन तो आपल्या टेबलाशी गेला. त्यानंतर ती मंडळी उठून गेली.

ठरल्याप्रमाणे जिनीव्ह आणि गिलॉट पिकासोच्या स्टुडिओत गेल्या. बऱ्याच वेळाने दार उघडले गेले व पिकासोच्या कार्यवाहाने दार अर्धवट उघडून फटीतून आपलं लांब नाक बाहेर काढून त्यांना विचारलं, "मुलाखत आधी ठरली आहे काय?" उत्तर होकारार्थी आल्यावर त्याने दार उघडले व त्या दोघींना आत घेतले. तरीही त्याच्या जाड भिंगाच्या चाळिशीत चिंता डोकावत होतीच!

आत जाताच त्यांना ज्या खोलीत बसवलं होतं त्या खोलीत विविध पक्षी होते. पक्ष्यांचे विविध अवयव, भाग होते. काही लहान रोपं होती. त्यातल्या एका सुरेख रोपाचा उपयोग पितळी फुलदाणीत करून पिकासोने **'डोरा मार'**चा एक सुरेख पोर्ट्रेट केला होता. दुसऱ्या खोलीत त्या गेल्या तेव्हा तेथे गिटार, मेंडोलिन होते आणि ती वाद्ये तेराव्या लुईच्या काळातल्या जुन्या सोफ्यावर पडून होती. क्युबिस्ट काळाची चित्रे रंगवताना पिकासोने त्या वाद्यांचा वापर केला असावा, असा समज गिलॉटने करून घेतला होता. परंतु खरा प्रकार उलटा होता. पिकासोने चित्रे आधी काढली होती. वाद्ये नंतर घेतली होती आणि आता स्मरण म्हणून ती जपली होती... त्या खोलीत खूप मोठे टेबल होते–त्यावर माणसाच्या डोक्याच्या आकाराचे एक दगडी शिल्प होते. त्यात खोवण होती, खोवणीत पाणी होते. पुस्तकं, मासिकं, फोटो, हॅटस्, कपडे, विविध आकारांचे बूट या गोष्टी तिथे इतस्ततः पडल्या होत्या. पलिकडल्या खोलीत जाण्यासाठी जे दार होते त्या दाराशी एक निळसर पदार्थ दिसत होता. सेक्रेटरी सॅबरटीस तेथे घोटाळत होता. त्याला धक्का लागू नये म्हणूनही असेल. ब्रांझमध्ये घडविलेली ती एक मानवी कवटी होती.

पलिकडच्या खोलीत स्टुडियो होता. तेथे असंख्य शिल्पाकृती होत्या. अनेकविध आकाराची स्त्रियांची मुंडकी, सायकलची हँडल्स, कॅनव्हासचे तुकडे आणि एका हाती सफरचंद आणि दुसऱ्या हाती गरम पाण्याची पिशवी घेतलेला एका स्त्रीचा पुतळा तेथे होता. एका चित्राकडे पहात गिलॉट म्हणाली, "मॅटिसीने काय सुरेख चित्र काढलंय्."

कार्यवाहाने मागे पाहिले आणि तो म्हणाला "इथं सर्व काही पिकासोचं आहे."

ठेंगण्या जिन्याने त्या वरच्या मजल्यावर गेल्या. एका खोलीत पिकासो बसला होता. त्याच्या भोवती सात-आठ माणसांचा घोळका होता. त्यांना पाहताच तो प्रसन्नपणे हसला. बाहेर आला आणि म्हणाला, "चला तुम्हाला स्टुडिओ दाखवतो. आवडेल? त्यांना तो खालच्या मजल्यावरच्या स्टुडियोत घेऊन गेला. म्हणाला "इथे एका विणकराचे वर्कशॉप होते. वरची जागा एका नटाकडे होती." मग त्याने कुठली चित्रं तिथे रंगविली. कुठली वरच्या खोलीत रंगवली ते सांगितले. परंतु चित्रे

दाखविण्याऐवजी इतर फालतु गोष्टीच दाखवीत बसला. खोदकाम करतो तो कोपरा दाखवला. गरम पाण्याचा नळ दाखवीत म्हणाला, "गरम पाण्याची आंघोळ करायची असली तर केव्हाही इथे या."

त्या दोघींना चित्रे पहायची होती. ती सोडून पिकासो सारं काही दाखवीत होता. पण अखेरीस त्याने काही चित्रे दाखविली... एक वाजण्याच्या सुमारास मंडळी पांगली. त्या स्टुडिओला पिकासोच्या धर्ममंदिराचे स्वरूप असून येणारा-जाणारा प्रत्येक माणूस त्या धर्माशी एकात्म झाल्याच्या साक्षात्काराने जाताना दिसत होता असं गिलॉट आपल्या पहिल्याच भेटीच्या अनुभवांची नोंद करताना म्हणते. या सर्व प्रकारात पिकासो मात्र अगदी त्रयस्थपणे अन् तटस्थपणे वावरताना दिसत होता. जणू धर्मपीठाचा गुरु म्हणून त्यांला दिल्या जाणाऱ्या मानसन्मानाची त्याला फारशी कदर नव्हती. गरज नव्हती.

त्या परत जायला निघाल्या तेव्हा पिकासो म्हणाला, "पुन्हा यावंसं वाटलं तर अवश्य या. केव्हाही या. पण मक्केच्या यात्रेकरूसारख्या येऊ नका. मी तुम्हाला आवडत असलो, माझ्या सहवासात तुम्हाला आनंद वाटत असला, आणि माझ्याशी सरळ सरळ स्नेह राखावा असं वाटत असलं तर या. माझी चित्रंच पहायची असली तर म्युझियममध्ये ती बघायला मिळतीलच."

त्याच्या ह्या म्हणण्याकडे गिलॉटने फारसं गंभीरतेने पाह्यलं नाही. कारण एक तर पॅरिसमधल्या कोणत्याही म्युझियममध्ये पिकासोची चित्रं नव्हती. आणि पिकासोचे नाव जर्मनांनी 'चित्रकारांच्या काळ्या यादीत' घातल्याने कुणी खाजगीरीत्या सुद्धा त्यांचे प्रदर्शन मांडण्याची शक्यता नव्हती. चित्रांच्या पुस्तकातली चित्रं पाहून कुणाही खऱ्या चित्रकाराचे समाधान होण्याची शक्यता नव्हती. त्यामुळे पिकासोची चित्रे पहायचीच तर पिकासोच्या स्टुडियोत पुनःपुन्हा जाणं हा एकच मार्ग होता.



गिलॉटने तो मार्ग अनुसरलेला दिसतो.

**अहो आश्चर्यम्!**

पिकासोचा स्टुडियो पाहून आल्यानंतर एक दिवस गिलॉट, ज्या आर्टगॅलरीत तिचे आणि जिनोव्हचे चित्रप्रदर्शन भरले होते त्या गॅलरीत गेली. प्रदर्शनाची व्यवस्था करणारी स्त्री तिला म्हणाली, "आताच काही वेळापूर्वी एक बुटका, तीक्ष्ण डोळ्यांचा माणूस येऊन प्रदर्शन पाहून गला. तो पाहून गेल्यावर तो पिकासो असल्याचं त्या स्त्रीच्या ध्यानी आलं होतं. त्याने अतिशय सूक्ष्मतेने चित्रे पाहिली. पण काहीही अभिप्राय न देता तो निघून गेला होता. तिन हे घरी जाताच जिनोव्हला सांगितले, "मुद्दामच आपली चित्रं किती वाईट आहेत हे बघण्यासाठी आणि असल्या स्त्रिया चित्रकार होऊच शकत नाहीत हे विधान कसं खरं आहे हे पडताळून पाहण्यासाठीच पिकासो मुद्दाम प्रदर्शन बघायला गेला असावा" असं ती जिनोव्हला म्हणाली.

जिनोव्हने मात्र अधिक चांगला अर्थ त्यातून काढला, "मला वाटतं की तरुण कलाकारांच्या कलेत त्याला खरोखरच रस वाटत असावा."

गिलॉटला ते पटले नाही. ती म्हणाली, "फार तर असं म्हणता येईल की त्याच्या ह्या करण्यात कुतुहलाचा भाग अधिक आहे. खरोखरच आपल्या कलाकृतीत काही दम आहे की नाही हे त्याला पहायचं असेल."

"फारच अश्रद्ध दिसतेस बाई तू! मला तर तो फार उदार, खुल्या दिलाचा आणि साधा अन् सरळ वाटला."

"आपण साधं अन् सरळ दिसावं असा त्याचा प्रयत्न असतो. तू म्हणतेस ते खरं नाही. त्याच्या डोळ्यात मी जे पाह्यलं आहे ते सरळ, साधं नाही खास! त्याला मी घाबरले नाही. घाबरतही नाही. त्या दृष्टीत मला आव्हान आणि आवाहन दिसलं. त्यामुळे मला परत पिकासोकडे पुन्हा एकदा फेरी मारावी असं मात्र मनोमन वाटलं" गिलॉट म्हणाली

आणि—नुसतं म्हणालीच असं नाही तर एका सप्ताहानंतर गेलीही! जाताना फुलांचा गुच्छ घेऊन गेली. त्यांच्या हातातली फुलं पाहताच पिकासो खदखदून हसला आणि म्हणाला "म्हाताऱ्या माणसाला कुणी फुलं देतात?" आणि तो गिलॉटच्या पोषाखाकडे पहातच राहिला. बॉडी कलर फ्रॉक तिने घातला होता. "प्रत्येक गोष्टीचा तू फार बारकाईने विचार करतेस हं. मला उमगलय् ते!"

गिलॉटने जिनीव्हची 'ढाल' केली अन् ती म्हणाली, "सौंदर्य इथे आहे. बुद्धिमत्ता तिच्या पाठीशी आहे."

त्यांच्याकडे रोखून पहात पिकासो म्हणाला, "ते अजून पहायचंय्! मला आता तरी दोन शैलींची दर्शनं घडताहेत! आर्केक् ग्रीस आणि जीन गोजॉन यांचं!"

त्या दिवशी त्याने त्या दोघींपुढे चित्रांचा जणू पिरॅमिडच उभा केला. जणू एक कलानगरच त्या खोलीत अवतरले. भरपूर चित्रं दाखवून झाल्यावर तो त्यापासून दूर झाला आणि गिलॉटकडे रोखून पहात म्हणाला, "मी तुझ्या चित्रांचं प्रदर्शन पाह्यलं" कसं काय वाटलं? हे विचारण्याची हिंमत काही तिला झाली नाही. तो पुढे म्हणाला "तुला चित्रकलेची चांगली देणगी लाभलीय्. तू खूप काम करायला हवं. दररोज करायला हवं. तुझी कसकशी प्रगती होते आहे हे पाहण्यात मला रस वाटेल. वेळोवेळी भेटून तू जे काही करतेस ते मला दाखवशील अशी मला आशा वाटते." अन् मग जिनीव्हकडे वळून म्हणाला "तुला योग्य तोच गुरू लाभला आहे. **मायलोल** योग्य आहे." त्यानंतरही तो काहीशा जिव्हाळ्याने तिच्याशी (गिलॉटशी) बोलला. घरी जावं. खूप काम करावं चित्रात अन् रंगात रंगून जावं असं गिलॉटला वाटलं.

## "चित्रातली माणसं भेटली"

जिनीव्ह गावी निघून गेली... गिलॉटला वाटलं पिकासोकडे जावं. त्याला नवी चित्रं दाखवावी. पण तेवढ काम झालं नव्हतं. 'पण नुसतं गेलं म्हणून काय बिघडलं?' तिनं स्वतःच्या मनाला हा प्रश्न वारंवार विचारला. पिकासोचं आमंत्रण अनौपचारिक होतं. ती विनाआमंत्रण गेली असती तरी पिकासोनं तिचं स्वागतच केलं असतं. तिलाही ते स्वागत मनापासून हवं होतं असं दिसतं.

गिलॉट त्याला भेटली होती तेव्हा दरवेळी जिनीव्ह तिच्याबरोबर असायची. ती एकटी कधी गेली नव्हती. पिकासोच्या चित्रातून काही सूत्र असे. १९३० च्या सुमारास काढलेल्या चित्रातून हे सूत्र अधिक प्रभावीपणे व सातत्याने येत होते. ते सूत्र असं होतं असं दिसतं:

एका चित्रात असायच्या दोन स्त्रिया. त्यात एक सुंदर, गोरीपान आणि दुसरी कुरुप अन् काळी. एकीला सुरेख आकार, अंगलट लाभलेली तर दुसरी आंतरसंघर्षात वडून जाऊन सौष्ठव गमावून बसलेली. चित्रात रेखाटलेली पण बरंचसं काही रेखाटन राहून गेलेली अशी! पिकासोने त्या दोघीना प्रथम जेव्हा पाहिलं तेव्हा त्याच्या चित्रातले सूत्र घेऊन आलेल्या दोन स्त्रियाच जणू त्याला दिसल्या असाव्या. जिनीव्ह ही रूपयौवना होती. गिलॉट मात्र सतत अस्वस्थ, अशांत, आत कसला तरी संघष सतत चालू असलेली अशी होती. पिकासोला जणू तो आपल्याच मनाचा प्रतिध्वनी आहे असं वाटलं असावं. त्यातूनच गिलॉटची एक प्रतिमा त्याच्या मनावर उमटली असावी. एकदा तो तिला म्हणाला, "वीस वर्षांपूर्वी मी चित्रित केलेल्या व्यक्तींनाच जणू मी भेटतो आहे" या साक्षात्कारातूनच त्याने त्या दोघीत रस घेतला असावा.

## 'रंग'रस की 'मधु'रस?

गिलॉट त्याला भेटायला गेली. पण 'चित्रकर्ती' म्हणूनच. त्याला आपल्यात रस वाटत नसून त्याहून अधिक काही रस घेण्याची त्याची एकूण इच्छा असावी असं तिच्या लक्षात यायला फारसा वेळ लागला नाही. काही ना काही तरी कारण काढून तो दहा माणसातून उठून बाजूला जायचा आणि गिलॉटलाही तेथून यायला सांगायचा. "रंगाच्या काही ट्यूब्स् देतो चल" असं निमित्त त्याने पहिल्यांदा सांगितलं पण ट्यूब देण्याचं आपलं उगाच निमित्त. हेतू निराळाच" हे तिने ओळखलं. ती म्हणाली "तुम्हीच आणून द्या ना!"

त्याचा सेक्रेटरी सॅबर्टीस तिथेच होता. तो म्हणाला, "तुम्हीच खरं तर आणून द्यायला हरकत नाही."

"का बरं? समजा मला तिला भेट द्यायची आहे. तर भेट घेण्यासाठी म्हणून ती चार पावलं चालली तर काही बिघडेल?"

## पेशा ललना जलधारांनी

एकदा गिलॉट पिकासोच्या स्टुडियोकडे सायकलवरून जायला निघाली. सायकल हे वाहन तिला फार सोयीचे वाटत होते. रस्त्यात अचानकपणे खूप पाऊस आला. आणि गिलॉटचे केस निथळू लागले. तशा स्थितीत तिला पाहताच पिकासो म्हणाला, "सॅबरटीस, बघ त्या पोरीची अवस्था बघ. तिला निथळत राहू देणं बरं नाही" आणि तिचा हात धरून ओढीत म्हणाला "चल बाथरुममध्ये. मी तुझे केस पुसून काढतो."

त्यावर त्याचा सेक्रेटरी त्याला म्हणाला, "पाब्लो, मी हे काम इनाकडून करून घेऊ शकेन. कदाचित ती जास्त चांगलं करील."

"इनाला राहू दे. असेल तिथेच! तिला तिची कामं करूदे." असं म्हणत पिकासोने गिलॉटला बाथरूममध्ये नेले आणि तिचे सारे केस त्याने टॉवेलने कोरडे केले.

तशी सहजसुलभ संधी पिकासोला नेहमीच मिळाली नाही. त्याला कारणे शोधावी लागत. नवनवीन. पटतील अशी! अर्थ एकच होता. त्याच्या ह्या






अनुक्रमणिका








चालीबावत गिलॉटची प्रतिक्रिया स्वागताची होती की तिरस्कार–रागाची होती ते पाहणं आणि त्याच्या ह्या पावलांची साद घेणं, त्यातून त्याच्या भावनांचं दर्शन घडवून घेणं—गिलॉटच्या दृष्टीने ती एक गंमतच होती.

एकदा तो तिला म्हणाला, "चल मी तुला म्युझियम दाखवतो" असं म्हणत शिल्पालयाच्या जवळच्या एका लहानशा खोलीत तो तिला घेऊन गेला. तेथे गेल्यावर तो म्हणाला, "हे माझे खरेखुरे धन आहे" आणि त्याने तिला असंख्य मोठी चित्रे व चिल्पाकृती दाखविल्या. एका कोपऱ्यात एक हाडाचा सपाट तुकडा पडलेला होता. तो तीन इंच लांबीचा होता. त्यावर दोन्ही बाजूंनी समांतर रेषा आखलेल्या होत्या. त्या कंगव्याच्या दातासारख्या दिसत होत्या. वरच्या बाजूला दोन ढेकूण द्वंद्व खेळताहेत असं चित्रित केलं होतं. "हे काय प्रकरण ?" असं गिलॉटनं त्याला विचारलं. तो म्हणाला, "हा आहे उवांचा कंगवा ! हा मी तुला देऊ शकतो. पण मला वाटतं ह्याचा तुला फारसा उपयोग नाही." असं म्हणत त्याने केसातून वरपासून खालपर्यंत हाताची बोटे फिरवली. आणि म्हणाला, "तुझे केस चांगले आहेत. त्या कंगव्याचा तुला काही उपयोग नाही."

खोलीच्या मध्यावर तिला एक नऊ इंची पुतळा दिसला. त्याचे नाव होते, "ए ग्लास ऑफ ॲबसिंथ"मध्ये एक भोक होते. त्यात एक चमचा होता. त्या चमच्यावर साखरेची क्यूब होती. "तू जन्मायच्या पूर्वीच मी हा केला १९१४ साली : आधी मेणाचं मॉडेल मी केलं. मग ब्रॉंझमध्ये सहा तयार केले. मग तीच कल्पना मी सहा प्रकाराने चित्रित केली. इकडे ये. तुला हे आवडेल." असं म्हणत तिला तिच्या कमरेभोवती हात घालीत तो तिला खोलीच्या दुसऱ्या टोकाला घेऊन गेला. तेथे एका काड्याच्या पेटीवर त्याने एका स्त्रीचे तोंड चित्रित केलेले होते. दोन तीन वर्षांपूर्वीच त्याने ते केले होते. मग त्याने सिगरेटच्या पाकिटावर चित्रित केलेल्या, आरामखुर्चीत विश्रांती घेत असलेल्या स्त्रियाही दाखविल्या. त्या करताना त्याने दोरा, विणलेला मोठा दोरा–वगैरेचा उपयोग करून वास्तवाचा आभास उत्पन्न करण्याचा प्रयत्न केला होता. "चित्र आणि शिल्प या मधला हा प्रकार आहे असं मला वाटतं." पिकासो तिला म्हणाला.

• • •

**(क्रमशः–पुढील प्रकरण जानेवारी १९७१ )**

(पान १७ वरून–बेट)

दडून बसलो म्हणून.

**तारामती** : त्यात काय बिघडलं ? आमचं कामच आहे ते .

**महेश** : तुला नसेल, पण मला शिमारी वाटते आहे. आमच्या-बद्दल, माझ्याबद्दल. इथे उतरल्यापासून आम्ही किती निर्दय-पणानं, नीचपणानं वागतो आहोत तुमच्याशी ? तू आपल्या हातानं सामान उतरवलंस, झोपडी उभारलीस, मैलभर जाऊन पाणी आणलंस, अन्न शिजवलंस आणि वाघाला हाकलताना आपले प्राणही संकटात घातलेस. हे कशासाठी ?

**तारामती** : मी नोकर आहे.

**महेश** : या बेटावरसुद्धा ?

**तारामती** : इथे काय वेगळं आहे ?

**महेश** : माणूस नसलेल्या या जगात सारंच वेगळं आहे. सगळे संबंध नव्याने उभे करायचे आहेत इथे.

**तारामती** : मला कळत नाही ते. एकच कळतंय् की इथंही राजे-साहेब आहेत, राजकन्या आहे. आणि मी त्यांची जन्माची गुलाम आहे.

**महेश** : ही गुलामगिरी तू झुगारलीस तर कोण रोखणार आहे तुला ?

**तारामती** : माझंच मन.

**महेश** : तेच म्हणतो मी. तुझ्या स्वातंत्र्याच्या मार्गात फक्त तुझ्याच मनाची अडचण आहे.

**तारामती** : पण तीच अडचण सर्वांत मोठी असते.

**महेश** : मोठी असते, पण खरी नव्हे.

**तारामती** : खरी नाही ?

**महेश** : तू स्वतंत्र व्हायचं ठरवलंस की तू स्वतंत्र होऊ शकतेस. इथे राज्य करायची साधनं तुझ्याजवळ आहेत. राजाजवळ नाहीत किंवा राज्यकन्येजवळ नाहीत.

**तारामती** : (खाली मान घालून) (व डोळे उचलून त्याच्याकडे पाहात) होय. पण हे कशाकरता तुम्ही मला सांगताहात ?

**महेश** : तू या बेटाची राणी व्हावंस असं वाटतं मला. तुझा हक्क आहे तो.

**तारामती** : तुमचा काय फायदा आहे त्यात ?

**महेश** : काहीच फायदा नाही. मी कवी आहे म्हणूनच कदाचित् हा रिकामा उद्योग मी करीत असेन. मी त्यांच्यामध्ये राहतो, त्यांच्यासारखाच वागतो. कठोरपणानं, हलकटपणानं आणि भेकडपणानंही. फरक इतकाच की न्यायअन्यायाची कळ माझ्या काळजात उठते, जी त्यांच्या काळजात उठत नाही.

**तारामती** : (भारावून जाते) महेश ! तुम्ही––

**महेश**: (तिचा हात हातात घेऊन) तू मला आवडतेस. तारा. असं



(दीपा. २२)

वाटतं की झोपडी बांधणाऱ्या तुझ्या हातांची, वाघाला पिटाळण्यासाठी जंगलातून धावणाऱ्या तुझ्या पायांची सहस्र चुंबनं घ्यावीत–

**तारामती** : माझ्यासारखीशी तुम्ही–तुम्ही–लग्न कराल ?

**महेश** : वेडी ! इथे कोण भिक्षुक आहे मंगलाष्टकं म्हणायला ? जिथे समाज, तेथे लग्न. इथे प्रश्न आहे फक्त प्रेमाचा.

**तारामती** : पण बाईसाहेब–

**महेश** : तिच्याविषयी मला काहीही वाटत नाही आता.

**तारामती** : आणि उद्या आपण परत गेलो तर ?

**महेश** : तरीही तूच–तूच–माझ्या अंतःकरणाची, जीवनाची मालकीण होशील. तिथेही. (तिला जवळ घेतो.)

**तारामती** : महेश !

(डोळे मिटून त्याच्या छातीवर डोके ठेवते. तेवढ्यात मागच्या बाजूने सुरेखा येते. हे दृश्य पाहून खिळून उभी राहते. त्यांचे लक्ष वेधण्यासाठी हातातील फांदी जमिनीवर आपटते. दोघे बाजूला होतात.)

**सुरेखा** : (ओरडते) तारे–

**तारामती** : बाईसाहेब, क्षमा करा मला.

**सुरेखा** : क्षमा मूर्खांनी करायची असते. राज्यकर्त्यांनी शिक्षा करायची असते.

**तारामती** : शिक्षा ?



**सुरेखा** : होय, शिक्षा. आजपासून चार दिवस तुझं जेवण बंद. अजिबात बंद. आणि रात्री झोपडीच्या बाहेर, अंथरुणापांघरुणाशिवाय खडकावर झोपायचं तू.

**तारामती** : पण बाईसाहेब–

**महेश** : एक शब्द जास्त बोलशील तर या काठीनं फोडून काढीन.

**सुरेखा** : वेळ पडली तर तुम्हालाही ! जा झोपडीमध्ये. बाबांनी तुम्हाला बोलावलंय् सोंगट्या खेळण्यासाठी.

**महेश** : (जाताना थबकून) पण माझं जरा ऐकशील का ? यात ताराचा काहीच दोष नाही–

**सुरेखा** : (ओरडते) जा म्हणजे जा ! आणि शंभूला पाठवून द्या. (महेश खाली मान घालून जातो. सुरेखा खडकावर बसते. तारामती झाडाला टेकून उभी आहे.)

**सुरेखा** : तारे, ही वेळ माझ्या प्रार्थनेची आणि चिंतनाची आहे. मी आता शांत झाले आहे. आम्हा राजेरजवाड्यांच्या घरांमध्ये मिठ्या मारण्याचं महत्त्व नाही. महत्त्व असतं अधिकाराचं, हक्कांचं. आणि हे अधिकार फक्त प्रेमानं मिळू शकतात. म्हणून तुला विचारते, महेशचं तुझ्यावर प्रेम आहे ?

**तारामती** : मला माहीत नाही.

**सुरेखा** : तुझं महेशवर प्रेम आहे ?

**तारामती** : मला सांगता येणार नाही.

**सुरेखा** : मग तुझी शिक्षा कायम झाली आहे. तू नाही म्हटलं असतंस तर मी तुझी शिक्षा माफ केली असती. जा आता नाही. (शंभू येतो.) शंभू–

**शंभू** : जी, सरकार.

**सुरेखा** : या तारेला आज जेवायला द्यायचं नाही. आज नाही, उद्या नाही, चार दिवस नाही.

**शंभू** : जी सरकार, तिनंच स्वयंपाक केला आहे, आणि तिलाच करता येतो तो.

**सुरेखा** : तरीही नाही ! माझा हुकूम आहे हा. तारे, झऱ्यावर जा आणि कळशीभर पाणी घेऊन ये. प्रार्थना करण्यापूर्वी मला हातपाय धुवायचे आहेत. आणि एक चटईही घेऊन ये.

**तारामती** : (स्वस्थ उभी राहते)

**सुरेखा** : ऐकायला आलं की नाही ?

**तारामती** : आलंय्.

**सुरेखा** : मग जा तावडतोब.

**तारामती** : समुद्रावर जा आणि हातपाय धुऊन या.

**सुरेखा** : (क्रोधानं उठून) तारे, तू शुद्धीवर आहेस का ? कुणाशी बोलते आहेस तू ?

**तारामती** : माझ्या दासीशी.

**सुरेखा** : दासीशी ?

**तारामती** : (पुढे येते) या घटकेपासून मी येथली राजकन्या – नव्हे राणी आहे.



अनुक्रमणिका

**सुरेखा** : तू राणी ? माझी दासी ?

**तारामती** : होय. तुमची पूर्वीची दासी. या शंभूला मी माझा सेनापती नेमते आहे. ज्यांच्यात सामर्थ्य असेल त्यांनी आमच्याशी मुकाबला करावा आणि आम्हाला पदच्युत करावं.

**सुरेखा** : (फांदी उगारुन) अस्सं काय ?

**तारामती** : सेनापती, लढाई पुकारायची का ?

**शंभू** : (डोके खाजवीत) मला वाटतं, वेळ आली आहे ती.

**तारामती** : ठीक आहे. तुमचा असाच सल्ला असला तर माझी हरकत नाही. मग कसं करावं वरं ? या सुरेखाला समुद्रात बुडवायची का ?

**शंभू** : त्यापेक्षा त्या पलीकडच्या पहाडावरून खाली लोटावी. असं मला वाटतं.

**तारामती** : की आठ दिवस उपाशी ठेवून तिची गंमत पाहावी ?

**शंभू** : ते तर फारच छान ! नाहीतर जंगलात नेऊन झाडाला बांधून ठेवावी. ते वाघ येतील पुन्हा.

**सुरेखा** : (इतका वेळ स्तंभित होऊन ऐकत असते. आता भीतीनं स्फोट होऊन किंचाळते) बाबा ! महेश !

**राजेसाहेब** : (प्रवेश करुन) काय झालं बाळ ?

**सुरेखा** : ही चांडाळीण म्हणते की–

**तारामती** : राणीचा अपमान होतो आहे. सेनापती, उचला ती फांदी आणि मारा पंधरा फटके.

**शंभू** : होय, राणीसाहेब. (फांदी उचलतो.)

**सुरेखा** : (तारामतीच्या पायाशी कोसळते) क्षमा करा– क्षमा करा मला. मी असं पुन्हा बोलणार नाही. तुम्ही सांगाल ते ऐकेन मी.

**तारामती** : (तिला उठवते) ऊठ. तुम्हा लोकांजवळ फक्त शिक्षा आहे, पण आमच्याजवळ क्षमाही आहे.

**राजेसाहेब** : ही काय भानगड आहे ?

**तारामती** : ही भानगड नाही. ही राज्यक्रांती आहे.

**राजेसाहेब** : म्हणजे आम्ही आता राजे नाही ?

**तारामती** : नाही. आता मी राणी आहे.

**राजेसाहेब** : चालेल. मी राजा आणि तू राणी. आपल्याला काय ?

**तारामती** : तसं नव्हे. तुम्ही आता सामान्य प्रजाजन झाला आहात. तुम्हाला राज्यावरुन काढून टाकण्यात आलं आहे.

**राजेसाहेब** : एकूण सगळ्याच बायका आमच्या राज्याच्या मुळावर आल्या आहेत! पण मी राज्याशिवाय दुसरं काय करू शकणार ?

**तारामती** : तूर्त तुम्ही लाकडं गोळा करा. आणि सुरेखा, तू आजपासून पाणी आणायचं आणि धुण्याचं काम करायचं.

**सुरेखा** : राणीसाहेब सांगतील ते करीन मी.

**तारामती** : जा झऱ्यावर आणि घेऊन ये पाणी. शंभू, तिला झऱ्याचा रस्ता दाखव. जा–

**शंभू** : होय, सरकार.

(जाऊ लागतात. तेवढ्यात महेश येतो.)

**महेश** : थांबा ! हे नाटक इथेच संपलं आहे. सुरेखा, तू इथे आम्हाला एकत्र पाहिलंस तेव्हापासून या क्षणापर्यंत तारामतीनं सगळं नाटक केलं. केवळ नाटक. आणि तेही माझ्या सांगण्यावरून. सर्वांना कामाची सवय व्हावी म्हणून. या वनवासात मालकाच्या भूमिकेवरुन आपण माणसाच्या भूमिकेवर यावं म्हणून. परंतु आपला वनवास आता सुदैवानं संपला आहे. आपली सुटका झाली आहे.

**राजेसाहेब** : सुटका झाली ?

**महेश** : होय. आपले खलाशीही जवळपासच्या बंदरात जिवंत पोचले असावेत. आपली मुक्तता करण्यासाठी एक छोटी बोट या बेटाच्या किनाऱ्याकडे येत आहे. मी आताच दुर्बिणीतून पाहिली ती. चला, सामानसुमान आवरा. एक मलंबुरं स्वप्नं संपलं.

**तारामती** : (हरवल्याप्रमाणे) स्वप्नं ?

**महेश** : हो, स्वप्नंच. जे झालं ते सर्वांनी विसरायचं आता. तारा, तुझं राज्य संपलं. सुरेखा, तुझं दासीपण संपलं. चला सगळेजण. (आत भोंग्याचा कर्कश आवज होतो.) हा पाहा, बोटीचा भोंगा वाजतो आहे. पुन्हा पूर्वीच्या जगात बोलावतो आहे तो आपल्याला.

**सुरेखा** : महेश, मी या नाटकाबद्दल तारेला क्षमा करीन पण तुम्हाला नाही ! (हसते) चल तारा, शंभू, मीही मदत करते तुम्हाला, बिऱ्हाड आवरायला. बाबा, चला. ती शंखशिंपांची गाठोडी मात्र हरवू नका. या स्वप्नाची देणगी म्हणून ती जपून ठेवायला हवी.

–पुन्हा तोच भोंगा वाजतो व पडदा पडतो.–

●●●

[ स्वतःच्याच एका कथेवरुन ● सर्व हक्क सुरक्षित. ]












अनुक्रमणिका



# SUCCESSOR

## मेसर्स काशिनाथ दामोदर नायक

या व्यापारी जगतात मानमान्यता पावलेल्या पेढीची

## ‘सुवर्ण महोत्सवी’ उद्यमशीलता



**श्री. सुरेंद्र श्री. नायक**

**श्री. सत्येंद्र श्री. नायक**

लक्ष्मी आणि सरस्वती यांची रास सहसा जुळत नाही असं म्हणतात. सरस्वतीचं वरदान घेऊन आलेले महाभाग लक्ष्मी-कडून पुष्कळदा शापितच राहतात आणि बरेचसे लक्ष्मीधर बौद्धिक पुरुषार्थात कंगाल असल्याचेच पुष्कळदा आढळून येते. परंतु असा संगम जेथे नांदताना दिसतो तेथे तो प्रत्यक्ष श्रींची वस्ती असल्याचा साक्षात्कार लाभतो. मन तृप्त होते.

कै. काशिनाथ दामोदर नायक यांचे नाव माहीत नसेल असा गोमंतकीय साहित्यिक वा साहित्य रसिक नसेल. तसेच हे नाव ठाऊक नसलेला व्यापारीही गोमंतकात व मुंबईत नसेल. उद्योगाने उद्योग वाढतो व उद्योगसमुह निर्माण होतात. आणि व्यावसायिक संस्थाने वा अधिराज्ये निर्माण होतात. आणि व्यापार-उदिमात ते अपरिहार्यही असते.

मेसर्स काशिनाथ दामोदर नायक ह्या नावाने मुंबईत ११ नोव्हेंबर १९२० ला एक दलालीचा धंदा सुरू झाला. ‘गोमंतकाची सांस्कृतिक घडण’ सांगणारे व साहित्य व समाजाची विविध प्रकारे सेवा करणारे नायक व्यवहारात पडले. नायक हे मडगावचे. गोव्यात पोर्तुगीजांची राजवट चालू होती. त्यामुळे कापड व अन्नधान्याव्यतिरिक्त बाकीच्या गरजेच्या वस्तु परदेशातून आणल्या–आणविल्या जात. गोव्याला ‘सागरी सोयी’ (बंदरे) असल्याने ते सहजशक्यही होते. पण अन्न व खाद्यपदार्थ व कापडचोपड मात्र मुंबईहून आणविले जाई. त्यामुळे ह्या दोन वस्तु गोमंतकातील नायकांच्या स्वतःच्या व अन्य दुकानदारांना उपलब्ध करून देण्यासाठी एक सोयीचे माध्यम म्हणून **मे. काशिनाथ दामोदर नायक** ह्या पेढीचा १९२० सालच्या दिवाळीत जन्म झाला. मुंबईच्या पेढीचे व्यवस्थापन कै. सदाशिवराव दाभोळकर व काशिनाथ केंकरे यांच्यासारख्यांनी केले. परंतु १९४३ साली ही माणसे जेव्हा निवृत्त झाली तेव्हा अनुभवाअंती श्री. नायकांनी असा निर्णय घेतला की, व्यापारात स्वतः व्यवस्थापन केल्याशिवाय व्यापार-उद्योगात सुगीचे दिवस येत नाहीत. त्याला अनुसरून त्यांनी आपल्या द्वितीय चिरंजीवांना–श्री. श्रीधरपंताना मुंबई शाखेची सर्व सूत्रे हाती घेण्याची विनंती केली.

वास्तविक पाहता श्रीधरपंतांनी ‘एम्. एस्सी.’ची पदवी संपादन केलेली होती. आणि त्यांच्याबद्दलच्या विश्वासापोटी प्रो. लवंदे (झेवियर कॉलेजचे प्राध्यापक व नंतर डेंपे कॉलेजचे प्राचार्य) यांनी श्रीधरपंतांची आणि ‘युनिकेम लॅबोरेटरी’च्या श्री. अमृत मोदींची ओळख करून दिली. १०,००० रु. ची भांडवली गुंतवणूक करण्याची सिद्धता असल्यास ‘निम्मी भागीदारी’ देतो असं मोदी श्रीधरपंतांना म्हणाले. वडिलांची अनुमति मिळविण्याचा त्यांनी प्रयत्न केला. पण वडिलांचे स्वप्न, जिद्द व द्रष्टेपण मोठे होते. स्वतःच्या व्यवसायाचा ‘सुवर्ण महोत्सव’ त्यांनी मनोमन पाहिला असेल. त्यांनी पंतांना मुंबई शाखेचे सर्वाधिकार दिले आणि एम्. एस्सी.ची पदवी व ‘युनिकेम’ची भागीदारी ह्या पार्श्वभूमीवर श्रीधरपंतांनी ती तशी नाखुषीनेच स्वीकारली. परंतु ती स्वीकारल्यानंतर मात्र त्यांनी ज्या जिद्दीने ‘एम् एस्सी.’ पदवी संपादन केली त्याच जिद्दीने व्यवसायात लक्ष घातले. आणि वडिलांना मृत्युसमयी समाधान दिले. “आपला निर्णय चुकला” याची खंत काशिनाथपंतांना होती ‘आपण निर्णय लादला तर नाही ना?’ अशी भीति त्यांना होती. पण मुलाने कर्तव्य बजावले व **मे. का. दा. नायक** ह्या पेढीला ‘सुवर्ण-महोत्सवी’ भाग्य लाभले आहे.

धंदा म्हटला की, चढउतार आलाच. दलालीच्या धंद्यात तर हे चढउतार अधिक असतात. १९५५।६० मध्ये गोव्याची आर्थिक नाकेबंदी भारताने केली. त्या काळात पेढीचा व्यवहार मंदावला. स्थानिक व्यवहार बांधावे लागले. मफतलाल ग्रुपच्या मिलसच्या कापडाचे स्टॉकिस्ट म्हणून पेढी काम करीत

( पान २१७ वर पहा )

अनुक्रमणिका




**भारताची सध्याची परिस्थिती पाहून भारतातले अनेक सेवानिवृत्त सेनानी 'बस्स झाला हा लोकशाहीचा फार्स' असे उद्वेगाने सतत म्हणताना आढळतात. त्यांच्या या उद्गारांमुळे सामान्य जनांपुढे एक मोठे प्रश्नचिन्ह उभे राहाते. लोकशाही-वर अढळ निष्ठा ठेवली पाहिजे असे मान्यवर नेते एकीकडे म्हणत असताना हे सेनानी लोकशाहीला 'फार्स' म्हणून संबोधून उपहास करतात हे गौडबंगाल सामान्य लोकांना उलगडत नाही... म्हणून या विषयावर अधिकारी विचारवंतांची अभ्यासयुक्त मते समजावून घेण्यासाठी 'दीपावली'ने यंदाच्या दिवाळी अंकाकरिता हा परिसंवाद आयोजित केला आहे. या परिसंवादात जुन्या व जाणत्या विचारवंतांबरोबरच तरुण मनाचेही विचार येथे ग्रथित केले आहेत. या विषयावरील आणखी काही थोर विचारवंतांची मते यापुढील अंकांमधून यथाक्रम प्रकाशित केली जातील—संपादक**

---

# लोकशाहीला पर्याय नाही — डॉ. गोवर्धन पारीख

**प्रश्न** : गेल्या सार्वत्रिक निवडणुकांनंतरच्या (१९६७) अनुभवावरून 'बस्स झाला हा लोकशाहीचा फार्स' या विधानाशी आपण कितपत सहमत होऊ शकता?

**उत्तर** : या प्रश्नाचे उत्तर देण्यापूर्वी या विधानाचा नेमका अर्थ काय हे पाहिले पाहिजे. कारण त्यातून निरनिराळे अर्थ सूचित होऊ शकतात. काहींच्या मताने लोकशाही ही एक विशिष्ट प्रकारची राज्यपद्धती आहे; ती काही मोठी चांगली आहे असे नाही. उलट, तिच्यात दोषच अनेक आहेत. आपण ती, कोणत्याही कारणाने का होईना,स्वीकारली आहे म्हणून ती कायम ठेवू किंवा टिकवू पाहाण्या-ऐवजी तिचा त्याग करण्यास सिद्ध झाले पाहिजे, या मताचे लोक फारसे नसतील असे नाही. मला ते मान्य नाही. याचाच पर्याय म्हणून दुसरा एक विचार सांगता येईल. लोकशाही ही चांगली व्यवस्था असली तरी आमची परिस्थिती तिला फारशी अनुकूल नाही, आणि त्यामुळे तिला 'फार्स'चे स्वरूप अपरिहार्यपणे प्राप्त होते. तो थांबवणे कठीण. म्हणून लोकशाहीचा त्याग करणे आवश्यक आहे. हा निष्कर्षही मला मान्य नाही. आम्ही लोकशाही राज्यपद्धती नीट राबवीत नाही, तिची पथ्ये पाळीत नाही हे खरे आहे; परंतु लोकशाही व्यवस्था किंवा पद्धती टाकून देणे हा काही त्यावर उपाय होऊ शकत नाही. तिला काही वेळा प्राप्त होणारे 'फार्स'चे स्वरूप टाळण्यासाठी आम्ही प्रयत्नशील राहिले पाहिजे हे मात्र मी मान्य करतो.

**प्रश्न** : या विशिष्ट परिस्थितीबाबतची काही मूलभूत कारण-मीमांसा करता येईल काय?

**उत्तर** : आजची परिस्थिती बदलण्यासाठी प्रयत्न करायचे म्हणजे तिचे स्वरूप प्रथम समजले पाहिजे हे उघड आहे. त्या परिस्थितीचा साकल्याने वा मूलभूत स्वरूपाचा विचार करणे येथे शक्य नाही. तथापि तिच्यातील अस्वस्थ करणारे काही घटक येथे स्पष्ट करावयास हरकत नाही. १९६७ सालच्या निवडणुकीत काँग्रेस पक्षाच्या बहुमतास कित्येक घटक राज्यात धक्का बसला. यामुळे केंद्रातील बहुमतही टिकून राहण्याबाबत अडचण उत्पन्न झाली. स्थानिक वा प्रादेशिक पातळीवर अनेक वेळा आढळणारी काँग्रेस-जनांतील दुफळी केंद्रीय पातळीवरही दिसू लागली. आणि निर्माण झालेल्या अडचणींतून आपणच काँग्रेसला वचावू शकतो असे मानणारे





अनुक्रमणिका

नेते डोके वर काढू लागले. नेहरूंनंतर सर्वांनी मिळून मिसळून, एकोप्याने काम केले पाहिजे ही क्षणभर निर्माण झालेली भावना नाहीशी झाली आणि सत्ताकलहाला प्रारंभ झाला. आपणाला अधिकारपदावरून काढण्याचा कट केला किंवा प्रत्यक्ष काढले हेच सत्तारूढ पक्षातील नेत्यांचे एकमेकांबद्दल गाऱ्हाणे झाले आणि यातूनच शेवटी कांग्रेस दुभंगली. काहीही करून सत्ता टिकवणे आणि काहीही करून सत्तेवरून काढणे हे पंतप्रधान व त्यांचे विरोधक यांचे मुख्य कार्य बनले. राजकीय स्पर्धेचे 'शुद्ध' सत्ताकलहात रूपांतर झाले. समाजवाद, सामाजिक न्याय, दारिद्र्यविमोचन, बेकारीनिवारण इ.या सत्ताकलहात यशस्वी होण्याची साधने झाली आहेत.निष्ठापूर्वक केलेल्या प्रयत्नांच्या योगाने अधिकाधिक प्रमाणात सत्तेच्या साहाय्याने प्रत्यक्षात आणावयाची साध्ये ती राहिली नाहीत. भांडण विकोपाला जाताना आर्थिक प्रश्न पुढे आणण्यात आला खरा; पण त्याच्या अनुषंगाने भांडण्यात येणारी ध्रुवीकरणाची कल्पना फारशी विचारपूर्वक मांडली जात होती असे वाटत नाही. आज सत्तारूढ कांग्रेस पक्ष पुनः दोन्ही आत्यंतिक भूमिका टाळून डावीकडे कललेल्या मध्यम मार्गाची भाषा बोलत आहे.

ध्रुवीकरणाची ही कल्पना सामान्यतः एकजिनसी स्वरूपाच्या सामाजिक संदर्भातून उत्कली आहे. तेथेही परंपरेने उदयास आलेल्या दोन गटांच्या विचारसरणीतले अंतर कमी होऊ लागले आहे. भारतासारख्या विविध जाती, धर्म, भाषा इ. भेदांनी भरलेल्या समाजाला ही कल्पना तितकीशी लागू पडत नाही. निवडणुकीपुरते दोन वा अधिक मोठे गट निर्माण झाले तरी त्यातून आर्थिक प्रश्नांवर आधारलेले स्थिर स्वरूपाचे राजकीय ध्रुवीकरण कितपत होऊ शकेल ही शंकाच आहे.

गेल्या तीन वर्षात आणखीही एक गोष्ट दिसून आली आहे. लोकांना हवे असेल त्याप्रमाणे वागणाऱ्या नेतृत्वाऐवजी धीटाईने, चांगल्या वाईटाविषयी निःशंक भावनेने आपलेच खरे म्हणत दांडगाईने पुढे शिरणारे नेतृत्व लोकांवर अधिक वजन पाडते असा अनुभव आला आहे. हे दांडगाईचे वा दादागिरीचे वर्तन म्हणजे हुकूमशाही नव्हे! झुंडीच्या लोकशाहीत जनमतावर प्रभाव पाडण्यासाठी उपयोगी पडणारे ते एक तंत्र आहे. ते हुकूमशाहीचे तंत्र नव्हे; पण त्यात हुकूमशाहीची बीजे मात्र असू शकतात. लोकशाहीची संस्थात्मक रचना ते खिळखिळी करून टाकते. अनेक प्रकारच्या स्वायत्त संस्थांतून व्यक्त होणाऱ्या स्वातंत्र्यलालसेला खतम करते. विचार वा वर्तन याविषयीच्या प्रस्थापित गृहित कृत्यांना सुरुंग लावते. योग्यायोग्य, इष्टानिष्ट, इतकेच नव्हे तर सत्यासत्य ठरविण्याचे गमकदेखील झुंडीचा अभिप्राय हेच बनते.

तात्पर्य, अनेक प्रकारच्या भेदाभेदांनी भरलेल्या या समाजात, राजकीय अस्थिरतेच्या वातावरणात, निःशंक मनाने सत्ता हाती ठेवू इच्छिणारे साहसी नेतृत्व यशस्वी ठरू शकते, हा माझ्या मताने आजच्या परिस्थितीतील खरा धोका आहे. डावे–उजवे, पुरोगामी–प्रतिगामी इ. कल्पना या परिस्थितीत शून्या व अर्थशून्य ठरू लागल्या आहेत. तसेच विचार व वर्तन याबद्दलचे काही नियम व संकेत पाळणारे आणि मूल्यांविषयी आस्था बाळगणारे, सारासार विवेक व भावचपणा असणारे नेते आता काही करू शकतील की नाही अशी शंका येऊ लागली आहे. राजकारण वा सारे सार्वजनिक जीवनच आता खालच्या पातळीवर घसरले असून त्यात काहीही चालते हा समज दृढ होऊ पाहात आहे. ही सारीच परिस्थिती अत्यंत काळजीपूर्वक तपासली जाणे आवश्यक आहे.

**प्रश्न** : या बाबतीत घटनांतर्गत काही दोष आहेत असे आपणास वाटते काय? की पक्षीय लोकशाहीची पद्धतच गेली पाहिजे? मताधिकार पद्धतीत काही बदल करणे सयुक्तिक ठरेल काय?

**उत्तर** : मला वाटते हे सारे प्रश्न व्यापक व गुंतागुंतीचे आहेत. चटकन् थोडक्यात उत्तर देता येईल असे त्यांचे स्वरूप नाही. या बाबतीत एक दोन मुद्दे आरंभीच ध्यानात घेणे उपयुक्त ठरेल. संस्थात्मक रचनेच्या स्वरूपाबद्दल लोकशाहीत आग्रहाची भूमिका नाही. इंग्लंड, अमेरिका, फ्रांस, स्वित्झर्लंड इ.लोकशाही राष्ट्रांची उदाहरणे पाहिली असता ही गोष्ट चटकन ध्यानात येईल. या राष्ट्रांतील राज्यसंस्थांची रचना पाहिली की त्यात अमुक चांगली, तमुक वाईट असे म्हणता यावयाचे नाही. प्रत्येकीत गुणदोष आहेत. आमच्या लोकशाहीची उभारणी करताना निरनिराळ्या देशांतील रचनांतून आम्हाला इष्ट वाटणारी वैशिष्ट्ये आम्ही घेतली आहेत. आणि अशा प्रकारे उभारलेला संस्थात्मक ढाचा या ना त्या बाबतीत सदोष आहे. असे आम्हास वाटल्यास आम्ही तो सुधारू शकतो; त्यात काहीही वावगे नाही. लोकशाही मूल्ये जीवनात अनुभवता यावीत यासाठी या संस्था उभारावयाच्या असतात; आणि तो हेतू साध्य होत नाही असे दिसल्यास त्या बदलायच्या, सुधारायच्या असतात

## टीका समर्थनीय नाही

घटनेबाबत जी टीका केली जाते ती फारशी समर्थनीय वाटत नाही. खाजगी मालकी हा मूलभूत हक्क म्हणून गणली गेली आहे यात वावगे काही नाही. मुख्य न्यायालयाच्या एखाद दुसऱ्या निर्णयाने अस्वस्थ होण्याचे कारण नाही. ते निर्णय त्यांच्याकडूनच दुरुस्त होतात, असा अनुभव आहे. खाजगी मालमत्तेवर अनेक प्रकारचे निर्बंध घालणे शक्य आहे; घटनेच्या चौकटीतदेखील सामाजिक व आर्थिक जीवन आपण बदलू शकतो हे स्पष्ट झाले आहे. ज्या अडचणी आल्या त्या घटनात्मक नसून राजकीय स्वरूपाच्या होत्या हे ध्यानात घेणे आवश्यक आहे. घटना दुरुस्त करू नये असे नाही. किंबहुना, आमची राज्यघटना ही कितीतरी तपशीलवार असल्याने ती बऱ्याच वेळा बदलणे अपरिहार्य ठरते हेही खरे. पण त्याबरोबरच राज्यघटना हे आमचे एक श्रद्धास्थान आहे हेही तितक्याच महत्त्वाचे तत्त्व आहे हे सांगणे आवश्यक वाटते.





अनुक्रमणिका

मतदानाचा हक्क ही मात्र लोकशाहीतील एक मूलभूत बाव होय. आजच्या सार्वत्रिक मतदानाच्या हक्काला मुरड घालणे योग्य नाही. 'लोक आधी शहाणे होऊ देत, मग त्यांना हक्क देऊ' हे म्हणणे सकृत्-दर्शनी कितीही योग्य वाटले तरी ते एक अर्धसत्य आहे. हक्क मिळाल्याने शहाणपण वाढण्यास मदत होते ही त्याची दुसरी वाजू आहे. पक्षोपपक्षांचे राजकारणही नाहीसे करणे सोपे नाही. पक्षीय पद्धतीला आमच्याकडे वेगळेच वळण लागू पहात आहे. पक्षांची संख्या वाढत आहे ही एक बाजू; पण तिच्यावरोबरच राष्ट्रीय पातळीवर म्हणजे देशात सर्वत्र ज्यांची वाढ अशक्य आहे, ज्यांचे कार्य एक व जवळजवळच्या एकाहून अधिक घटक राज्यांपुरते मर्यादित राहणार असे पक्ष आता महत्व पावू लागले आहेत. द्रा. मु. क., अकाली; भा. क्रां. द. ही ठळक उदाहरणे म्हणून नमूद करता येतील. केंद्रीय सत्ता व तिचे कार्य यांच्यात, घटक राज्याशी प्रत्यक्ष येणाऱ्या संबंधापलिकडे, त्यांना फारसे स्वारस्य असत नाही. तथापि पार्लमेंटमध्ये वहुमत कोणाचे व्हावे हे ठरविण्यात त्यांना महत्व प्राप्त होते. सर्वसामान्य नागरिक राज्याच्या पातळीपलीकडच्या प्रश्नांचे आकलन करू शकत नाही हे या परिस्थितीचे एक कारण असू शकेल. त्याची आकलनशक्ती वाढणे जरूर आहे. त्यावरोबरच कार्यक्रमाच्या दृष्टीने विचार केल्यास निरनिराळ्या लोकशाही पक्षांतील अंतरही कमी होऊ लागले आहे असे दिसते. परंपरागत पक्षपद्धतीच्या चौकटीत यापुढे आमचे प्रश्न सुटू शकतील की नाही यावद्दल मला शंका आहे. पण पक्ष नकोत म्हटल्याने ते नाहीसे कसे होणार ?

या सर्व संस्थात्मक वदलाचा किंवा सुधारणांचा विचार करताना त्यातून आमचे आजचे प्रश्न सुटण्यास कितपत मदत होईल हे सांगणे कठीण आहे. केवळ काँग्रेसच्याच नव्हे तर सर्वच पक्षात अंतर्गत कलह आहेत. आघाड्यांच्या राजकारणाकडे पाहिले तरी आघाडी यशस्वी होते आहे असा संभव दिसू लागताच तिच्यात सामील झालेल्या पक्षात दुफळी वाढू लागते. डाव्यांकडे पाहिले तर त्यांचे दहापाच पक्ष तरी आढळतात. तात्पर्य, एकत्र येऊन समान उद्दिष्टांसाठी शिस्तबद्ध प्रयत्न करण्याची आम्हाला अजून सवयच नाही. आणि संस्थात्मक बदल केल्याने हा प्रश्न सुटू शकेल असे मला वाटत नाही.

**प्रश्न** : अप्रवुद्ध अशा ५१।४९ गणसंख्येच्या प्रयोगापेक्षा तज्ञ अशा लोकशाहीनिष्ठ लोकांच्या हाती दहा वर्षे शासन सोपवावे असे पू. विनोवाजी म्हणतात. या वदलाने काही साधेल असे वाटते काय ?

**उत्तर** : विनोवाजींचा हा उपाय व्यवहारात कसा आणायचा हा एक प्रश्नच आहे. तथापि तो प्रश्न तूर्त काढण्याचे कारण नाही. शासन कोणाच्याही हाती सोपवता येईल असे आपण गृहीत धरू. तरी देखील अडचणी राहातातच. लोकशाहीनिष्ठा अधिकारप्राप्तीनंतर पूर्वीइतक्याच तीव्रतेने कायम राहील हे गृहीतकृत्य तज्ञतेवर आधारलेले नाही; त्याचा नीतीधैर्य व चारित्र्य यांच्याशी संबंध आहे असे मला वाटते. आणि आजच्या काळात एखाद्या क्षेत्रातील तज्ञता ही सारखी वदलत जाते. याचे कारण ज्ञानाच्या वाढीची गती हे होय. यामुळे आजचे तज्ञ हे दहा वर्षानंतर तज्ञ राहातीलच असे नाही. शिवाय या लोकांची निवड कोणी व कशी करायची हा प्रश्नच आहे. खरे पाहता लोकशाही पद्धतीत राज्यकर्ते तज्ञ असले पाहिजेत असे मुळीच नाही. त्यांना उत्तम आकलन शक्ती व व्यवहारज्ञान हवे. तज्ञांचा सल्ला घ्यावा हे ठीक; पण तज्ञांना अधिकार दिल्यास काही वेळा अनवस्था प्रसंग ओढवण्याचा संभव असतो. आपल्या विषयात स्वतःला तज्ञ समजणारा राज्यकर्ता इतरांचे म्हणणे ऐकून घेण्यास देखिल तयार असत नाहीत. यामुळे निरनिराळ्या दृष्टिकोनातून एखाद्या प्रश्नाची समीक्षा हवी तशी होऊ शकत नाही. आणि पर्यायाने चुका टाळण्याचा संभव नष्ट होतो. तज्ञ प्रमादशील असत नाहीत, असे म्हणणे थोडेसे धाडसाचे होईल.

### कोणतीही हुकूमशाही धोक्याचीच

**प्रश्न** : लष्करी अधिकाऱ्यांच्या हाती देशाची सूत्रे देणे कितपत फलदायी ठरेल ?

**उत्तर** : जे तज्ञांच्या वावतीत खरे आहे ते लष्करी अधिकाऱ्यांच्या वावतीतही खरे आहे. सैन्याच्या वा संरक्षणाच्या आजच्या कल्पना कितीतरी झपाट्याने वदलत आहेत. यामुळे अगदी मर्यादित असा संरक्षणाचा प्रश्न हा देखिल सैन्यापुरता मर्यादित न राहता व्यापक अर्थाने सर्व अर्थव्यवस्थेशी व समाजजीवनाशी निगडीत होतो. तो



अनुक्रमणिका





केवळ लष्करी अधिकारी सोडवू शकत नाहीत. तात्पर्य, लष्करी अधिकाऱ्यांच्या हाती देशाची सूत्रे द्यायची याला देशव्यवहार चालविण्याच्या कुवतीच्या दृष्टीने काही विशेष अर्थ आहे असे नाही. लष्कराच्या हाती सूत्रे द्यायची म्हणजे नागरीस्वातंत्र्य नाहीसे करायचे. यामुळे प्रश्न सुटणार नाहीत; त्यांचे अस्तित्व मात्र नाकारले जाईल. वैफल्याच्या भावनेतून निघालेला हा विचार आहे. यापेक्षा त्याला अधिक अर्थ नाही. आजच्या हिंसेने भरलेल्या वातावरणात तो कायदा व सुव्यवस्था यांच्या दृष्टीने आकर्षक बनू शकतो हा एक महत्वाचा धोका आहे. त्याबद्दल आपण नेहमीच सावध राहिले पाहिजे.



**प्रश्न** : चालू परिस्थितीत उत्तम पर्याय म्हणून आपण कोणता सुचवाल ?

**उत्तर** : मला आपला प्रश्न समजला नाही. आजच्या परिस्थितीत लोकशाहीला पर्याय शोधलाच पाहिजे असे मला वाटत नाही. आणि उत्तम पर्याय असूही शकत नाही. राष्ट्रीय आंदोलनातून निर्माण झालेली परिस्थिती अजून पूर्णपणे बदललेली नाही. मात्र ज्यांना ते आंदोलन हा केवळ इतिहासाचा विषय आहे अशी नवी तरुण पिढी आता हळूहळू पुढे येऊ लागली आहे. प्रस्थापित व परंपरागत बंधने येथे अनेक आहेत. आमच्या हातापायात हजारो बेड्या पडलेल्या आहेत. त्या झुगारून देऊन स्वातंत्र्याने भरलेला व भारलेला नवा समाज त्यांना तयार करावयाचा आहे. या पिढीत एक प्रकारची बंडखोरी आहे. भविष्य काळात इतर कोणाहीपेक्षा आपले हितसंबंध खोलवर पसरलेले आहेत याची तिला जाणीव होऊ लागली आहे, असे दिसते. यामुळे भविष्याविषयी थोडीफार आशा बाळगण्यास हरकत नाही.

**प्रश्न** : लोकशाहीची कोणती महत्त्वाची पथ्ये पाळणे आपणास आवश्यक वाटते ?

**उत्तर** : मला वाटते हा प्रश्न फारच व्यापक आहे. मी येथे त्याची चर्चा करू शकत नाही; परंतु दोन गोष्टी शेवटी याबाबतीत सांगतो. कारण मला त्या मोलाच्या वाटतात. लोकशाही म्हणजे जबाबदार राज्यपद्धती. तिच्यात राज्यकर्ते लोकांना जबाबदार असतात. उलट कोणत्याही प्रकारची हुकूमशाही वा अनिर्बंध सत्ता म्हणजे बेजबाबदार राज्यपद्धती होय. मग ती लष्कराची असो, राजकारणी लोकांची असो की तज्ञांची असो. ही गोष्ट अगदी साधी व सर्वांना माहीत असलेली अशीच आहे. परंतु बेजबाबदार राज्य आणि बेजबाबदार नागरिक या एकाच नाण्याच्या दोन बाजू होत हे मात्र अनेक जण ध्यानात घेत नाहीत. ते एक महत्त्वाचे राजकीय सत्य आहे. आणि ते कधीही दृष्टीआड होता कामा नये. लोकशाही टिकविणे, तिचा व्यवहार सुधारणे ही केवळ राजकीय नेत्यांची, पक्षांची किंवा राज्यकर्त्यांची जबाबदारी नसून ती आपणापैकी प्रत्येकाची एकापरीने वैयक्तिक जबाबदारी आहे हे यावरून स्पष्ट होईल; आणि ती प्रत्येकाने पार पाडत राहिले पाहिजे. ती पूर्णपणे पार पाडणे म्हणजे तिच्याबद्दल कायमची जागरूकता बाळगणे हे होय. अशी जागरूकता ही स्वातंत्र्याची किंमत आहे ही उक्ती प्रसिद्ध आहे. जागरूकता बाळगायची ती केवळ इतरांबद्दलच नव्हे, तर स्वतःच्या वर्तनाबद्दलही. म्हणूनच या बाबतीत दुसरी महत्त्वाची गोष्ट सांगावीशी वाटते. अशा वर्तनाचे आदर्श वरिष्ठांनी कनिष्ठांना, मोठ्यांनी लहानांना घालून दिले पाहिजेत. प्रत्यक्ष उदाहरणाने इतरांना जागरूक करण्याचा हा विषय आहे. जेथे तसे घडत नाही ते मोठेपण तकलुपीच मानावे लागेल.

★★






# कोण करतो हा लोकशाहीचा फार्स ? — दि. के. बेडेकर

लोकशाहीचा फार्स करणारे कोण ? आणि तो बघणारे तरी कोण ? बिचारे मूठभर इंग्रज हिंदुस्थान-पाकिस्तानचा मिळून सुयंत्र राज्यकारभार करीत होते ! त्यांना हाकून देणारे कोण ? पुन्हा इंग्रज आले तर बरे असे म्हणणारे कोण ? इंग्रज होते तेव्हा त्यांची काळी नोकरशाही नांदविणारे कोण ? कारकुनांपासून कलेक्टरांपर्यंत इमानेइतबारे इंग्रजी राज्याची इमारत सावरणारे कोण ? आणि ही इमारत पाडून स्वराज्याची इमारत बांधू पाहणारे कोण ?

साधे, निरक्षर लोक सध्याच्या फार्सात नाहीत; रंगभूमीवरही नाहीत आणि बघ्यांतही नाहीत. इंग्रजांना सावरण्यातही लोकांचा हात नव्हता. त्यांना 'चले जाव' करणाऱ्यांचा जयघोष लोकांनी केला, पण फक्त जयघोष. आणि वेळ पडेल तेथे स्वतःचे रक्त सांडले ते लोकांनी. बस्स. याहून त्यांची जास्त 'आगळीक' नाही.

पण ,अलीकडे, एक आगळीक लोकांकडून घडली व घडत आली. ती म्हणजे मतदानाची, फुल्या करून चिठ्ठी मोहरबंद पेटीत टाकण्याची; पण फुली करून लोक घरोघर परतले. लोक उभे राहिले नाहीत, चढले नाहीत, पडले नाहीत. आयाराम–गयाराम, मंत्री–उपमंत्री, नेते–उपनेते लोक झाले नाहीत. लोकांना तेवढा वेळ कोठे व मगदूर कोठे आहे ? यंत्रासमोर तासन् तास उभे राहणे, नांगरांमागे उन्हातान्हात उभे राहणे, खाणीत अंधारात चाचपडणे, नाहीतर चहाकॉफीच्या मळ्यांतून पाने खुडीत बसणे; इतपत लोकांना उमगते व जमते.

आणि कोणी फुली करून पेटीत चिठ्ठी टाकायला या म्हटले तर लोक आनंदाने, उत्साहाने आणि वेड्या आशेने चिठ्ठ्या टाकीत आले. आणि गंमत अशी की या चिठ्ठ्यांचा गठ्ठा जमा झाला, आणि लोकशाहीचा 'फार्स' रंगला.

या 'फार्साबद्दल'चे बोलणे फारच खुमासदार रंगते. रेल्वेच्या डब्यात असो की चारचौघा सुशिक्षितांच्या गप्पांच्या अड्ड्यात असो. त्यातच कोणी मिलिटरीचा असतो, तो आपल्या शिस्तीचे व कार्यक्षमतेचे सांगतो. कोणी टेक्निशियन असतो, कोणी छोटा कारखानदार असतो, कोणी बेपारी असतो. कोणी शिक्षक किंवा प्रोफेसरही असतो. सगळ्यांचे एकमत होते ते यावर : सगळा बट्ट्याबोळ झाला आहे तो या लोकांमुळे. लोक मतदान करतात म्हणून सारा गोंधळ होतो. मतदानच नसते तर उमेदवार कोण, कोणत्या पक्षाचे उमेदवार राहणार, मंत्रिमंडळे बनणार कशी व मोडणार कशी ? तेव्हा, तात्पर्य काय ? तर मतदानाचाच सारा दोष आहे–म्हणजेच, दोष या अडाणी लोकांचा आहे.

रेल्वेच्या डब्यात असो की गप्पांच्या अड्ड्यात असो लोकशाहीच्या फार्सावर मैफल रंगू लागली की मला वाटू लागते की या भल्या माणसांना विचारावे, "गृहस्थांनो ! जरा नानावर येऊन पाहाल का ? मतदान करणारे लोक, झुंड, अडाणी 'मॉब' यांचा या फार्सात संबंध काय ? जे काही घडत आहे ते तुम्ही आम्ही सुशिक्षित घडवीत आहोत. फक्त लोकांचे नाव घेऊन सारे करीत आहोत. हा फार्स लोकशाहीचा नाही; हा वर्ग सुशिक्षितांचा आहे. मैफल रंगवायला हरकत नाही, पण लोकांना बदनाम करण्याचा बदसूर लावणे बरोबर नाही."

पण, हे सारे मी सांगण्यातही अर्थ नाही, कारण सुशिक्षितांना हे माहीतच आहे. आहेत ते 'लोकशाहीचे नेते' नकोत. आम्ही 'खरे लोकनेते' आहोत, असे प्रत्येक पक्षाचे म्हणणे आहे. आणि पक्षीय राजकारणाचा 'उबग' आलेल्यांचेही तेच म्हणणे आहे. सर्वांनाच १९७२ ची मतदानाची पेटी साधली तर हवी आहे; न साधेल तर रक्त सांडून सत्ता बळकाविण्याची धमक आहे.

ही धमक आहे यातच साऱ्या देशाचे भवितव्य साठवलेले आहे. ही धमक प्रथम तोंडाची असते, पण तिच्या मागे पैसे, शस्त्रास्त्रे, प्रचारपंडितांचे कौशल्य आपसुख जमू लागते. तरुणांचे सळसळते रक्त आणि बेभान शौर्य यांचा तर भरपूर साठा असतो. या सळसळणाऱ्या तरुण रक्ताने युरोप खंडातील भूमी न्हाऊन, भिजून निघाली आहे. आणि दोन महायुद्धांच्या रक्तसिंचनाने तिची भूकतहान भागलेली नाही. पांची खंडांतून, देशोदेशी, शहराशहरातून, गल्लीबोळांतून रक्ताची चटक लागलेली माणसे एका भीषण सत्तापिपासू 'संस्कृती'चा जयघोष करीत आहेत.

या संस्कृतीचा जयघोष करणार नाही तो षंढ, अहिंसावादी, लोकशाहीच्या बावळट फार्सला बळी गेलेला, देशाभिमानाला पारखा झालेला व धर्म, देव, परंपरा न मानणारा ठरण्याचा काळ भारतात येऊ पाहात आहे का ? हा प्रश्न विचारील तोही आज भलतेच काही विचारीत आहे, असे म्हणणारे सुशिक्षित आज भेटतात. ते इतिहासाची साक्ष काढतात, ते धर्माची साक्ष काढतात, लोकशाहीचे अमेरिकेत व समाजवादाचे विडंबन रशियात कसे झाले आहे याचे शुभवर्तमान सांगतात. आणि एकच भविष्य वर्तवितात; "भारतात शिस्तबद्ध, नैतिक मूल्ये व परंपरा सांभाळणारी, धर्मपरंपरा दृढ करणारी एकतंत्री राजवट देणार आहे. तिच्या स्वागताला तयार व्हा."

बिचारे लोक ! युगानुयुगाचे वंचित, दलित ! काल आसुडांचे फटके खाणारे, आज 'मतदानाचा हक्क' भोगणारे ! पण अजून दारिद्र्याच्या अंधारातच पशूसारखे जीवन जगणारे ! हे साधे लोक हजारो नाहीत, लक्षावधीच नाहीत, कोट्यवधी आहेत. यांना इतिहास नाही, धर्म आज्ञापालनापरता दुसरा नाही, नैतिक मूल्ये यांना कळण्याइतकी सोपी तरी नाहीत किंवा वळण्याइतकी सवड यांना

अनुक्रमणिका

सत्ताधाऱ्यांनी कधी ठेवलेली नाही !

या कोट्यवधी लोकांना काय ? 'लोकशाहीचा फार्स' तुम्ही करा व पाहात राहा, किंवा उद्या आयूब–याह्याखानांच्या व अशा असंख्य राष्ट्रनायक वीरपुरुषांच्या संख्येत आपली भर घाला. त्यांच्या आशा शतकानुशतके टांगत्या राहिल्या, त्या आणखी काही वर्षे टांगत्या राहतील. रक्ताचे सिंचन होईल, त्यात सामान्य लोकांचेच रक्त सांडले जाईल. पण हेच पूर्वापार घडत आलेले नाही का ? पण विसाव्या शतकाची सत्तर वर्षे गुदरली आहेत. पूर्वापार घडत आले तेच सामान्य लोक घडू देतील का ?

'आज लोकशाहीचा फार्स बस्स झाला' हा सूर कानावर येत आहे. पण कोट्यवधी वंचित लोकांच्या आत्म्यांचा आक्रोशही कानांवर आदळत आहे. हा आक्रोश आहे,पण तीच जागृत लोकांची गर्जना होऊ शकते. सुखवस्तूंचे, सुशिक्षितांचे कान बधीर झाले नसतील तर त्यांना ही गर्जना रोममधील गुलामांच्या बंडापासून आजवर दडपल्या गेलेल्या बंडांच्या रक्तरंजित इतिहासातून ऐकू येईल. पण, अशीही काळवेळ असते की, गर्जना बधीर कानांवर पडते. आज आशियातील, आफ्रिकेतील, पाकिस्तानातील व भारतातील काळवेळ कोणती आहे ? ही कसोटीची वेळ आहे, यापरते जास्त कोण सांगू शकेल ?

* *

# जळो ही लोकशाही

प्रभाकर पाध्ये

"जळो ही लोकशाही !"– आजकाल अनेकांच्या तोंडून असे उद्‌गार निघत असतात.

आणि त्यात काही आश्चर्य नाही. असे उद्‌गार चांगल्या चांगल्यांच्या तोंडून निघावेत अशी खरोखर परिस्थिती आहे.

विचार करा ! १९४७ साली आपल्याला स्वातंत्र्य मिळालं. दि. २६ जानेवारी १९५० रोजी त्याच्यावर लोकशाहीचं शिक्कामोर्तब झालं. त्यानंतर साडेचौदा वर्षे पं. नेहरूंसारख्या उदारमनस्क, विदग्ध, संस्कारशाली व्यक्तीचं नेतृत्व तिला लाभलं. पण आज या साऱ्याची फलश्रुती काय आहे ?

आयाराम–गयाराम ही आपल्या राजकारणाची प्रकृती बनली आहे. जिकडे तिकडे भ्रष्टाचार माजला आहे. दरेक मंत्र्यावर दरमहा ३७,००० रुपये खर्च होत आहे. तरी अनेक मंत्री बायकोच्या नावावर जमीनजुमला करण्यात दंग आहे. त्याच्या स्थावर–जंगम इस्टेटीची मोजदाद घेतली तर काय काय गोष्टी बाहेर पडतील हे सांगणं कठीण आहे. महामंत्र्यासकट सर्व मंत्र्यांच्या नातेवाईकांना जो भाव या देशात आहे तो फार थोड्या इतर देशात असेल. एखादा अधिकारी सरळ सरळ पैसे खात असतो, पण तो एका विशिष्ट जातीचा म्हणून कारवाई होत नाही. या देशाचा जुना रोग जी जातिव्यवस्था तिला निवडणुकीची इंजेक्शनं प्रत्येक पातळीवर मिळत आहेत. मंत्रिपद ही जातवार मक्तेदारी बनली आहे. साधी नोकरी मिळवायला निदान पुस्तकी तरी दाखला लागतो, पण मंत्रिपद मिळवायला जातीखेरीज दुसरा कसला दाखला लागत नाही !

इतकं सारं होऊन कर्तबगार कारभार तरी मिळतो काय ? त्याच्या नावानं शुद्ध परमानंद आहे ! सारा कारभार फायलीत पडून असतो. कागद फायलीत ढकलण्यासाठी फाईल उघडावी लागते, बंद करावी लागते, हेच मुख्य काम ! मंत्र्याचं मुख्य कार्य म्हणजे दौरे ! कायदेमंडळं उघडतात, पण तिथं मारामाऱ्याच (शाब्दिक आणि शारीरिक सुद्धा !) अधिक होतात. सुधारणा करायच्या त्या प्रचारासाठी आणि त्यासाठी साधन म्हणजे वटहुकूम ! शरीरातल्या पेशी, एकाची दोन, दोनांच्या चार अशा होतात तसे पक्ष दुभंगत असतात ! राजकीय पक्षांचं सर्वांत विधायक कार्य म्हणजे नेत्यांनी एकमेकांना बडतर्फ करणं. हे प्रथम इतर पक्षांनी केलं–आणि आता काँग्रेस पक्षाचा सुद्धा तोच धर्म बनला आहे ! राजकीय हालचाल सर्वांत कुठं अधिक होत असेल तर ती कचेऱ्यात नाही, अगर कायदे मंडळात नाही तर रस्त्यावर–ही हालचाल म्हणजे बंद, मोर्चे, संप, दंगे आणि यांवर विशेष शोभण्यासाठी नक्षलवादी अत्याचार !

आर्थिक क्षेत्रात वाढी मुख्यतः दोन– एक लोकसंख्येची आणि दुसरी किंमतीची ! उत्पादनाच्या वाढीला छेदण्यासाठीच जणु निरनिराळी धोरणं आखली जातात. त्यातलं मुख्य कारण म्हणजे राष्ट्रीयीकरण ! म्युनिसिपालिटी ज्याप्रमाणं चांगला रस्ता दिसला की उकर असा न्याय आखून असते, त्याप्रमाणं चांगला धंदा दिसला की कर त्याचं राष्ट्रीयीकरण असा आमच्या समाजवादाचा अर्थ बनला आहे !

स्वातंत्र्य–शिक्षण–संस्कृती यांच्या गप्पांचं पीक आपण भरपूर काढीत असतो– पण प्रत्यक्षात ? विरुद्ध मतप्रदर्शन करणाऱ्या वृत्तपत्रांच्या जाहिराती बंद होतात, आणि संपादकांना तंबीचे फोन येतात. शिक्षणाचे कारखाने पटापट उघडून त्यात अर्धशिक्षित आचार्य–प्राचार्य–प्राध्यापक चिकटून देण्याची दक्षता बाळगण्यात येते. विद्वान भाडयानं मिळत असल्यामुळं या या साऱ्या उद्योगाला प्रतिष्ठेचा मुलामा देता येतो. संस्कृतीच्या संरक्षणासाठी बी. बी. सी, युसिस, वगैरे संस्थांना आवळण्यास आम्ही अनमान करीत नाही. मात्र एकंदर सांस्कृतिक कार्याचा पसारा कमी होऊ नये म्हणून सोव्हिएट प्रचार केंद्रास उत्तेजन देतो– आणि अर्थात् ही केंद्रं खोटे

अनुक्रमणिका

नकाशे वगैरे प्रमृत करण्याचं कार्य चोख करीत असतात.

असा आपल्या लोकशाहीचा पमारा चौफेर वाढत आहे. आणि परिणामी 'जळो ही लोकशाही !' असे उद्गार काढण्याची पाळी पापभीरूंवर आली आहे.

आणि तरी ही आरोळी ठोकणाऱ्या आवाजात माझाच आवाज मिसळण्यास मी तयार नाही. लोकशाहीतील कारभाराचा कितीही अधःपात झाला, केवढाही भ्रष्टाचार लोकसत्तेच्या नावानं माजला, तरी जोवर लोकशाहीचा निवडणुकीचा पाया कायम आहे तोपर्यंत मी आशा सोडणार नाही—आणि या आरोळीत सामील होणार नाही.

कारण पहिली गोष्ट म्हणजे मी केलेल्या प्रत्येक विधानाला उज्ज्वल अपवाद आहेत आणि ही मोठी आशा आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे लोकशाही ही अशी एकच राज्यपद्धती आहे की जिच्या मूळाशी नैसर्गिक शहाणपणाचं एक महत्वाचं तत्त्व आहे.

हे तत्त्व म्हणजे होमिओस्टॅसिसचं तत्त्व. या तत्त्वाचा चांगला उहापोह डॉ. डब्ल्यू वी. कॅनन यांनी आपल्या "विज्डम ऑफ दी बॉडी" या पुस्तकात केला आहे.

कॅननी सांगितलेलं हे शरीराचं शहाणपण कोणतं ? दोन उदाहरणं देतो : आपल्याला फार उकाडा झाला तर घाम येतो आणि थंडी वाजली तर हुडहुडी भरते. घामानं उष्णतामान खाली येण्याला मदत होते तर हुडहुडीनं शरीराची हालचाल होऊन उष्णतामान वाढतं. रक्तात साखरेचं प्रमाण कमी झालं तर शरीरात साठविलेली साखर मोकळी होते व वाढलं तर ते कमी करण्याची यंत्रणा काम करू लागते.

लोकशाहीचा कारभार या होमिओस्टॅसिसच्या तत्त्वावर चालतो. एक पक्ष अधिकारावर आला व त्यानं कांही अतिरेक, अत्याचार केला तर त्या पक्षाविरुद्ध लोक-

मत जागृत होतं व विरुद्ध पक्षाचे लोक अधिकारावर येऊन हे अत्याचारी धोरण दुरुस्त केलं जातं, अगर उलटविलं जातं.

ही गोष्ट व्यवस्थित होण्यासाठी लोकमत जागृत असावं लागतं, त्याचं राजकीय शिक्षण व्यवस्थित झालेलं असावं लागतं, ते सुरू असावं लागतं, राष्ट्रात राजकीय प्रश्नांचा विचार खुला व भरपूर व्हावा लागतो, त्यासाठी वृत्तपत्र स्वतंत्र व कर्तव्यदक्ष असावी लागतात, राजकीय पक्ष ध्येयनिष्ठ, निःस्वार्थी असावे लागतात—अशा अनेक गोष्टी असाव्या लागतात. थोडक्यात म्हणजे राजकीय शरीराचं रक्ताभिसरण, श्वासोच्छवास वगैरे व्यवस्थित चालू असावा लागतो. त्यासाठी शरीराची प्रकृती मुळात निकोप असावी लागते, त्याला व्यवस्थित खुराक आणि आवश्यक तो व्यायाम घडावा लागतो. आमची राजकीय प्रकृती मुळात निकोप नाही, आणि तिची निगा नीट राखली जात नाही ही खरी अडचण आहे. आजची अनवस्था त्यामुळं उद्भवली आहे.

पण जोपर्यंत या शरीरातलं होमिओस्टॅसिसचं तत्त्व सुखरूप आहे, म्हणजे जोपर्यंत निवडणुकीच्या पद्धतीनं राज्य बदलण्याचं स्वातंत्र्य शिल्लक आहे तोपर्यंत मी आशा सोडणार नाही. हुकूमशाहीला पाचारण करणं सोपं असतं. मात्र युद्ध सुरू करणं सोपं असतं, पण संपुष्टात आणणं सोपं नसतं. म्हणून आहे ही लोकशाही, ती लोकशाही आहे एवढ्याच कारणासाठी, अबाधित राहील अशी काळजी घेतली पाहिजे. 'जळो ही लोकशाही' ही घोषणा म्हणूनच मला अभद्र वाटते.

---

# निरुपायाने लोकशाहीचा उदोउदो — डॉ. अनील अवचट

आजच्या राजकीय परिस्थितीवरून असेच दिसते की झाडून सारे राजकीय पक्ष लोकशाहीचे समर्थन करीत आहेत. घटनापावित्र्याची भाषा तर काही पक्ष प्राणपणाने बोलत असतात. याला नक्षलवादी हेच फक्त अपवाद. लोकशाही नाकारणाऱ्यांमध्ये तीच एक प्रामाणिक माणसे आहेत असे मी म्हणेन.

एरवी सगळ्यांची भाषा एक. पण मने चाचपायला जावे तर भलतेच आढळते. त्यांना खऱ्या अर्थाने लोकशाही हवी की नको, मानवी समता हे मानतात की नाही हे कसे ओळखायचे? नेहमी चारचौघात काही नाजूक प्रश्नांवर चर्चा केल्यास यांचे अंतरंग हमखास उघडे पडते.

कुणाही पांढरपेशा ब्राह्मण विद्यार्थ्याबरोबर हरिजन विद्यार्थ्यांना अग्रक्रम देण्याच्या प्रश्नावरून चर्चा करावी. हमखास तो म्हणेल, काय म्हणून त्यांना अग्रक्रम? गुणवत्तेची कसोटी लावा, मग त्याला प्रिन्सिपाल केले तरी हरकत नाही. त्याला त्याची वेगळी पार्श्वभूमी मंजूर नसते. त्या समाजात आग्रहाने काही शिकलेली माणसे निर्माण करावी लागतात म्हणजे त्या समाजात शिक्षणाच्या परंपरा निर्माण होतात हे पटत नाही. त्याला ही मुले इथपर्यंत शिकत आली याच्यासाठी त्यांना त्यांच्या आईवडिलांशी, दारिद्र्याशी, शहरातल्या अडचणींशी किती घोर सामना करावा लागतो हे तर त्याला माहीतच नसते. त्यांना आपल्याबरोबरीचे लेखायला मनातून त्याला साफ नामंजूर असते. परवा पुण्याच्या मेडिकल कॉलेज प्रवेशासंबंधी पुण्यात विद्यार्थ्यांनी छोटीशी चळवळ केली. झाडून पांढरपेशा वर्गातील मुले (अगदी त्यांच्या आईवडीलांच्या संमतीने) त्यात आलेली होती. त्यापैकी एकाने कोर्टात सरकारविरुद्ध दावा दाखल केला. त्यात पहिले कलम शिवाजी विद्यापीठाच्या अग्रक्रमाबद्दल होते व दुसऱ्या कलमात या हरिजनांना अग्रप्रवेश दिल्याने माझ्या घटनात्मक अधिकारावर आक्रमण झाले आहे असे म्हटले होते यावरून या विद्यार्थ्यांच्या मनोवृत्तीचा थांग लागू शकतो.

दुसरा एक तरुण मला म्हणत होता, की सध्या अशिक्षित लोकांच्या हाती मतदानाचा अधिकार गेल्याने सगळा गोंधळ माजला आहे. मॅट्रीक झाल्याशिवाय हा अधिकार देताच कामा नये. थोडक्यात त्याच्या मते मॅट्रीक झालेल्या, म्हणजेच मॅट्रीक होण्याची आर्थिक परिस्थिती ज्यांची आहे त्यांनाच इथं राज्य कुणाचे आहे हे ठरविण्याचा, म्हणजेच राज्य करण्याचा अधिकार आहे. त्याखालच्या परिस्थितीतल्या लोकांना इथे तसा अधिकार नाही. या वर्गात, देशातल्या भूमिहीनांची, हरिजनांची आदिवासींची संख्या ध्यानात घेता, बहुसंख्य लोक मोडतात. सारांश त्याच्या मते, या शिक्षण नसलेल्या व आर्थिकदृष्ट्या हीनावस्थेला पोहोचलेल्या लोकांवर या समाजातल्या चांगल्या परिस्थितीतल्या, शिकलेल्यांनी; थोडक्यात भारतातल्याउच्चवर्गीयांनी व उच्चवर्णीयांनी अनिर्बंध राज्य करावे, असे आहे.

आज लोकशाही नको आहे असे म्हणणारे किंवा वाटणारे लोक हे बहुधा वरील वर्गातलेच दिसतात. या वर्गाकडे पूर्वी अनिर्बंध सत्ता होती. स्वातंत्र्य चळवळीच्या जादूमुळे इथे लोकशाही व्यवस्था आली. आज राज्य जरी त्यांचेच असले तरी समाजाची पूर्वीची घडी बदलून नवी व्यवस्था आली आहे.पूर्वीचा ब्राह्मणखोत किंवा देशमुख पाटील यांची गावावर जी हुकमी सत्ता होती ती आता चालत नाही. उच्चकुलीन मराठ्यांनी गांधीवधाच्या निमित्ताने ब्राह्मणांचा राजकीय निःपात जरी केला असला तरी गावातल्या सर्वसाधारण माणसाकडे, येवढेच नाहीतर वेशीबाहेरच्या महारामांगांकडे



अनुक्रमणिका

मते मागायला त्याला आज जावेच लागते. जात वापरावी लागते, पैसे वाटावे लागतात. आणि काही अनपेक्षित घटनांमुळे कदाचित् हा पराभवही पत्करावा लागेल अशी भीतीही उराशी बाळगावी लागते.

ब्राह्मणांचे तर वेगळेच आहे. ४८ सालानंतर खेड्यातून हकालपट्टी झाली. शहरात आले. तेथे वस्त्याही ठरून गेल्या. त्यांची पॉकिट्स् निर्माण झाली. रा. स्व. संघ, जनसंघ, हिंदुत्ववादी पक्ष तेथे बळकट होऊ लागले. या लोकांना मतांच्या जोरावर राज्य करता येत नाही म्हणून रुखरुख वाटणे साहजिक आहे. पण अजूनही त्यांना आशा असावी. ते आज जेव्हा पुरातन परंपरांचे पुनरुज्जीवन करू पाहतात तेव्हा त्यांचे त्यामागचे मन कळू शकते. गोहत्याबंदी, संस्कृतचा आग्रह, हिंदू धर्माचा आग्रह (त्यापोटी मुस्लीम द्वेष) या सर्वांतून ज्या संस्कृतीमध्ये ब्राह्मणांचे महत्त्व अपरिहार्यपणे मानावे लागते तिचाच आग्रह हे लोक धरताना दिसतात. पण आता हे जमणार नाही हे उघड आहे. गणपतीच्या मिरवणुकीत नाचणारे लोक किंवा पुण्यातल्या ६५ च्या दंगलीत मुसलमानांची घरे जाळणारे लोक हे सर्व पूर्व भागातले अब्राह्मणच होते, हे उघड आहे. तसे करणारे लोक हे कट्टर हिंदू धार्मिक भावना बाळगणारे लोक असूनही ते हिंदुत्ववादी पक्षांना मते देत नाहीत. कारण त्यांना उपजत प्रेरणेमुळेच हे माहीत असावे की या पक्षांना मत म्हणजे पुन्हा ब्राह्मणांना अधिकार देणेच होय. हे त्यांना नको आहे.

### घटनेच्या पावित्र्याचा आग्रह

एकेकाळचे लोकशाहीचा उपहास करणारे व जर्मन जिंकत असताना हिटलरचा उदोउदो करणारे हे रा. स्व. संघातले लोक स्वातंत्र्यानंतर जनसंघात जाऊन लोकशाहीचा पुकारा का करू लागले? आणि आता तर लोकशाहीच्या, घटनेच्या पावित्र्याचा आग्रह धरणारे हे लोक सर्वात पुढे का आहेत? याचा उलगडा करताना दोन कारणे दिसतात. एकतर ४८ साली सर्वच गमावले होते. आहे हे शिल्लक ठेवण्यासाठी ही व्यवस्था परवडेल असे त्यांना वाटले. आणि हे खरेच आहे.

ब्राह्मणांच्या पूर्वीच्या स्थितीपेक्षा आजची स्थिती पाहता आज ते बरेच सुस्थितीत दिसतात. ब्राह्मणांनी शहरात येऊन आपली मुले भराभर इंजिनियर डॉक्टर केली (त्यांचे वडील कारकून किंवा शिक्षक होते) सरकारी नोकऱ्या तर राहूच द्यात, खाजगी उद्योगधंद्यातील नोकऱ्याही व्यापून टाकल्या. राजकीय आघाडीवर आहे हे टिकवून धरणेही जमले.

दुसरे कारण भारतव्यापी पातळीवरचे आहे. आज सर्व उजवे पक्ष (स्वतंत्र, जनसंघ, संघटना कांग्रेस) कट्टर लोकशाहीवादी आहेत. स्वातंत्र्यानंतर काही अवधीतच या समाजातल्या सत्तेच्या व संपत्तीच्या मक्तेदारांनी असे जाणले (हेही सहज-









प्रेरणेनेच असावे ! ) की समाजातल्या गरीबांची क्रांती दडपून टाकायला लोकशाही हे साधन होऊ शकेल. संसदीय सांगाड्यात बाहेर गरीब जनतेच्या क्रांतीकारी आंदोलनांचा प्राण नसेल तर ती व्यवस्था लोकशाही व्यवस्थाच नव्हे. पण तो आशय नेमका वगळायचा आणि सांगाड्यातलाच माणूस म्हणून दिशाभूल करण्यासाठी लोकशाही हे साधन या लोकांनी वापरायचे ठरविले. आणि ते वापरूनही दाखविले आहे. म्हणून एकेकाळचे हिटलरवादी आज डाव्या पक्षांवर, लोकशाही घटनेचा हे भंग करीत आहेत असा आरोप कंठशोष पडेपर्यंत करताना दिसतात.

म्हणून मनातून पूर्वीची सत्ता गेल्याबद्दल रुखरुख आहे. त्यापोटी 'लोकशाही हा फार्स आहे', 'पांढऱ्या टोप्यांच्या त्रिनडोक बैलांचे राज्य आले' अशा तऱ्हेचे बोल खाजगीत बोलताना आढळतात. पण आहे या परिस्थितीत लोकशाहीशिवाय इलाज नाही म्हणून वरून तिचा जोरदार पुरस्कार ( बहुधा गिल्टी कॉन्शस पोटी ) करताना हे दिसतात.

समाजपरिवर्तन हा मध्यबिंदू आहे व त्यासाठी आपण लोकशाही हे माध्यम स्वीकारले आहे हा विवेक आपण सोडता कामा नये. हा आशय सुटल्यामुळे समाजातले त्या प्रकारचे चैतन्य संपुष्टात येत आहे असे दिसते. परिवर्तनशीलता, क्रांतीकारी वृत्ती या वजा केल्यास तो समाज डबक्यासारखा साचून राहतो. आतून पोखरला जातो. यावेळी आपल्या समाजाचा नैतिक ऱ्हास होत आहे. आणि असेच चालू राहिले तर एकतर हा समाज मोडेल किंवा गुलाम होईल ही आज वाटणारी खरी चिंता आहे.

आज लोकशाहीतले संधिसाधू राजकारण पाहिले तर असे आढळेल की, समाजात त्या अर्थाची नीतीमान माणसे उरली नाहीत. फारशी निर्माण होत नाहीत. समाज किडला आहे याचा हा सरळ सरळ परिणाम आहे. स्वातंत्र्य चळवळीच्या काळातल्या चळवळीतल्या माणसांना स्वाभिमानाचा, तत्त्वनिष्ठेचा कणा दिसतो, म्हणून त्यांना त्यागही करावासा वाटला. त्या त्यागाची समाजात वाहवा होती, त्याला किंमत होती. आज ती नैतिकता दिसत नाही. आणि हा समाजातल्या क्रांतीहीनतेचा परिणाम आहे.

लोकशाहीला फार्स म्हणणाऱ्यांच्या मते ह्याचे कारण 'शिस्तीचा अभाव' असे असेल पण सगळेजण हे जाणतात की ही शिस्त म्हणजे त्यांनी इतरांना लावायची, अशी एकतर्फी शिस्त आहे !

नक्षलवाद्यांचेही लोकशाहीवर आक्षेप आहेत. त्यांनाही मी त्या पातळीवर विरोध करीन. पण हे मला आग्रहाने सांगायचे आहे की, त्यांच्या मुळातल्या प्रेरणा गरीबांची गरीबी हटविण्याच्या, क्रांतीकारी आंदोलनाच्या आहेत. वरील मंडळींसारख्या वर्गीय वा वर्णीय नाहीत हे ध्यानात ठेवले पाहिजे. सशस्त्र लढ्यातसुद्धा वीरचित्त अल्पसंख्यांनाच वाव असतो. आणि त्यांचीही दुसरी गुलामगिरी होऊ शकते म्हणून मी त्यांना विरोध करीन. ●●●

अनुक्रमणिका

## आभाळ कोसळतंय् हो ऽऽऽ !

आपलंच मानलेलं आकाश...
आपल्यावरच कोसळलं तर
हळहळावंच असं नाही.
देवदास पितो :
"एक सांसके लिये..."
म्हणून आपण प्यावीच.
असंही नाही...
देवदास देवदास असतो
जरी टेर झाला तरी
आपण फक्त बेवडेबाज
बाटलीत संपणारे.
संपायचं तेव्हां संपत नाही
म्हणून पुन्हा बाटलीचे...
बाट्टलीचे... बाट्ल्लीचे...
ब्बाट्लीचे... बाट्.. बाट्ल...
ट्ली.. ली.. ला.. ल...
फूऽऽऽऽऽऽट्ट
आभाळ कोसळतंय होऽऽऽऽऽ

—विलास कणेकर

## काही संतप्त अभंग

आपुला तो नेता
दुसऱ्याचा गुंड
हुतात्मे उदंड
गल्लोगल्ली

छक्के आणि पंजे
किती भडभुंजे
जाहलेत राजे
जनतेचे

देवळात दंगा
अड्ड्यावर दोस्ती
मवाल्याची मस्ती
पुरुषार्थ

रांडेचिया घरी
तुम्ही आम्ही एक
धर्मातीत × ×
मानवाचे

अशा जगण्याचे
तोडा आता मूळ
उखडा समूळ
सिंहासन.

– ह. शि. खरात




## विव्हळणारे निःशस्त्र वार

तुझ्याबद्दलच्या माझ्या एकमेव संकल्पनाना तडा जातो
जेव्हां करतेस तू माझ्यावर विव्हळणारे निःशस्त्र वार
तुझ्या प्रत्येक पदन्यासाखाली चिरडून जाते माझी प्रत्येक कविता,
जशी मोही चुरगळूनच टाकतो माझी प्रत्येक कविता
तुझ्या डसणाऱ्या स्मृती नष्ट करण्यासाठी.
क्षणभरच लखलखणाऱ्या विजेसारखी तूही क्षणभरच लखलखतेस,
आणि होतेस कारणीभूत माझ्या नव्या कवितेच्या जन्म-मरणासाठी
पुनर्जन्म मी झुगारलाय, पण माझ्याहून माझ्या श्रेष्ठ कवितेला
तू दान केलेस अगणित पुनर्जन्म...
आता तरी मला ते दान देशील का? घेशील का तूही पुनर्जन्म?
होशील का सूत्रधार माझ्या कवितेच्या जन्म-मरणाची?
तुझ्याबद्दलच्या माझ्या एकमेव संकल्पनांना तडा जातो,
तरीही त्या गोड दुःखासाठीच मी हपापलोय
आणि पुन्हा शब्द जुळवीतच रहातोय विव्हळवणारे निःशस्त्र
वार झेलीत.

—श्रीकांत सिनकर

## पा र वा

वळचणीवरून अवकाशांत
अलगद् उडतो धीट पारवा
सांजवेळी दमून भागून
खुराड्यात उतरतो श्रान्त पारवा
दाण्यांच्या फेरी सरशी
फडफडत झेपावतो भुका पारवा
घुमत आतुर शिळी विलसिते
रुंजी घालतो कामुक पारवा
ससाण्याची छाया पडता
कापत शिट्तो डरपोक पारवा
अन् पुनः सकाळी वळचणीवरून
आशेने झेपावतो जीवट पारवा

—भोला



अनुक्रमणिका

## ये

अमाप ऐकून होतो तुझा संदर्भ—
अवतरलास कधीतरी
विणून
हजारो सूर्य–जाळी स्वतःभंवती
गजाआड                तरी
मुक्त उरलास अणुपरमाणूत अतिसूक्ष्म कधी
कधी तर डोळे दिपवलेस सूर्य झाकाळून
न चालता झालास
पुन्हा येण्याचं आश्वासन देऊन

कधीतरी डोळे दिपवलेस सूर्य झाकाळून
तेव्हांच बसलास डोळे दवडून माणूस
माणसाला ओळखेना माणूस
दृष्टिआड दृष्टी झाली
सगळं महागलंय प्रेम नावाची चीजसुद्धा
विद्वान वेध घेताहेत तत्त्वाचा
तत्त्वज्ञ शोध घेताहेत स्वत्वाचा
अस्तित्व गमावून

आज चंद्र साकळलाय
उद्या सूर्य झाकाळेल पुन्हा दिपतील डोळे
जमेल सगळी मांदियाळी एका विकल्परेषेवर
करेल उदोउदो : माणसाने सूर्य जिंकला
माणसाने सूर्य झाकला
डोळे दिपले
पण

तू कुठाय पहायला हा सोहळा सगळा
तू कधीच झालास चालता
पण

तू कुठाय पहायला हा सोहळा सगळा
तू कधीच झालास चालता

पुन्हा येण्याचं आश्वासन देऊन

आता ये.
असेल हिम्मत तरच परत ये
कारण

धर्म बुडवण्याची व्याख्या आता
पुरी उमजली आहे
ये.

—अनील बांदेकर

## प्यादे

बुद्धिबळाच्या खेळातील लाकडी प्यादी सटासट सरकतात,
पण इष्काचं प्यादं हटत नाही
प्रतिष्ठेचं प्यादं सरकत नाही
माझ्यातल्या 'मी'ची व्याद टळत नाही,
मी कोण?
पांढऱ्या कागदाच्या सारीपाटावर
शब्दांच्या कवड्या खड्या करणारा
की, जीवनाचा ट्रायल बॅलन्स मधला
जाणीवेचा डिफरन्स शोधणारा? आणि,
संशयाची पिशाच्चं मानगुटीवर बसवून
वर, पुन्हा तज्ञाचा आव आणणारा?
हा डाव उधळला पाहिजे,
कागदी घोडे, शब्दांचे बुडबुडे
लाकडी उंटावरचे शहाणे,
डोहाच्या तळी झुगारले पाहिजेत,
तेव्हाच ही व्याद सुटेल
आणि माझं प्यादं पुढे सरकेल!

—यशवंत कुलकर्णी

## दोन स्वतंत्र पानांची चळत

तिला संपूर्णपणे वेगळी
करताच येत नाही
सूर्योदयाशिवाय आणि सूर्याला वगळून
आणि सूर्याची अपरिहार्यता सूर्यास्तासह
माझ्याही आयुष्यात मूलभूत

ती संपते ज्या पानावर पूर्णांशाने तिथून
माझी पाने चाळली जातात
आकाशाचे दोन भाग सूर्यलक्षी, दोन
स्वतंत्र पानांची चळत

तिला जाग येते
तेव्हा गुलाबबने फुललेलीच असतात
ती तिच्यासाठीच सर्वार्थाने
मी वाट पहातो सूर्यास्ताची व्याकुळ
संध्याकाळ मला घेरीत येते

मुरलेल्या तापासारखी दुःखछाया
माझ्या सर्वार्थाला व्यापून उरते. तेव्हाही
ती रंग खेळते गुलाबबनात

– शरद साटम



अनुक्रमणिका







## तुकारामाचा अंत

तुकारामाचो रेघ इंद्रायणीत विरघळली
की विठ्ठलात निवर्तली
हे आज सांगतो.
आज सांगतो, वंचनेचे विमान
कसे वैकुंठाला जाते.
आज सांगतो सदेह फरारी झाला
तुकाराम वाणी कसा.
आणि विठ्ठल विठ्ठल कोण म्हणत
सन्याशाने आत्मत्याग केला कसा.
कसे मडके फुटले
आणि निखारे राखत परतले.
भाविक वारकऱ्यानो,
अभंगाने रंगलेली थोबाडे
बंद करा. ऐका सताड पसरलेला स्वर
वैकुंठ कंठणारा, भरडलेला, भाकलेला.
पहा एक घरघरणारे जाते
त्याची गर्द पिठूळ वर्दळ
आणि मूठ-मूठ पसा-पसा जन्म
वैकुंठाच्या तोंडात ओतलेला.
तुकारामाचा घसा
विठ्ठलानेही बसला नव्हता.

—दिलीप पु. चित्रे

## सिग्रेटी कविता

—१—

मी सगरेट ओढतो
हे मी तुला का सांगितलं नकळे!
त्यात काही पुरुषार्थ निश्चितच नव्हता;
आपल्याशी अविभाज्य साऱ्याच गोष्टी
सांगायला पाहिजेत, असंही नाही;
अग्निदिव्यं वगैरेंवरून स्वतःवरली
निष्ठा पारखण्याचा पौराणिक
अहंकारही त्यात नसावा.
कदाचित्, स्वतःच कशाने तरी जळत असता
साचलेली राख झटकून टाकण्याचाच
तो एक प्रतिक्षिप्त प्रामाणिक चाळा असेल!

— २ —

मी सिगरेट ओढतो
हे मी तुला सांगितलं:
तू तुझ्या मांड्यांवरून
स्कर्ट ओढन घेतलास:
तुझ्या सदाफुली डोळ्यात
पांगारा पेटला होता

—गुरुनाथ सामंत

## काचेच्या पेल्यासारखे

सत्य असते सत्यासारखे
अर्धा भरलेल्या काचेच्या पेल्यासारखे
एक म्हणतो :
अर्धा पेला भरलेला आहे
हे सत्यच....
एक म्हणतो :
अर्धा पेला रिकामा आहे
हेही सत्यच....
पण तो एक
अर्धा पेला रिकामा आहे हे पाहात नाही
आणि हा एक
अर्धा पेला भरलेला आहे हे सांगत नाही
म्हणजे सत्य अर्धे नसते
अर्धे असतो आपण
आपण : अर्धसत्य
सत्य : अर्धा भरलेल्या काचेच्या
पेल्यासारखे.

—— रमेश तेंडुलकर

## घर

त्याचा छंद तिला समजलाच नाही
भर मैफलीतून ती उठून गेली
आता दिवसदिवस तंबोरा गवसणीतच असतो
एकच तार तेवढी तुटायची बाकी आहे
तीच कधीतरी तो छेडीत रहातो
आणि आलापित बसतो :
नुस्तेच एकमेकाशी आंधळी कोशिंबिर खळणारे
आरोह—अवरोह
रात्र होते
नुस्ताच तारवटल्या डोळ्यांनी असतो बसून
मग कधीतरी लोटून देतो स्वतःला अंथरुणावर
मध्येच उठून पाण्यावरोबर
घटघटा हुंदकेही रिचवतो.
एकदा म्हणाला :
"ही लॅम्पशेड माझ्या मुलानं केलेली. तसंच हा
रंगीत वॉलपीस....
तुम्हाला घेऊन जा....
असंच कुणाकुणाला सारं देऊन टाकलं
आता एकदा घर पूर्ण मोकळं करून
कायमचा निघून जाईन इथून.
अखेर हे भाड्याचंच घर!
किती दिवस भरीत रहायचं एवढं जीवघेणं भाडं?

—गुरुनाथ घुरी

* * *

अनुक्रमणिका

# GRAND COMPETITION

BY

The Directorate of Tourism

Government of Maharashtra

Bombay.

A competition is being held on the occasion of the Maharashtra Festival. Professional Artists and Art Students in the Art of Painting, Poster Drawing and Photography Are Invited to Forward their Entries. The Subjects Suggested are (1) Scenic Beauty Spots, Wild Life, Places of Historical and Religious importance, Hill Stations, Holiday Homes in Maharashtra (2) Culture, Costumes, Customes and Festivals of Maharashtra.

**PRIZES**

| | | | | |
|---|---|---|---|---|
| PAINTINGS | ARTIST CATEGORY | THREE PRIZES OF Rs. | 1000 | Each |
| | STUDENTS CATEGORY | THREE PRIZES OF Rs. | 500 | Each |
| POSTERS | ARTIST CATEGORY | THREE PRIZES OF Rs. | 1000 | Each |
| | STUDENTS CATEGORY | THREE PRIZES OF Rs. | 500 | Each |

PHOTOGRAPHS : FIRST PRIZE Rs. 300/-
SECOND PRIZE Rs. 200/-
THIRD PRIZE Rs. 100/-
CONSOLATION PRIZES : 20 OF Rs. 50 Each

**CONDITIONS :**

1) All the Prize winning entries will be the property of the Directorate of Tourism with absolute Right of Production. (In case of Prize winners in Photography the Negative will have to be surrendered to the Director of Tourism).

2) The Sizes will be as follows :
PAINTING : Not less than 50·80 cms x 76·20 cms.
POSTER : 50·80 cms. x 76·20 cms.
(For poster maximum 5 colours should be used).
PHOTOGRAPHS : 25·40 cms. x 30·48 cms.

3) All the Entries should be marked together with the covering letter giving description of the entry.

4) Any Number of entries can be sent.

5) The decision of the Selection Committee will be final and binding.

6) Entries should be sent to the Director of Art, Government of Maharashtra, J. J. School of Art Compound, Bombay-1, on or before 15th December 1970 for Students Category and 10th February 1971 for Artist Category and Photographs.

**ISSUED BY THE DIRECTORATE OF TOURISM, GOVERNMENT OF MAHARASHTRA BOMBAY.**



अनुक्रमणिका




अरविंद ताटके

शहाजहान बादशहाचा आज वाढदिवस असल्यानं दरबारात नुसती धूम उडाली होती. दाटीवाटीनं सगळे सरदार-दरकदार, अमीर अन् फकीर तिथं जमा झाले होते. पुढं जागा मिळावी म्हणून रेटारेटी चालली होती. एरवी अशा गोंधळाला केव्हाच मनाई झाली असती. पण आजचा सगळा नूरच वेगळा होता. रसिक शहाजहानचा आज वाढदिवस असल्यानं सर्वत्र खुषीचं साम्राज्य पसरलं होतं. त्याच्या राज्यात संपत्तीचा नुसता पूर वहात होता अन् त्याचा खजिना पैशानं प्रतिदिनी तुडुंब भरत होता. हिरेमाणकांनी साऱ्या कोठ्या नुसत्या भरून गेल्या होत्या अन् जामदारखान्यात रत्नांचा नुसता खच पडला होता. आज त्याच्या दानधर्मालाही धरबंद नव्हता. ओळखीचे-पाळखीचे, नातेवाईक अन् गरीबांना त्यानं त्यादिवशी देता येईल तितकं दिलं. सर्वांनी त्याला दुवा दिला, मलाई दिली. काहींनी त्याला नजराणेही दिले. फकीरांच्या आशीर्वादांच्या ललकाऱ्यांनी बादशहा खूष झाला. दरबार संपायची वेळ आली तोच त्या दाटीवाटीतून एक जवान सर्वांना बाजूला लोटीत पुढंपुढं चालला होता.

त्या जवानाची उंची चांगली भरपूर होती. वर्णानं तो चांगलाच गोरा होता. एखाद्या मल्लासारखं त्याचं शरीर कमावलेलं दिसत होतं. त्याचे डोळे जांभळे-निळे होते. त्याच्या अंगात हिरवं जाकिट होतं. डोक्यावर लाल रंगाची गोंडेदार टोपी होती अन् तीमधून त्याच्या केसांची झुलूपं बाहेर येत होती. त्याच्या लांबसडक बोटात हिऱ्याच्या आंगठ्या चमकत होत्या. त्याच्या कानात सोन्याच्या सलकड्या शोभत होत्या. छोटीशीच दाढी त्यानं ठेवलेली होती. हजारात उठून दिसावं असं त्याचं विलक्षण व्यक्तिमत्त्व होतं. मर्दानी सौंदर्याचा तो जवान निर्भयपणं बादशहाच्या मयुरासनाजवळ येऊन उभा राहिला तेव्हा साऱ्या दरबारच्या नजरा त्याच्याकडं रोखल्या. पण बादशहा अगदी शांत होता. त्यानं त्या तरुणाला विचारलं––

"काय इनाम हवंय् बेटा तुला?"

"ते नंतर सांगेन."

"तुझं नाव?"

"बुलंद अख्तर म्हणतात मला."

"नाव तर छान आहे. उद्योग काय करतोस?"

"पोटापुरतं वाडवडिलांनी ठेवलंय सरकार."

"अन् तू नुसता बसून खातोस?"

"माझ्यापुरतं मिळवतो बाहेर."

"करतोस तरी काय?"

"सुंदर अन् श्रीमंत स्त्रियांना माझ्या कविता, गजल गाऊन दाखवितो. खुषीनं त्या देतात ते घेतो"

"बेवखूब! दरबारात असं सांगायला शरम नाही वाटत तुला?"

"शरम कशाची? मी आपला थोडाच मिंधा आहे?"

"मग बोल काय हवंय् तुला?"

"काही नकोय! वाढदिवसाची भेट द्यायचीय आपल्याला."

"काय देणार आहेस तू मला?"

"कुणी दिलं नाही ते."

अख्तर आणखी पुढं सरकला. हातातली चांदीची डबी त्यानं शहाजहानच्या हातात दिली. त्या सुंदर डबीवर बादशहाही मोहून गेला. त्यानं लागलीच विचारलं--

"अख्तर, आत काय आहे?"

"अंजन."

"मला ते देण्याचा मतलब?"

"जहाँपन्हा! घुस्सा करणार नसाल तर सांगतो"

"घुश्शाला आज मनाई आहे. बेशक सांग"

"जहाँपन्हा, बेगमसाहेबा जाऊन पुष्कळ साल उलटले. आपली पन्नाशीही उलटली. तरी आपली तबियत अजूनही एखाद्या जवानासारखी दिसतेय्."

"खुदाची मेहेरनजर आहे माझ्यावर अख्तर"

"ना ना. त्याचं सारं श्रेय आपल्या खूबसूरत बेटीला आहे. ती सतत आपल्या दिमतीला आहे म्हणून तर आपण असे तगडे आहात. खरं म्हणजे एव्हाना तिची सेवा दुसरीकडं पेश व्हायला हवी होती. पण

**. . . इतिहास आणि क्रीडा–विशेषतः क्रिकेट–यांच्यावर श्री. अरविंद ताटके यांचे अनिवार प्रेम . . . ऐतिहासिक कथा लिहीताना इतिहासाचा मूळ आधार सुटणार नाही अशी दक्षता ते सतत घेत असतात . . . म्हणूनच त्यांच्या कथा सामान्य वाचकाप्रमाणे इतिहासतज्ञानाही आवडतात . . . प्रस्तुत प्रदीर्घ ऐतिहासिक कथाही त्याच धर्तीची . . .**

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

त्याची जाणीव आपल्याला होत नाही हा माझा दर्द आहे. तशी जाण आपल्याला यावी म्हणून अंजन देतोय. त्यानं डोळे लख्ख होतील अन् मग आपली बेटी आता किती मोठी झालीय त्याची समज आपल्याला येईल."

"तुझ्यासारख्या कलंदरानं माझ्या खाजगीत लुडबूड करण्याची जरूर नाही. फार मकलास. आज आनंदाचा दिवस आहे. नाहीतर!"

"काय केलं असतंत सरकार?"

"अख्तर, तुझी चुरचुरणारी जीभ केव्हाच सफा झाली असती" बादशहा क्रोधानं बोलला.

"जहाँपन्हा. ही सजा मी आनंदानं भोगीन. पण शहाजादी कुंवार राहिलीय म्हणून अलम दुनियेच्या जीभा नाही नाही ते बोलतायत त्या आपण कशा सफा करणार. सगळ्यांची भावना मी धैर्यानं बोलून दाखविली एवढंच."

"न्या याला बाहेर अन् उडवा याची गर्दन" बादशहानं रागानं हुकूम दिला.

"एवढ्यात भडकलात जहाँपन्हा. सुरुवातीला काय हवंय असं आपण विचारलं होतंत मला."

"मग बोल! काय हवंय तुला? शहाजहाननं थंडपणं विचारलं.

"आपली खूबसूरत बेटी."

"तुझ्यासारख्या भणंगाला जहानआरा देऊ?"

"का? जगन्नाथ पंडितांना लवंगी नाही दिलीत?"

"कुठं पंडित जगन्नाथ अन् कुठं तू अख्तर!"

"नसेन मी त्यांच्यासारखा पढलेला. पण शक्तीसामर्थ्यात तर मी अचाट आहे ना? दरबारातल्या कुठल्याही सशक्त आदमीशी दोन हात करायला मी तयार आहे! माझी ताकद पहावीच एकदा सरकार."

"बस् झाली तुझी बडबड अख्तर! इथून हलवा याला अन् द्या मघाशी सांगितलेली शिक्षा" शहाजहान आपल्या सेवकांकडं वळून बोलला. क्रोधानं तो नुसता जळफळला होता.

तेवढ्यात चिकाचा पडदा सळसळला. तिथून शहाजहानला फर्माइश झाली त्याच्या बेटीची, जहानआराची.

"अब्बाजान, आजचा दिवस केवढ्या खुषीचा. त्यात असली क्रूर शिक्षा देऊन विरस करू नका सर्वांचा."

शहाजहान विरघळला. अन् मग सेवकांना म्हणाला–"बेटीचा मी बंदा आहे. पन्नास फटके लगावून द्या याला सोडून" एवढं बोलून बादशहा तरातरा दरबारातून निघून गेला अन् रक्षक अख्तरला घेऊन सजा पुरी करण्यासाठी निघाले. दरबार अचानक बरखास्त का झाला त्याचं कारण कुणालाच कळलं नाही.

* *

फरासखान्याच्या आतल्या बाजूला एक उघडं आवार होतं. तिथं एका लांब लादीवर अख्तरला पालथं निजविण्यात आलं होतं. एक काळाकभिन्न नि बलदंड हबशी त्याच्या पाठीवर सपासप आसूडाचे फटके मारीत होता. अख्तरच्या पाठीचं खिरडं बनत चाललं होतं, पण त्याच्या तोंडातून एक शब्दही निघत नव्हता. जवळच बादशहाचा वजीर ते दृश्य पहात होता. तेवढ्यात 'बस्स करो' असा जनानी आवाज उमटला. वजीरानं वळून पाहिलं तेव्हा त्याच्याजवळ बादशहाची बेटी जहानआरा येऊन उभी राहिली होती. क्रोधानं तिचं सारं शरीर थरथरत होतं अन् मग ती वजीरावर कडाडली--

"तुम्हाला काय त्यांची जान घ्यायचीय काय ?"

"बेगमसाहेबा, बादशहांचा मी बंदा आहे" वजीर हळू आवाजात बोलला.

"मग मी बादशहांची छोकरी तुम्हाला फर्मावितेय की बंद करा हे फटके."

"जसा आपला हुकूम ! पण बादशहांनी मला जाब विचारला तर ?"

"त्याची फिकीर नका करू. अब्बाजानना काय सांगायचं ते मी पाहीन. हकीमांना बोलावून ह्यांची मलमपट्टी करा"

"जसा आपला हुकूम" वजीर नम्रपणं बोलला.

फटके थांबविण्याचा हुकूम दिल्यावर थोड्या वेळानं हकिमानं अख्तरच्या पाठीला लेप लावला. अजस्र शक्तीचा अख्तर उभा राहिला. त्यानं कपडे चढविले. त्याचा चेहरा तेवढा म्लान झाला होता अन् पाठही कमालीची ठणकत होती तसाच तो घरी गेला. घरात पाऊल टाकल्यावर मात्र त्यानं बिछान्यावर अंग टाकलं. त्याला थोडीशी ग्लानी आली. त्याच्या वृद्ध मातेनं त्याला माराचं कारण विचारलं तेव्हा अख्तरनं तिला सर्व कहाणी सांगितली. त्याची आई मोठी करारी होती. ती बोलली–"ठीक केलंस बेटा ! नाहीतरी बादशहाला फार मस्ती चढलीय. कुणीतरी त्याच्या तांडावर त्याला जाब विचारायला हवाच होता. ते काम तू ठीक केलंस." एवढं बोलून म्हातारी बाहेर गेली अन् अख्तर जहानआराची आठवण काढत एकटाच भुतासारखा त्या बिछान्यावर झोपण्याचा प्रयत्न करीत होता. अख्तरचा डोळा लागतो न लागतो तो दारावर टकटक ऐकू आली. दार उघडलं तो दारात बादशहाची मुलगी जहानआरा उभी होती. बुरखा तिनं काढलेला नव्हता.ती अख्तरच्या बिछान्यापाशी आली. अख्तरनं डोळे किलकिले करून तिच्याकडं पाहिलं अन् मग त्यानं प्रश्न केला––

"कोण जहानआरा ?"

"मला कसं ओळखलंत ?"

"आपल्या डोळ्यावरून !"

"ते कुठं पाहिलेत तुम्ही ?"

"दरबारात मी बादशहाशी बातचीत करीत होतो तेव्हा चिकाच्या पडद्याआड तुमचे दोन डोळे लुकलुकत होते."

"म्हणजे तुमचं लक्ष बादशहाच्या जनानखान्याकडं होतं म्हणायचे ?"

"गलत होतेय जहानआरा ! नजरेला आलं म्हणून पाहिलं बेगमसाहेबा."

"हां ! हां ! मला बेगम नका म्हणू !"

"का ?"

"मला नुसतं जहानआराच म्हणा ! बेगम नावाला मी अगदी कंटाळलेय."

"जशी आपकी मर्जी ! पण एक गोष्ट कराल का ?"

"सांगा !"

"तेवढा बुरखा काढून टाका ना !"

"अख्तर, दुसरं कुणी असं सांगितलं असतं तर काय झालं असतं आहे माहीत ?"

"गर्दन उडली असती ना ? आपण तशी कामगिरी बजावू शकता !"

"ना ना. आपल्यासारख्या शूराला कोण मारील ?"

"माझा शूरपणा केव्हा पाहिलात आपण ?"

"फटके खाताना आपण तोंडातून ब्रही काढला नाहीत अन् चालत तसेच घरी आलात तेव्हा!" एवढं बोलून जहानआरानं आपला बुरखा बाजूला फेकला. तिचं लावण्य पाहून बुलंद अख्तरचा सगळा ठणका नाहीसा झाला. तो तिच्याकडं नुसता पहातच राहिला अन् तीही घिप्पाड अन् मदनाचं रूप असलेल्या अख्तरकडं एकटक पहात राहिली.

जहानआरा सडपातळ होती. तिचा वर्ण गोरा लख्ख असून, तिची कान्ती लालबुंद होती. डोळ्यातल्या सुरम्यामुळं तिचा चेहरा आकर्षक दिसत होता. तिच्या मांसल हाताची बोटं लांबसडक होती अन् ती मेंदीनं रंगलेली होती. उन्नत उरोजांमधून तिचं तारुण्य ओसंडत होतं. भरदार मांड्यांमुळं अन् पुष्ठ नितंबांमुळं तिची सुरवार तिच्या शरीराला घट्ट चिकटली होती.सफरचंदांनी लाजावं इतके गाल लाल अन् गुबगुबीत होते. जिवणी तिची लहान असली तरी तिच्या ओठांना असा काही तजेला होता की कुणालाही तिचं चुंबन घेण्याचा मोह आवरला नसता.

तिचं रसरसलेलं लावण्य पाहून बुलंद अख्तर अवाक् झाला होता. तेवढ्यात तिनं त्याला प्रश्न केला––







"एवढं काय टक लावून पहाताय माझ्याकडं ?"

"तुझी खुबसूरत सूरत पहातोय जहान-आरा"

"तुम्ही काय कमी देखणे आहात अख्तर ?"

"पुरुषाचं सौंदर्य पहायचं नसतं जहान-आरा !"

"मग काय पहायचं असतं ?"

"पराक्रम !"

"तो पाहिला दरबारात अन् फटके खाताना !"

"एवढी खूप झालीस माझ्या सामर्थ्या-वर ?"

"म्हणून तर आपणहून आले तुम्हाला भेटायला, सगळ्यांना हूलकावण्या देत !"

"जहानआरा, एक विचारू ?"

"तुला शादी कराविशी नाही वाटत ?"

"वाटून काय उपयोग ?"

"अडचण कसली आहे ?"

"बादशहांच्या तोलाचा जावई हवा. अब्बाजानना तसा आदमी कुणी आढळत नाही. त्यामुळं सगळं अडलंय."

"तुझा जीव अडकलाय कुठं ?"

"परवापर्यंत नव्हता अडकला ? पण दरबारात एकानं माझं दिल् चोरलंन् !"

"काय ऐकतोय मी हे जहानआरा ? "

"खरं सांगतेय अख्तर"

"खरंच तू मला चाहतेस ?"

"झूट कशाला बोलू ? उगीच नाही तुमचे फटके कमी करवले !"

"माझ्याकडं ना दौलत ना सत्ता. कवि-तेनं का कुठं पोटं भरतात ? माझ्यात असं काय पाहिलंस जहानआरा ?"

"तुमचं विलक्षण व्यक्तिमत्व अन् तुमचा निर्भयपणा. दरबारात तुम्ही अब्बाजानना खडसावण्यास घाबरला नाहीत म्हणूनच मी तुमच्यावर आषक् झालेय"

"मीही चहातो तुला जहानआरा. तुझ्या सौंदर्याची कीर्ती लहानपणापासनं ऐकत आलोय. तुझ्या औदार्याचे किस्सेही सुनले आहेत. अन् म्हणूनच तुझ्या कारुण्याचा दर्द मला समजला. तेव्हा मनात ठरविलं की बस्स. शादी करायची तर तुझ्याशीच. त्यासाठी तर त्यादिवशी दरबारचा रस्ता पकडला."

"बादशहांना तुमचे शब्द फार झोंबले पण त्या तुमच्या शब्दांनीच मी शरविद्ध झाले."

एवढ्यात जहानआराच्या दासीनं कुणी-तरी हेर पाळतीवर असल्याची सूचना दिल्यानं जहानआरा चटकन् निघून निघाली. अख्तरनं विचारलं——

"पुन्हा कधी येणार जहानआरा ?"

"खुदा संधी देईल तेव्हा" इतकं बोलून ती तरातरा निघून गेली. तिच्या सौंदर्याची याद करीत अख्तर एकटा बसला असतानाच त्याची आई आत आली.

* *

जहानआरा बुलंद अख्तरला भेटून आल्याची बातमी शहाजहानला लागली तरी तो चूप होता. मुलीवर त्याचं अपार प्रेम होतं. तिच्यापुढं त्याचा सारा राग मावळून असे. अशीच तो अन् जहानआरा बातचीत करीत असताना तिनं त्याला



अनुक्रमणिका

विचारलं––

" अब्बाजान, एक गोष्ट पुछू ?"

" बेशक "

"तुम्ही अख्तरची पाठ सोलून काढलीत. त्याला पहायला जाऊ ?"

" एकदा जाऊन आलीस ना ?"

" तुम्हाला कसं कळलं अब्बाजान ?."

" हिंदुस्थानच्या बादशहाला सगळ्या बातम्या समजतात हेरांकडून ! "

" पुन्हा जाऊ मी ?"

" जा बेटी. पण याचा अर्थ लोक वेगळाच घेतील. तू बादशहाची बेटी आहेस ही गोष्ट कधी भुलू नकोस. बोलताना-वागताना त्याच्याशी अंतर ठेव "

" मालूम आहे मला ते सारं " एवढं बोलून जहानआरा निघाली पण बादशहानं अख्तरच्या घरामोवती हेरांचा सक्त पहारा जारी केला.

जहानआरा अख्तरच्याकडं आली तेव्हा तो एकटाच होता. तिला पाहून तो म्हणाला,

" जहानआरा, तू पुन्हा लौकर कशी आलीस ?"

" तुमच्या मोहबतीनं आणले मला पुन्हा इथं "

" जहानआरा, मी काही अमीर नाही. तू जनानखान्याच्या ऐश्वर्यात वाढलीयस. माझ्याशी शादी करून तू सुखी होशील ?"

" तुमची मोहबत हीच माझी दौलत. तुमच्या अचाट सामर्थ्यावर माळून तुम्हाला कुणीही सरदारकी देईल की ! "

" ना ना. मी नोकरी कधी नाही करणार. नोकरी म्हणजे गुलामी आहे जहानआरा "

" मग काय नुसतं घरात बसून खाणार ?"

" आजपर्यंतची जिंदगी अशीच गेली जहानआरा. खुदानं अजून तरी काही कमी केलेलं नाही. थोडी शेतीवाडी आहे अन् समाईकीतलं एक दुकानही आहे. फार श्रीमंती तरी काय करायची ?"

"मी तर श्रीमंतीत वाढलेली मग आपलं दोघांचं भागणार तरी कसं ?"

" फार पुढचं बोलतेयस जहानआरा. माझ्याशी शादी करण्याला बादशहांकडून सक्त मनाई होईल जहानआरा ! तशीच वेळ आली तर माझी ते जान घेतील पण तुला माझ्याशी कदापि शादी करून देणार नाहीत "

" काय बोलता अख्तर ? एवढे का अब्बाजान दुष्ट आहेत ?"

" तुझे ते पिताजी आहेत तेव्हा तुला ते चांगलेच दिसणार. पण जहानआरा लक्षात असू दे की भावांचा निकाल लावूनच तुझ्या अब्बाजाननी तख्त बळकावलंय ! "

" म्हणजे माझे अब्बाजान खुनी आहेत तर ?"

" जहानआरा सत्य नेहमीच कटु असतं. बादशाही मिळविताना त्यानी स्वतः खून केलाही नसेल. पण आपल्याला आडवे येणाऱ्यांना त्यांनी दुसऱ्यांच्या करवी अल्लाची वाट दाखविलीय. सारे वुढ्ढे लोक असंच बोलतात. तू राहतेस जनानखान्यात. तुला या गोष्टी कशा कळणार ? पण जहानआरा मला गंमत वाटते ती ही की तुझ्या शादीबाबत बादशहा गाफील रहातात पण स्वतःचे विलास मात्र त्यांना सुटत नाहीत."

" माझ्या तकदीरातच जर शादीशिवाय रहाण्याचं असेल तर अब्बाजान तरी काय करणार ?"

" मग, आता तुझी हिंमत आहे का त्यांना सांगायची की तुझी माझ्याशी शादी करण्याची इच्छा आहे म्हणून ?"

" सांगेन की ! लवंगीला नाही का त्यांनी पंडित जगन्नाथाना दिली ! "

" लवंगी अनौरस होती जहानआरा. किती झालं तरी ती रखेलीची छोकरी होती. कुठला खानदानी माणूस तिच्याशी निका लावायला तयार झाला असता ? तसे तुझे अब्बाजान महाधूर्त आहेत. जगन्नाथांनी मागणी केली अन् त्यांनी लागलीच लवंगी त्यांना देऊन टाकली. पण तुझ्या बाबतीतला मामला बिकट आहे. त्याचा फैसला आपल्या मनाप्रमाणं होणं कठीण आहे जहानआरा ! "

" मग काय करायचं अख्तर ?"

" आपण पळून जाऊ या. हा देश सोडून इराण वगैरे देशाकडं निघून जाऊ. आहे तुझी तयारी ?"

" ना ना. त्यामुळं अब्बाजानना फार दुःख होईल. मा गेल्यापासनं त्यानी मला फुलासारखी वाढवलीय. माझ्याशिवाय त्यांचं पानही हालत नाही. त्यांच्या मनाविरुद्ध मला नाही जाता येणार अख्तर ! पण पहाते प्रयत्न करून ! " एवढं बोलून जहानआरा हमसाहमशी रडू लागली.

अख्तरनं तिचे डोळे पुसले. त्याचा हात तिच्या गालांवर फिरत होता. तेवढ्यात जहानआरानं आपली मान त्याच्या छातीवर विसावली. मग ती त्याच्या बाहुपाशात कशी गेली त्याचा पत्ता दोघांनाही लागला नाही. तिच्या सौंदर्यावर मनःपूतपणे डल्ला मारण्याची संधी अख्तरला चालून आली होती. अशी पर्वणी तो पुरी वसूल करीत

होता. डोळे किलकिले करून जहानआरा त्याला हवं ते देत होती. जनानखान्यात सदैव कोंडलेली जहानआरा तारुण्याची मस्ती प्रथमच अनुभवीत होती. हा अनुभव तिला नवा होता. शृंगाराच्या बेहोशीत ती स्वतःला विसरली होती. आधाशीपणे अख्तर तिच्या गालांवर अन् ओठांवर तुटून पडला होता अन् त्याच्या हाताला तिच्या शरीराचा कुठलाच भाग वर्ज्य राहिला नव्हता. तरुणाची संगत ही काय चीज असते त्याची गोडी जहानआरा चाखीत होती अन् शृंगाराच्या त्याच्या साऱ्या मागण्या निःशंकपणं पुरवित होती.

तेवढ्यात दार वाजल्याचा भास झाला म्हणून दोघं भानावर आली... जहानआरा अख्तरला बोलली–"पुरे झाला चावटपणा आता अख्तर. निघते मी आता!"

"चावटपणा नसता तर सगळी दुनिया नुसती दुःखी बनून राहिली असती. शृंगार ही माणसाच्या दुःखावरील फुंकर आहे जहानआरा. पण एक विचारायचं राहिलंच की!"

"विचारा"

"माझ्याशी तू शादी करशील?"

"करीन. पण अब्बाजानची समजूत पटली तर."

"अन् त्यांनी विरोध केला तर?"

"माझ्याविरुद्ध ते जाणार नाहीत. तुमच्या इतकीच मी त्यांनाही चाहते. त्यांचीही माझ्यावर अलोट मोहबत आहे. एकदा मी भाजले होते अख्तर! तेव्हा त्यांनी माझी शुश्रूषा एखाद्या दासीप्रमाणं केली. त्यांना दुखविणं मला जड जाईल. पण तशी वेळ येणार नाही असं मला वाटतं"

"बरं पुन्हा कधी येशील?"

"शादीचा फैसला करण्यापुरती तरी येईन."

एवढं बोलून जहानआरानं बुरखा चढविला अन् दार उघडून ती केव्हा गेली त्याचा पत्ताही अख्तरला लागला नाही. आता मात्र त्याची पाठ कमालीची ठणकत होती अन् जहानआराची याद करीत तो आपलं दुःख विसरण्याचा प्रयत्न करीत होता.

* *

खाना उरकून शहाजहान पान खात बसला होता. जहानआराही त्याच्याजवळ बसली होती. तिनं करून दिलेलं पान तो प्रेमानं चघळत होता. पान करताना तिची होत असलेली धांदल त्याच्या चाणाक्ष नजरेतनं सुटली नाही अन् आपले डोळे तिजवर रोखून तो बोलला——

"काय म्हणतोय बुलंद अख्तर?"

जहानआरा चपापली. बादशहा असं काही विचारील अशी तिला कल्पना नव्हती. पण स्वतःला लागलीच सावरत ती म्हणाली

"प्रकृती सुधारतेय आता त्यांची."

"माझ्या प्रश्नाचं हे उत्तर नव्हे बेटी!"

"तुमच्यावर त्यांचा घुस्सा आहे."

"तोच मला ऐकायचाय जहानआरा."

"सगळ्या भावांची वाट लावून तुम्ही तख्त बळकावलंत असं म्हणतोय अख्तर! खरं का हे अब्बाजान?"










"बेटी, तुला आज वेड तर लागलं नाही. तो काही तरी भकतो अन् तू मला त्याविषयी विचारतेस. जहानआरा, राजकारण ही अशी चीज आहे की तिथं आडवं येणाऱ्याला कापावंच लागतं. राज्यावर बसताना ज्यांनी मला विरोध केला, कारस्थानं केली त्या सर्वांचा नायनाट करण्याखेरीज दुसरा उपायच नव्हता. नाहीतर मीच त्यांच्या तलवारीला•बळी पडलो असतो. पण अख्तरला या चांभारचौकशा कशाला हव्यात बेटी?"

"तुम्ही त्याला फटक्यांची सजा दिलीत त्यामुळं तो बोलला असेल असं!"

"अन् तू ते निमूटपणं ऐकून घेतलंस?"

"मला त्यातलं काहीच माहिती नाही म्हणून तर आपल्याला विचारलं. पण माझ्या शादीबाबत अख्तरनं आपल्याला सवाल केला म्हणून आपल्याला तरी एवढा घुस्सा का आला?"

"बेटी, कुणाही यःकश्चित माणसानं आमच्या कबिल्यामधल्या गोष्टीत नाक खुपसू नये. खरं त्या दिवशी त्याची गर्दन उडायला हवी होती. पण...."

"पण मी आडवी आले असंच ना? अब्बाजान एक विचारू?"

"विचार बेटी?"

"आपण माझी शादी का नाही करीत?"

"बुलंद अख्तरनं तुला पढविलेलं दिसतंय."

"त्यानं कशाला पढवायला पाहिजे. मी काही आता लहान नाही."

"मग इतके दिवस हा सवाल तू का नाही केलास बेटी?"

"कुठली बेटी असला प्रश्न आपल्या बापाला विचारील अब्बाजान?"

"मग आत्ताच का विचारलास?"

"अख्तरनं तो विचारला असला तरी त्या सवालात तथ्य आहे एवढंच मला म्हणायचंय."

"वाः म्हणजे तुम्ही दोघं आता एक झालेले दिसता."

"एक होण्याचा प्रश्न नाही अब्बाजान. पण सत्य सांगितल्यावर तुमचा एवढा घुस्सा का व्हावा अन् मूळ प्रश्नाचं उत्तर अजूनही छपवून ठेवता त्याचं कोडं काही मला अजून सुटत नाही."

"कोडं कसलं आलंय त्यात. मुमताज गेल्यापासनं तसा मी अगदी एकटा आहे. अनेक स्त्रिया माझ्या आयुष्यात आल्या; पण मुमताजची सर कुणाला आली नाही. त्यामुळं माझं जीवन एकाकी बनलं. तुझे भाऊ कसे आहेत त्याची कल्पना तुला आहेच. दारा चांगला आहे; पण तो नेहमी धर्मशास्त्रांच्या वाचनात दंग असतो. औरंगजेब तर माझ्या नाशासाठीच टपलाय. मलाही माझी पापं भेडसावताहेत. ताजमहाल उठविताना अनेक जीवांची हत्या झाली. त्याचं पापही माझ्या शिरावर आहे. औरंगजेब तर मला जेलबंद करण्याचीच कारस्थानं करतोय. या सगळ्या दुःखात तूच माझा विरंगुळा बेटी. उद्या मी कैदेत गेलो तर तिथं माझी देखभाल तुझ्याशिवाय कोण करणार बेटी. मला वृद्धत्वाला तुझा

दर्द समजतोय. पण मी परिस्थितीपुढं लाचार आहे बेटी."

"मग जिंदगीभर मी असंच रहायचं ?"

"तुझ्या प्रश्नाचं उत्तर दिलंय मी."

"पण मी तर अख्तरशी शादी करायचं ठरविलंय."

"ही शादी अल्लाला मान्य होणार नाही बेटी."

"तुम्हाला म्हणा. उगीच अल्लाचं नाव कशाला घेता ?"

"तसं म्हण ! मी तमाम हिंदुस्थानचा बादशहा अन् तू तर एखाद्या भणंगाशी शादी करायला निघालीयस्."

"मग द्या की एखाद्या अमीराशी माझी शादी करून !"

"बेटी. बोलण्यात तू मला हरविलंस. तू लग्नाशिवाय राहिलीस ही चूक माझी आहे त्याची जाण मला आहे. शादीचं वेड डोक्यातून काढून टाक, माझ्यासाठी."

"वुढ्ढे झालात तरी तुमचे पौक सुटत नाहीत अन् मला मात्र तुम्ही शादीशिवाय जिंदगीभर राहायला सांगताय."

"सगळं मान्य आहे मला बेटी. पण अख्तरशी तुला शादी करता येणार नाही एवढंच मी सांगतो. तशी काही हालचाल केलीस तर त्याची लाश पहाणं तुझ्या तकदीरात येईल !"

"तुम्ही त्याला मारणार ?"

"असं कुठं मी म्हणतोय ? तू त्याच्याशी शादी करण्याच्या फंदात पडू नको एवढंच माझं म्हणणं आहे. तुझ्या त्याच्याकडं सारख्या खेपा चालू झाल्या तर सारी दिल्ली थुंकेल माझ्या तोंडावर."

"मला अशीच ठेवलीत म्हणून थुंकतेच आहे की सगळी दिल्ली."

"जहानआरा, फार बोललीस ! मला वाद घालायला वेळ नाही. नमाज पढायचाय मला."

"पण, अख्तरला एकदा भेटून येऊ ?"

"मागं गेलीस तेव्हा कुठं विचारलं होतंस ? खुशाल जा. पण ही गोष्ट षट्कर्णी झाली की अख्तरच्या हातात बेड्या पडतील एवढं लक्षात ठेव." एवढं बोलून बादशहा नमाज पढण्यास गेला अन् जहान-आराची पावलं अख्तरच्या घराकडे वळली. हेरगिरी करणाऱ्या दासीही तिच्या पाठोपाठ निघाल्या.

*

जहानआराचा पोशाख अगदी साधा होता. तिच्या नाजूक अन् लुसलुशीत बोटात सोन्याची आंगठी चमकत होती. त्यात बसविलेल्या लालबुंद पोवळ्यामुळं तिच्या गोऱ्या बोटात ती अंगठी फारच शोभून दिसत होती. पांढऱ्या लेहेंग्यावर तिनं पिवळी जर्द अन् भरजरी अचकन घातली होती. त्यावरची मोतीया रंगाची ओढणी तिच्या सौंदर्यात आणखीनच भर टाकीत होती. तिच्या चढावावर दिव्याचे खडे बसविले होते अन् तिचे तळपाय मेंदीनं मढविलेले होते. तिनं अख्तरच्या घरात प्रवेश केला तेव्हा तो एकटाच होता. तिला पाहून त्याची कळी एकदम खुलली अन् मग त्या बेहोशीत तो म्हणाला—

"जहानआरा आत्ता कशी आलीस ?"

"म्हणजे येऊ नये की काय ?"

"तसं नव्हे. पण सगळ्यांच्या नजरा चुकवून यायचं म्हणजे कठीणच !"

"आता कशाला हवीय गुप्तता ? अब्बा-जानना ही गोष्ट कळून चुकलीय."

"काय म्हणतेस ? काय कळलं त्यांना !"

"आपली मोहब्बत अन् माझी तुमच्याशी शादी करण्याची इच्छा."

"त्यांना कशा कळल्या या गोष्टी ?"

"भेटीची वार्ता हेरांकडून समजली अन् मोहब्बतीची बातमी मी दिली." जहानआरा लाजत बोलली.

"मग काय म्हणतात अब्बाजान ?"

"शादीला त्यांचा विरोध आहे."

"का ?"

"मुलांवर त्यांचा विश्वास नाही. पुढं-मागं नशिबी कैद आली तर माझीच सोबत त्यांना राहील असं त्यांना वाटतंय."

"तुला काय वाटतंय जहानआरा ?"

"मलाही त्यांच्या म्हणण्यात थोडंसं

## विनोदी साहित्य-स्पर्धेच्या निमित्ताने–

**'दीपावली'च्या दिवाळी अंकासाठी यंदाही विनोदी साहित्य-स्पर्धा आयोजित केली होती. यंदा गतवर्षीपेक्षा अधिक साहित्य स्पर्धेसाठी ठरविलेल्या मुदतीत आले ही समाधानाची बाब आहे; परंतु खेदाची गोष्ट अशी की आलेल्या साहित्यापैकी एकही कथा अगर लेख पारितोषिकपात्र नाही असा परीक्षकांनी निर्णय दिला. परीक्षकांच्या या निर्णयावरून सध्याच्या विनोदी वाङ्मयाची निर्मिती चिंतनीय वाटते आणि साहित्याच्या या महत्त्वाच्या अंगाकडे दुर्लक्ष होत आहे असे दुर्दैवाने म्हणावे लागते. जुन्या विनोदी लेखकांच्या तोडीचे विनोदी साहित्य निर्माण होणार नाही की काय अशी शंकाही आल्यावाचून राहात नाही.**

**परीक्षकांचा निर्णय वर दिल्याप्रमाणे असल्याने पहिले व दुसरे पारितोषिक कोणालाच देता आले नाही; तरीही संपादकांनी उत्तेजनार्ह द्यावयाच्या पारितोषिकाच्या रकमेत वाढ करून खाली नमूद केलेल्या सहा लेखकांना प्रत्येकी रु. ३० (तीस रुपये) प्रमाणे उत्तेजनादाखल देण्याचे ठरविले आहे :– १) श्री. यशविंद गोडबोले, मुंबई–'शेपूट तुटलेला उंदीर'; २) श्री. राजा राजवाडे, मुंबई–'न लिहीलेले न–नाट्य संगीत बोभाटा'; ३) प्रा. वै. द. तुळजापूरकर, मुंबई–'प्राध्यापक पायलट होऊ पाहतात'; ४) श्री. शाम शिराळकर, पुणे–'धन्य ते लेखनी कळा'; ५) श्री. अमृत कृष्ण कदम, मुंबई–'मी जोश्यांचा पत्ता शोधतो' आणि ६) श्री. भालचंद्र साहानी– 'हेडबाई'.**

**उपरोक्त कथा यथाक्रम जानेवारी व मार्च १९७१ च्या 'दीपावली'तून प्रसिद्ध होतील आणि त्यांची पारितोषिके पाठविण्यात येतील–संपादक**

तथ्य दिसतंय. मा गेल्यापासून त्यांचा सारा जीव म्हणजे मीच. त्यांच्या वुढ्ढेपणाच्या दिवसांत मीच त्यांची काठी म्हणून रहावं असं त्यांना वाटतंय. त्यात गैर काय आहे? माझ्यासाठी त्यांनी एवढी अमाप संपत्ती ठेवलीय की मी गोरगरीवांना ती वाटीत गेले तरी माझा खजिना काही रिकामा होणार नाही. माझ्यावरच्या त्यांच्या मोहवतीला तोड नाही अख्तर!"

"हे सर्व त्यांच्या वाजूनं झालं. तुझ्या जिंदगीचं काय? तू सारं आयुष्य असं एकट्यानंच काढणार?"

"काय करावं तेच समजत नाही!"

"वरं राहिलं. आपल्या भेटीवद्दल अन् मोहवतीवद्दल काय म्हणाले वादशहा?"

"आपल्या भेटी या दुनियेच्या चर्चेच्या विषय होतील अन् त्या वाढल्या तर त्या वंद कराव्या लागतील असं म्हणाले ते."

"पण मोहवतीवद्दल काय वोलले ते?"

"मोहव्वत त्यांना मंजूर नाही अन् कफल्लकाशी मी शादी करावी ही गोष्ट त्यांना विलकूल मान्य नाही."

"एवढेच वोलले ते?"

"आपल्या भेटीचे थेर थांवले नाहीत तर तुमची रवानगी कैदखान्यात करावी लागेल असे ते म्हणाले."

"जहानआरा, तुझ्यासाठी कैद मी खुषीनं पत्करीन."

"असं नका वोलू!"

"हे वघ आपल्या मनाच्या तारा जुळून त्यातून मोहवतीचे सूर सुरू झालेयत. यातली एखादी तार तुटली तर दुसरी तार निरुपयोगी होईल ही गोष्ट जनानखान्यातल्या अनेक छेलछवेल्यांच्या सहवासात आकंठ वुडालेल्या वादशहाला कशी कळणार?"

तेवढ्यात जहानआरा अख्तरच्या वळकट खांद्यावर विसावली. अख्तरनं तिचा गुवगुवीत चेहेरा आपल्या हातात घेतला अन् तिच्या ओठांवर चुंवनांची वरसात सुरू केली. तिच्या गालांवरही तो तुटून पडला. तिच्या भरदार अन् उन्नत वःक्षस्थळांवर त्याची नजर खिळली होती अन् जहानआराला त्याचा हेतू समजला होता. त्याच्या शृंगारचेष्टांना विरोध करण्याच्या स्थितीत ती नव्हती. तिचं तारुण्य तिला अख्तरच्या भूकेचं भक्ष्य वनवित होतं. त्यानं तिला आपल्या वाहुपाशात घेतलं अन् मग शृंगाराची सारी स्थळं त्यानं कावीज केली. जहानआरा आपलं सौंदर्य त्याला मनःपूत लुटू देत होती अन् अख्तरदेखील ही लूट विनधोकपणं लुटत होता. तेवढ्यात मलूलपणानं जहानआरा कुजवुजली,

"अख्तर, तुमच्या सहवासात मी रमलेय. जे सुख माझ्या तकदीरात नाही त्याचा अनुभव तुम्ही मला देताय. मला मात्र तुम्हाला काही देता येत नाही अख्तर!"

"मला तू सारं दिलंयस जहानआरा. अनेक सुंदर स्त्रिया मी पाहिल्यात. पण तुझ्या खूवसूरतपणाला तोड नाही. तुझ्याशी माझी शादी झाली तर माझी सारी जिंदगी वदलून जाईल!"

"पण शादी कशी होणार?"

"वादशहाचा नाद तू सोड मग मी सांगतो शादी कशी करायची ती."

"ते शक्य नाही."

"मग असं कर!"

"काय करू?"

"अव्वाजानशी होऊ दे माझी मुलाखत एकदा!"

**[ या कथेचा हृदयस्पर्शी शेवट पुढील अंकात ]**

[ पान १९१ वरून—**का. दा. नायक** ]

असून मुंबई, पुणे, बारामती, कोल्हापूर, रत्नागिरी व गोव्याशी 'मफतलाल'च्या कापडाचा व्यापार ही पेढी करते.

श्रीधरपंतांचे ज्येष्ठ चिरंजीव सुरेंद्र हे सध्या कॅलिफोर्नियातील विद्यापीठात 'पी. एच्. डी.'चे संशोधन करीत आहेत. स्प्रेग इलेक्ट्रिक कंपनीने दिलेल्या शिष्यवृत्तीने ते हे करीत आहेत. याशिवाय कॅलिफोर्निया विद्यापीठाचे संशोधक सहाय्यक म्हणून त्यांना मानधन दिले जातेच. त्यांच्या संशोधनाचा विषय आहे "इफेक्ट ऑफ रेडिएशन इन सेमी कंडक्टर्स (इलेक्ट्रॉनिक मशीन्स.) 'पी. एच्. डी.' करून भारतात परत आल्यावर भाभा अणु केंद्रात संशोधक म्हणून काम करण्याची मनोमन इच्छा ते बाळगून आहेत. तशी संधी न मिळाली तर 'रेडियो कॉर्पोरेशन ऑफ अमेरिका' या संस्थेचे कायमचे आमंत्रण आहेच. 'पी. एच्. डी.'ची संधी मिळताच त्यांनी कंपनीचा राजिनामा दिला होता. पण तो कंपनीने मंजूर न करता 'दीर्घ मुदतीची रजा' दिली असून, "उद्योग संशोधनाच्या आघाडीवर तुझ्यासारखी माणसे हवीत आणि त्यांना संधि उपलब्ध करून देण्यासाठीच आम्ही" अशी भूमिका कंपनीने घेतलेली आहे. एका भारतीय विद्यार्थ्याच्या संशोधन शक्तीबद्दल आणि कर्तृत्वाबद्दल कंपनीने व्यक्त केलेला हा विश्वास केवळ नायक कुटुंबाला, महाराष्ट्र-गोमंतकालाच नव्हे तर भारतालाही भूषणावह आहे असे म्हटल्यास वावगे ठरू नये. सुरेन्द्र हे प्रथमपासूनच प्रथम श्रेणीचे विद्यार्थी! ती श्रेणी त्यांनी शाळा-कॉलिजातच नव्हे तर अमेरिकेतही कायम राखली आहे ही गोष्ट अत्यंत कौतुकास्पद होय! श्रीधरपंतांचे द्वितीय चिरंजीव हे 'एम्. कॉम्.' करीत असून, त्यांनीही भावाची प्रथम श्रेणीची गादी चालविली आहे व 'एम्. कॉम्.' करून तेही भावाप्रमाणेच अमेरिकेला जाणार आहेत.

साहित्य, संस्कृति, समाज आणि उद्योगधंदे या विविध आघाड्यांवर "काशिनाथ दामोदर नायक" हे नाव गोमंतक-महाराष्ट्रात गाजले आहे. गाजत आहे. अशा एका मराठी 'उद्योग-पेढी'ला सुवर्णमहोत्सवाचे भाग्य लाभत आहे ह्याबद्दल एक मराठी माणूस म्हणून मात्र अभिमान वाटतो. अभिनंदन!

**—एक परिचित**










( पान १० वरून–**विठोबा** )

विमानातून, रेल्वेतून, मोटरीतून बाहेर बघा-जागजागी माणसं विधी करत असतात. श्वास कोंडून घेत उर्सुला स्वतःशीच पुटपुटली– 'इंडिया इज ए बिग कमोड !'

तरी ती त्या रणरणीत रस्त्याने, गलिच्छ काठ टाळीत पुढे पुढे चालली होती. दुर्गंधी, दारिद्र्य–पण त्यातच ती घोटाळत होती. कशासाठी हा वेडेपणा ते तिचं तिलाच कळत नव्हतं. डेव्हचा स्नेह संपुष्टात आला आहे ह्या प्रखर जाणीवेमुळे ? की आजवर जी अस्वथता सतत वाटत आली ती ह्या गूढ देशात संपेल ह्या कल्पनेने ?

झोपडपट्टी मागे टाकून ती नव्या-कोऱ्या कॉलनीत आली. तेथूनही वळसे घेत मोठमोठ्या बंगल्या व बागांमधून शहराबाहेर आली. समोरच्या भुंड्या टेकडीवर जायला रस्ता होता व टेकडीपलीकडच्या मोठ्या खबदाडात विठ्ठलाचं एक जुनाट देऊळ होतं. त्या देवळाशी बसूनच तिने आपल्या प्रोजेक्टचा पहिला खर्डा तयार केला होता. त्या मूर्तीला प्रथम पाहूनच तिला कसलीशी ओढ लागली होती.

विठोबाची ती काळया वर्णाची, सताड डोळयांची, ठेंगडी ठुसकी व वाट पहाणारी आकृती आठवली अन् उर्सुला अधीरी झाली. कुठल्याही इतर मूर्ती नि लेण्यांपेक्षा ह्या काळ्या अवताराने तिला ओढ लावली होती. विस्मयाने त्या विचित्र देवाकडे पाहतानाच तो तिचा दोस्त झाला होता. डेव्ह दुरावला नि भोवतालचे सारे दुःख देऊ लागले तशी ती विठ्ठलाकडे आधारासाठी निघाली.

उन्ह अंगार ओकीत होतं नि चढण अवघड होती. घाम वहात होता व पाय दुखत होते. पण उर्सुला लारसन अट्टाहासाने सायकल ओढीत निघाली. सात आठ वर्षाची असताना ती अशीच एका सकाळी सायकल घेऊन आपल्याबरोबरीच्या निग्रो मैत्रिणीला भेटायला निघाली होती. स्लम्स्मध्ये राहणारी ती निगर मुलगी–म्हणून उर्सुलाला तिच्याकडे कुणी जाऊ दिलं नाही. अडवलं, कोंडून ठेवलं ! तेवढं एक आयुष्यात मनासारखं घडलं नाही. अन् आता फौंडेशनने तसाच कोंडमारा केला. उर्सुला लारसनला वाटलं, पूर्वायुष्यातून सुटायला, डेव्हपासून वेगळं व्हायला, ह्या विचित्र देशात राहायचं ठरवायला आपण विठोबाच्या पायाशी धाव घेत आहोत. त्याचा कौल मागणार आहोत. त्याची प्रीती मागणार आहोत. आपल्याला काळजाला मुरळ पडली आहे त्याचं कारण हा काळा दोस्त आहे !

श्री विठ्ठलाच्या देवळाची वेडीवाकडी वाट संपत नव्हती, आणि उर्सुला लारसन जीव एकवटून सायकल चालवीत होती.

• • •



"भक्ति मुक्ति परमार्थ । जे जे वांछिजे मनात । ते ते साध्य होय त्वरित । गुरुचरित्र ऐकतां"







